


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






वर्ष ३४,
अंक १४०.
एप्रिल १९६२







महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक

दि. के. बेडेकर



याशिवाय वार्षिक इतिवृत्त, जमाखर्च–ताळेबंद व अर्थ-संकल्प, पत्रकें, इत्यादि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## नियामक मंडळ सभा

टिळक रस्ता, पुणें २
दि. ५-५-१९६२

स. न. वि. वि.

परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. १० जून १९६२ रोजीं दुपारीं ३ वाजतां पुणें येथे मा. प. सभागृहांत भरणार आहे. सभासदांनी या सभेला अवश्य यावें, ही विनंती.

### कामें

१. दुखवटा.
२. मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणें.
३. १९६१-६२ च्या वार्षिक इतिवृत्तास संमति देणें.
४. १९६१-६२ चा जमाखर्च व ताळेबंद संमत करणें.
५. १९६२-६३ चा अर्थसंकल्प संमत करणें.
६. अध्यक्षांच्या संमतीनें आयत्या वेळीं येणारीं कामें.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : दि. के. बेडेकर

संपादक-मंडळ
वा. रा. ढवळे–रा. शं. वाळिंबे
वि. म. कुलकर्णी–कृ. ब. निकुंब

वर्ष ३४, अंक १४०

जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९६२

## संपादकीय

प्रस्तुत ' समालोचन ' अंक हा चौतिसाव्या वर्षाचा अखेरचा अंक होय. या अंकांत कादंबरी, कथा, नाटक व संशोधन या चार प्रकारांचें वार्षिक समालोचन आम्ही देऊं शकलों आणि बंगाली व कन्नड वाङ्मयांतील वाङ्मयाचा वार्षिक आढावा देण्याचा आमचा संकल्प होता. दुर्दैवानें हे लेख वेळेवर हातीं पडूं शकले नाहीत. ते पुढील अंकामध्ये दिले जातील.

वर्षाच्या शेवटच्या अंकांत वर्षभरांत झालेल्या वाङ्मयीन आणि भाषाविषयक अशा मुख्य घटनांचें समालोचन असावें आणि महाराष्ट्र साहित्य परिषद् व तिच्या जिल्हावार शाखा, मराठी साहित्य महामंडळ व त्याच्या घटक संस्था, साहित्य अकादमीची मराठी सल्लागार समिति आणि महाराष्ट्र सरकारची भाषा सल्लागार समिति या संस्थांच्या कार्याचा व संकल्पाचा वृत्तान्त असावा अशी वाचकांची अपेक्षा असणें साहजिक आहे. परंतु असा आढावा उपलब्ध करण्यासाठी जेवढे श्रम व काळ द्यावयास हवा तेवढा आम्ही देऊं शकलों नाही, या बद्दल आम्ही दिलगीर आहोंत. असा प्रयत्न पुढील वर्षी साध्य करण्याचें आम्ही आश्वासन देतों.

मराठी साहित्य महामंडळानें गेल्या जूनपासून हातीं घेतलेला शुद्धलेखन पद्धतीच्या सर्वसंमत निर्णयाचा प्रश्न ऑक्टोबर १९६१ मध्ये सुटल्यासारखाच होता. त्या वेळीं महामंडळानें ठरविलेल्या नियमावलीसंबंधी गेले कांहीं महिने बरीच जाहीर चर्चा झाली. त्या चर्चेत निघालेल्या सर्व मुद्द्यांचा विचार करण्यासाठी महामंडळाची एक बैठक एप्रिल १७–१९६२ रोजीं झाली व तेथे नियमावलींत कोणतेहि फेरफार न करतां पूर्वीचाच निर्णय सर्वसंमतीनें कायम करण्यांत आला. ह्या नियमावलीची पुस्तिका महामंडळानें तयार केली असून त्या पुस्तिकेतील प्रास्ताविक विवरणांत, म. म. पोतदार यांनी सुचविलेल्या टीपेमागील भूमिकेचा, म्हणजे जुन्या शुद्धलेखनाप्रमाणे लिहिणाऱ्यांचें लेखन दण्डार्ह समजूं नये याचा अंतर्भाव करावा असें या बैठकींत ठरलें. ती पुस्तिका लवकर छापली जाईल. महामंडळाचा हा निर्णय सर्वांना समाधानकारक वाटेल. सर्व साहित्यसंस्था, ग्रंथकार व पत्रकार महामंडळाच्या नियमावलीचा पुरस्कार करून मराठी लेखनामध्ये एकसूत्रीपणा व नियमबद्धता आणण्यास नेटानें हातभार

अनुक्रमणिका



विदर्भांतील थोर नेते सर मोरोपंत जोशी यांचें शतायुषी जीवन खरोखर भाग्याचें होतें. जन्म विजयादशमीला आणि मृत्यु वर्षप्रतिपदेला हें भाग्य शतकांतून एखाद्याच्याच वांट्याला येतें. निष्णात कायदेपंडित, जुन्या मध्यप्रांत-वऱ्हाडचे गृहमंत्री, सांगली संस्थानचे प्रशासक, नागपूर विद्यापीठाचे आधारस्तंभ इत्यादि विविध नात्यांनी त्यांची सेवा सर्वश्रुत होती. सर मोरोपंतांच्या निधनानें एका थोर कर्तबगार व्यक्तीस महाराष्ट्र मुकला आहे.

कै. दा. वि. तथा बाबूराव गोखले यांनी आपल्या वयाची पंचाहत्तरी नुकतीच ओलांडली होती. लोकमान्य टिळकांचे एक ध्येयनिष्ठ सहकारी व 'केसरी-मराठ्या 'चे संपादक या नात्यानें बाबूरावांना सारा महाराष्ट्र ओळखीत होता. बाबूराव हे राजकीय व सामाजिक क्षेत्रांतले एक खंदे कार्यकर्ते होते व उत्तम वक्ते होते. स्वातंत्र्यपूर्व कालांत त्यांनी कारावासहि अनेकदा भोगला होता. सार्वजनिक सभा, स्वराज्यपक्ष, लोकशाही स्वराज्यपक्ष, पुणें नगरपालिका, स्कूल बोर्ड, बँका, टिळकस्मारक मंदिर, वक्तृत्वोत्तेजक सभा इत्यादि अनेक संस्थांमध्यें त्यांनी भरीव कामगिरी केली आहे. १९४५ सालच्या सोलापूर येथील पत्रकार परिषदेचे बाबूराव अध्यक्ष होते. बाबूरावांच्या निधनानें एक श्रेष्ठ पत्रपंडित व राजकीय पुढारी हरपला.

आम्ही या तिघांना आमची श्रद्धांजलि अर्पण करीत आहोंत.

— संपादक

---

# टीपा आणि पत्रें

## अप्रकाशित गडकरी

श्री. अत्रे व श्री. मोटे यांच्या वरील प्रकाशनाचा, विशेषतः त्यांतील श्री. अत्रे यांच्या उत्कृष्ट दीर्घ प्रस्तावनेचा परिचय मीं मागील पत्रिकेच्या अंकांत करून दिला. नंतर डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी माझ्या लक्षांत आणून दिलेल्या एका गोष्टीचा उल्लेख येथे करणें आवश्यक आहे. या प्रकाशनामध्ये श्री. मोटे यांनी मिळविलेली कांही पत्रें व माहिती नव्यानें प्रकाशित होत आहे व बाकी बहुतेक माहिती सहज उपलब्ध नसली तरी अप्रकाशित नाहीं. श्री. अत्रे यांनी स्वतःच संपादित केलेल्या 'समीक्षक' मासिकाच्या फेब्रुवारी १९४४ च्या गडकरी अंकामध्ये हें बहुतेक सारें गडकरी-वाङ्मय प्रकाशित झालेलें आहे. त्याचा समावेश करतांना समीक्षकचा उल्लेख श्री. अत्रे यांनी प्रस्तावनेंत करावयास हवा होता. हें सारें वाङ्मय नव्यानें प्रकाशांत आलेलें पाहून वाचकांना 'आश्चर्याचा धक्का' बसेल असें श्री. अत्रे यांनी प्रस्तावनेंत म्हटलें आहे व ही एक फसगत आहे. श्री. मोटे यांच्यासारखे साक्षेपी प्रकाशक या फसगतीत ओढले गेले आहेत ही जास्तच दुर्दैवाची गोष्ट आहे.

गडकऱ्यांच्या सहजपणें उपलब्ध नसलेल्या वाङ्मयाचा संग्रह उपलब्ध करून दिल्याबद्दल प्रकाशकांचें ऋण मानतांनाच गडकऱ्यांसारख्या मान्यवर लेखकाच्या वाङ्मयाबाबतींत श्री. अत्रे यांनी हा प्रकार करावयास नको होता असें म्हणणें भाग आहे.

दि. के. बेडेकर

गुणवंत हनुमंत देशपांडे

# छंदोरचना – कांहीं विचार*

म. सा. प. चे कार्याध्यक्ष श्री. क्षीरसागर यांनी कै. श्री. माधवराव पटवर्धन यांच्या स्मृतिदिनानिमित्त मला निमंत्रण देऊन, मला श्री. माधवरावांच्या स्मृतीला श्रद्धांजली अर्पण करण्याची संधी दिली याबद्दल मी, म. सा. प. ची कार्यकारिणी, कार्याध्यक्ष व चिटणीस यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों. या प्रसंगाकरिता माझीच निवड कां केली गेली याची कांहीच कल्पना मला करतां येत नाही. पण मानवी आयुष्यांत अकल्पित योगायोगाने जशा कांही घटना घडतात तशीच अकल्पित योगायोगाने घडलेली माझ्या आयुष्यांतील ही घटना असावी असें मला वाटतें.

कै. श्री. माधवराव पटवर्धन यांचा आणि माझा पहिला परिचय इ. स. १९२१ सालीं बडोदा येथे भरलेल्या ' महाराष्ट्र साहित्य संमेलना 'च्या वेळीं झाला, आणि तेव्हापासूनच त्यांचा माझा स्नेह जुळून आला. त्यानंतर अनेकदा, अनेक ठिकाणीं त्यांच्या माझ्या गाठी-भेटी झाल्या, त्या त्या वेळीं त्यांच्या अकृत्रिम स्नेहाचाच प्रत्यय मला आला. ते आपलें ' सुधारक ' काव्य लिहीत असतांना व छंदोरचनेचा विचार त्यांच्या मनांत चालू असतांना त्यांची माझी भेट अमरावती येथे झाली होती. त्या वेळीं आम्ही ' सुधारक ' काव्याविषयी व छंदो-विचाराविषयी खूपच मोकळेपणाने व खुल्या दिलाने चर्चा केली होती असें मला आठवतें. माझ्या मनावर त्यांच्या व्यक्तित्वाचा जो ठसा आहे त्यावरून मी त्यांचें स्वभाव-वर्णन असें करतों की, ते एक अत्यंत प्रांजळ, दिलदार व उमदे गृहस्थ होते. एखाद्या समव्यवसायी व्यक्तीशीं त्यांचा परिचय झाला की, ते त्या व्यक्तीशीं अत्यंत मोकळेपणाने व ऋजुतेने वागत. त्यांच्या वागण्यांत आत-बाहेर असें कांही नव्हतें. अशा व्यक्तीशीं दिलखुलास बोलण्यांत त्यांना आनंद वाटत असे व त्याच्याशीं केलेल्या चर्चेतून व बोलण्यांतून रस व आनंद घेण्याची त्यांची प्रवृत्ति होती.

साहित्यिक या नात्याने कै. माधवरावांविषयी विचार केला तर ते त्रिविध रूपांत आपल्यासमोर उभे राहतात. कवि, कोषकार आणि छंदो-रचनाकार अशी तीं तीन रूपें होत. साहित्यिक या नात्याने त्यांच्या या तीनहि पैलूंत त्यांचें असें खास वैशिष्ट्य होतें. कवि म्हणून आपल्या समकालीनांत ते उच्च दर्जाचे तर होतेच, पण त्यांच्या काव्यलेखनशैलींत जें वैशिष्ट्य होतें तें इतरांना साधण्यासारखें नव्हतें. त्यांची कविप्रतिभा आशयाचीं नवीन नवीन क्षेत्रें धुंडणारी व नवीन नवीन प्रयोग करणारी होती. ते फारसी भाषेचे पंडित असल्यामुळे त्यांनी बरींच फारसी वृत्तें मराठींत नव्याने आणलीं. त्यानंतर त्यांचें अनुकरण अनेकांनी केलें. कोषकार या नात्यानेहि त्यांची कामगिरी अपूर्वच म्हटली पाहिजे. कारण त्या वेळपर्यंत मराठी साहित्य-भांडारांत फारसी-मराठी कोष इतक्या साक्षेपाने लिहिलेला दुसरा नसावा असें मला वाटतें. कै. माधवराव हे फारसी भाषेचे पंडित असल्यामुळे प्रथम प्रथम आपल्या लिखाणांतून फारसी

* गतवर्षीच्या माधव ज्यूलियन स्मृतिदिनानिमित्त योजिलेलें व्याख्यान.

शब्दांचा वापर त्यांनी प्राचुर्याने केला. परंतु पुढे स्वातंत्र्यवीर श्री. सावरकर यांनी पुरस्कारिलेल्या भाषाशुद्धीचें महत्त्व त्यांना पटल्यावर, आपल्या लिखाणाचें परिष्करण करून भाषाशुद्धीचा प्रचारहि त्यांनी मोठ्या हिरीरीने केला. श्री. माधवरावांच्या स्वभावाचा आणखी एक विशेष असा होता की, एखाद्या विषयाचा ध्यास त्यांनी घेतला म्हणजे बुद्धीच्या आणि प्रतिभेच्या सर्वस्वाने ते त्या विषयाचा पिच्छा पुरवीत.

कै. श्री. माधवरावांची खरी महत्त्वाची आणि मराठी साहित्य-सृष्टींत चिरस्थायी होणारी कामगिरी म्हणजे त्यांचा 'छंदोरचना' हा ग्रंथ होय. हा एकच ग्रंथ माधवरावांनी लिहिला असता तरी त्यांचें नांव मराठी साहित्यांत चिरकाल टिकलें असतें. हा ग्रंथ वरवर जरी चाळला तरी त्यांच्या विशाल आणि सूक्ष्म बुद्धिमत्तेची ओळख पटल्यावाचून राहत नाही. त्यासाठी त्यांनी केलेल्या अचाट परिश्रमाचा प्रत्यय पानोपानीं येतो.

आजच्या प्रसंगीं, माधवरावांनी या ग्रंथांत मांडलेल्या मुख्य सिद्धान्ताविषयी माझे विचार सांगितले तर तें अप्रस्तुत होणार नाही अशी मला आशा आहे. या ग्रंथांत त्यांनी व्यक्त केलेल्या विचारांचे इतर अभ्यासूंनी चिंतन करून जर कांही निष्कर्ष काढले तर ते त्यांच्या सिद्धान्ताचा विकास व छंदःशास्त्राच्या प्रगतीच्या दृष्टीने उपकारकच होतील असें मला वाटतें. कोणतीहि शास्त्रीय विचारसरणी विकास पावत असतांना, त्या क्रियेला अनेक विमर्शकांचा हातभार लागलेला असतो असें आपण पाहतों. आजच्या विज्ञानशास्त्राच्या विकासाचा जर आपण विचार केला तर, पूर्वीच्या संशोधकांनी मांडलेले विचार व प्रस्थापित केलेले सिद्धान्त, आधारास घेऊनच, पुढील संशोधक आपले सिद्धान्त मांडीत असतो. यांत पूर्वीच्या संशोधकास कोणत्याहि तऱ्हेने कमीपणा येण्याचें कारण नसतें. उलट मूळ सिद्धान्त मांडणाराची, पुढील विमर्शकांच्या विचारांना चालना देण्याची कामगिरीच खरी महत्त्वाची समजली पाहिजे. एखादी महत्त्वाची शास्त्रीय घटना प्रथम ज्याने ओळखली त्याचीच खरी अपूर्वाई म्हणावी लागते. पुढील विमर्शकांनी सांगितलेले विचार हा पूर्वसूरींच्या कल्पनांचाच विकास असतो. इतकी प्रस्तावना करण्याचें कारण इतकेंच की, श्री. माधवरावांनी मांडलेल्या छंदोविषयक प्रमुख सिद्धान्ताविषयी मी जे विचार सांगणार आहे ते त्यांच्या सिद्धान्ताचा विकास होण्यास साधनीभूत होतील अशी माझी श्रद्धा आहे.

छंदोरचनेमध्ये छंदाचा विचार करतांना श्री. माधवरावांनी मुख्य तत्त्व जें सांगितलें आहे तें म्हणजे छंदांना लय अथवा ताल असतो हें होय. 'छंद म्हणजे अक्षरांची तालबद्ध जुळणी' ( छं. र. पृ. ८ ), 'छंद म्हणजे लयबद्ध अक्षररचना' ( छं. र. पृ. ९ ) अशी मुळी त्यांनी छंदाची व्याख्याच केली आहे. छं. र. पृ. १६ वर त्यांनी 'लय' म्हणजे काय याचा विचार केला आहे; तो असा की, एखादी कविता म्हणत असतांना, सारख्या अंतरावर टाळी वाजवावीशी वाटते आणि असे टाळी वाजवितां वाजवितां जे तुकडे पडतात त्यांना उच्चारावयाला सारखा काल लागतो. असें लयीचें स्वरूप त्यांच्या मतें असावें असें त्या पृष्ठावरील एकंदर वर्णनावरून वाटतें. टाळी वाजवितांना पडणारे छंदाचे तुकडे चतुर्मात्रिक, पंचमात्रिक, षण्मात्रिक, सप्तमात्रिक व अष्टमात्रिक आहेत असें निश्चित करून या पायावर त्यांनी छंदांचें वर्गीकरण केलें आहे. ही लयीची कल्पना आणि वरीलप्रमाणे केलेलें वर्गीकरण हा त्यांच्या 'छंदोरचना' ग्रंथाचा मध्यवर्ती आराखडा आहे आणि हा पूर्वी झालेल्या छंदःशास्त्रकारांच्या छंदोविषयक विचारापेक्षा निराळा विशेष आहे. एकंदरींत माधवरावांनी छंदःशास्त्राची पुनर्घटनाच केली आहे असें म्हणावयास हरकत नाही.

अनुक्रमणिका

कै. श्री. माधवरावांच्या पूर्वी छंदोविषयक विचार करतांना छंदांना ताल किंवा लयीची आवश्यकता आहे अशाबद्दल, प्राचीन व अर्वाचीन छंदोविषयक ग्रंथांत कोठे आधार सापडतो काय हें पाहूं. वैदिक छंदोमंजरी ग्रंथांत छंदांचें वर्गीकरण अक्षरसंख्येप्रमाणे केलें असून, ते छंद अथवा मंत्र वेदपाठक हाताने किंवा मानेने आघात दर्शवून म्हणतात; ही आघात दर्शविण्याची क्रिया हें तालाचें आद्यरूप असावें. 'ताल' शब्दाचा स्पष्ट उल्लेख भरतमुनीच्या नाट्यशास्त्रांतील पुढील श्लोकांत ( ३२।२९ ) आढळतो. 'नियताक्षरसंबंधं छंदो यति-समन्वितम्। निबद्धं तु पदं ज्ञेयं सतालपतनात्मकम् ।' या श्लोकांतील 'सतालपतनात्मकम्' या शेवटच्या चरणावरून छंदत्व पूर्ण होण्यास ठराविक अक्षरसंख्या, यति व तालाच्या टाळीचा आघात आवश्यक आहे असें भरतमुनींनी जाणलें होतें असें दिसतें.

यानंतर अलीकडील कालांत इ. स. १९१०-११ च्या सुमारास विदर्भांतील सुप्रसिद्ध जन्मांध सत्पुरुष श्री. गुलाबराव महाराज यांच्या 'सूक्तिरत्नावली, नवमयष्टि, उत्तरार्ध' या स्वकृत पदांच्या गार्येत सुरवातीला एक छंदोविषयक टिपण जोडलें आहे. त्यांत त्यांनी फक्त जातींचाच विचार केला असून, छंदाच्या रचनेस मूळ राग व ताल यांची आवश्यकता आहे असें म्हटलें आहे. हें टिपण आर्यावृत्तांत अगदी सूत्रपद्धतीने लिहिलें असून दुर्बोध झालें आहे. यापुढे, ताल, स्वर, छंदांना आवश्यक आहेत असा स्पष्ट उल्लेख असणारा ग्रंथ श्री. गणेश विष्णु देशपांडे यांचा 'छंदोलंकार' हा होय. या ग्रंथासंबंधीची माहिती श्री. माधवराव यांनी आपल्या छंदोरचनेच्या शेवटच्या प्रकरणांत पृ. ५६२ वर दिली आहे. त्यांत 'पद्याला लयबद्धतेची आवश्यकता आहे या गोष्टीची जाणीव प्रथम याच ग्रंथकाराला झालेली दिसते' असें माधवरावांनी म्हटलें आहे व 'छंद अगर वृत्तें यांना ताल व सूर यांचें साह्य पाहिजे' असा त्या ग्रंथांतील विधानाचा उल्लेखहि माधवरावांनी केला आहे. एकंदरींत यावरून एवढें स्पष्ट होतें की, छंदाला ताल किंवा लयीची आवश्यकता आहे याविषयीची कल्पना पूर्वीच्या कांही थोड्याच ग्रंथकारांना आलेली होती. असे तुरळक उल्लेख सापडत असले तरी त्या कल्पनेचा प्रत्यक्ष उपयोग करून छंदःशास्त्राची मांडणी कोणी केली नव्हती. श्री. माधवरावांनीच फक्त या कल्पनांचा प्रत्यक्ष उपयोग करून त्या पायावर आपल्या 'छंदोरचनेचा' प्रपंच थाटला आहे.

आता 'लय' किंवा 'ताल' यांचें यथार्थ स्वरूप काय व त्यांचा छंदांशीं संबंध कशा प्रकारचा आहे याबद्दल माझे विचार मी आपणांला सांगतों. 'लय' किंवा 'ताल' यांचें नक्की स्वरूप काय याचा विचार केल्याशिवाय छंदोनिर्मितीच्या दृष्टीने त्यांचें महत्त्व किती आहे हें ध्यानांत येणार नाही. हा विचार म्हणजे छंदाच्या मूळ घटनेचाच विचार आहे असें मला वाटतें.

"छंदाला 'लय' किंवा 'ताल' पाहिजे" किंवा 'छंद म्हणतांना टाळी वाजवावीशी वाटते,' 'लयबद्ध किंवा तालबद्ध अक्षररचना म्हणजे छंद' या माधवरावांच्या विधानांतील 'लय' शब्दाची व्याख्या करण्याचा प्रयत्न करूं. 'लय्' हा मूळ शब्द संस्कृतांत व्यंजनान्त असून त्याचा अर्थ देवस्थळी यांच्या कोषांत 'गम्' 'to move' असा दिला आहे. To move म्हणजे गतिमान् होणें. तसेंच गाण्यामध्ये 'लय' वाढली किंवा कमी झाली असें जें आपण ऐकतों त्याचा अर्थहि 'गति' कमी झाली किंवा वाढली असाच होतो,

छंदप्रवृत्ति कशी होते याचा विचार केला तर असें दिसून येतें की भावनोत्कटतेच्या भरांत त्या भावनेच्या अभिव्यक्तीसाठी गुणगुणतां गुणगुणतां जे शब्द कवीच्या वाणींतून बाहेर पडतात ते छंदोरूप पावतात. मनुष्य हा स्वभावतःच गानप्रिय असल्यामुळे भावना स्वरयुक्त शब्दांत प्रगट होतात. भावाभिव्यक्तीची ही प्रक्रिया होत असतांना, मानवाच्या शब्दोच्चार-क्रियेंत असणारी स्वाभाविक 'गति' ती, त्याने गुणगुणलेल्या छंदोरूप रचनेंत येणें क्रमप्राप्तच आहे. या 'गती'लाच 'लय' अशी संज्ञा तालशास्त्रज्ञ देतात. 'लय' हें एक सर्वव्यापी तत्त्व आहे. सर्वविश्व गतिमान् आहे. म्हणून विश्वांतील यच्चयावत् पदार्थांत 'गति' किंवा 'लय' अनुस्यूत आहे. या 'गती' चें ज्ञान सापेक्षत्वानेच आपणांस होतें. एखाद्या स्थिर पदार्थाच्या अपेक्षेनेच माणसाला गतीची कल्पना करतां येते. निरपेक्ष गतीला किंवा लयीला लय किंवा गतीच म्हणतां येणार नाही. जसें अंधाराच्या अपेक्षेनेच प्रकाशाची कल्पना करतां येते. अंधार नसला तर निरपेक्ष प्रकाशाला प्रकाशच म्हणतां येणार नाही. तसेंच 'लय' ही सुद्धा सापेक्षत्वानेच प्रतीत होणारी आहे. या सापेक्ष लयीचे 'कालसापेक्ष लय' व 'कालनिरपेक्ष लय' असे दोन प्रकार होतात. कालाचें बंधन असलेली ती 'काल-सापेक्ष लय' व कालाचें बंधन नसलेली ती 'कालनिरपेक्ष लय' होय. या दोन प्रकारांचें थोडें स्पष्टीकरण करतों. पृथ्वी आपल्या आसाभोंवती फिरते; ती किती वेळांत फिरते याचा काल पृथ्वीच्या दृष्टीने ठरलेला आहे असें म्हणतां येणार नाही. सूर्योदय हा एक खुंट मानून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचें पृथ्वीचें परिभ्रमण हें चोवीस तासांचें आहे असें मानवाने गृहीत धरलें आहे. म्हणजे दोन सूर्योदयांमधील अंतर हें चोवीस तासांनी विभागलें आहे. घड्याळाचें कोरें डायल म्हणजे ज्यावर तास–मिनिटांच्या खुणा केलेल्या नाहीत असें घेतलें आणि त्यावर काटा फिरत आहे अशी कल्पना केली तर तो काटा त्या डायलचें वर्तुळ किती वेळांत फिरतो हें सांगतां येणार नाही. पृथ्वीचें किंवा डायलवरील काट्याचें हें परिभ्रमण हीच कालनिरपेक्ष लय होय. डायलवर तास-मिनिटांच्या खुणा केल्यानंतर, तासाचा काटा बारा तासांत त्या वर्तुळाची फेरी पूर्ण करतो असें आपण म्हणतों. म्हणजे विशिष्ट अंतराचे विशिष्ट विभाग पाडून त्यांना आपण तास–मिनिटें अशी कालवाचक संज्ञा दिली म्हणजे कालाची कल्पना गृहीत धरून आपण त्या कालकल्पनेचा लयीवर संस्कार केला. हीच कालसापेक्ष लय होय व हिलाच मी संस्कारित लय म्हणतों. अर्थात् जी कालनिरपेक्ष लय आहे तिला मी असंस्कारित लय असें नांव देतों.

तालछंदांच्या संबंधांत जेव्हा आपण 'लय' हा शब्द उपयोजितों तेव्हा ती लय विशिष्ट कालपरिमाणाने संस्कारित झाली आहे असें आपणांस दिसून येतें. सारख्या काल-खंडांत छंदांतील तुकडे किंवा मात्रावर्तनें म्हटलीं जातात असें जेव्हा आपण म्हणतों तेव्हा त्या तुकड्यांच्या उच्चारांतील गति विशिष्ट कालाने बद्ध आहे असेंच गृहीत धरलेलें असतें. हाच कालबद्धतेचा संस्कार वाद्याच्या गतीवरहि होतो. वाद्याच्या तालांतहि सारख्या कालखंडाचे तुकडे किंवा मात्रावर्तनें आहेत व त्यांची गति ही कालाने बद्ध आहे. तालांत व छंदांत ही जी कालबद्ध गति आहे तिचे, घड्याळाच्या तबकडीवरील तास–मिनिटांप्रमाणे विभाग पाडून त्या विभागांना मात्रा ही संज्ञा दिली आहे. ह्या मात्रा हाच ताल व छंद यांतील मूलभूत आणि समान घटक आहे. सारख्या कालखंडांतील आवर्तनें असणें आणि प्रत्येक आवर्तन, मात्रा या कालपरिमाणानें बद्ध असणें हें ताल व छंद यांतील एक समान लक्षण आहे. वास्तविक ताल हा अगदी भिन्न प्रकार नसून, छंद हा जसा मात्रांच्या विशिष्ट क्रम-

रचनेचा प्रबंध आहे, तसाच ताल हाहि मात्रांच्या विशिष्ट क्रमरचनेचा प्रबंधच आहे. सारख्या कालखंडांचे गाळे मात्रायुक्त अक्षरांनीं भरले की छंद व तेच गाळे मात्रायुक्त तालबोलांनी भरले की ताल होतो. उदाहरणार्थ विद्युन्माला हें वृत्त घेऊं:—विद्युन्माला ऐसे बोला। जेथें मा मा गा गा आला। यांत पहिली 'वि' या अक्षरावर टाळी पडते व दुसरी टाळी 'ऐ' या अक्षरावर पडते. या दोन टाळ्यांमधील तुकडा 'विद्युन्माला' हा घेतला तर तेवढ्या तुकड्यांत 'ना धिन् धिन्ना' हीं त्रितालाच्या बोलाचीं अक्षरें बसतात. हाच क्रम विद्युन्मालेच्या चारहि चरणांत दिसून येतो. यावरून हें वृत्त व त्रिताल हा ताल हे समचरणी व सममात्रक आहेत हें दिसून येईल. अशीं आणखीहि वृत्तें सांगतां येतील. पण विस्तार कंटाळवाणा होईल म्हणून नमुन्याकरिता एकच उदाहरण सांगितलें आहे. वर 'विद्युन्माला' हें वृत्त व 'त्रिताल' हा ताल सममात्रक आहेत असें म्हटलें आहे. या विधानाला आक्षेप येण्याचा संभव आहे. तो असा की, त्रितालाच्या एका तुकड्याच्या मात्रा चार होतात व 'विद्युन्माला' या तुकड्याच्या मात्रा आठ होतात. हा आक्षेप फारसा बरोबर नाही. एका ध्वनीची एक मात्रा या हिशेबानें मात्रा मोजल्या तर ताल व वृत्त यांतील तुकड्यांच्या मात्रा सारख्या येतात. फरक पडतो मात्रा मोजण्याच्या भिन्न पद्धतीमुळे. तालामध्ये एका ध्वनीची किंवा ठोक्याची एक मात्रा होते, तर छंदामध्ये लघु अक्षराची एक व गुरूच्या दोन मात्रा होतात. तालाच्या मात्रा ध्वनिनिष्ठ तर छंदाच्या मात्रा अक्षरनिष्ठ आहेत. मात्रा मोजण्याच्या पद्धतींत दोन शास्त्रांमध्ये फरक असला तरी त्यामुळे छंद किंवा वृत्त याच्या तालबद्धतेंत फरक होत नाही. मात्रा कशा मोजाव्यात हें सांगणारा भरतमुनींचा श्लोक असा:—

एकमात्रं भवेद् ऱ्हस्वं द्विमात्रं दीर्घमिष्यते।
प्लुतं चैव त्रिमात्रं स्यादक्षरं स्वरयोजनात्॥

या श्लोकाचा अन्वय 'ऱ्हस्वं एकमात्रं भवेत्' असा केला तर तो 'लघूची तो एक मात्रा' अशी मात्रा मोजण्याची छांदसपद्धति दर्शवितो व 'एकमात्रं ऱ्हस्वं भवेत्' असा अन्वय केला तर ती तालशास्त्राची मात्रामापन-पद्धति आहे असें दिसून येतें. कसाहि अन्वय केला तरी तालछंदांच्या मूळ संबंधाला बाधा येत नाहीं.

याप्रमाणे, ताल व छंद यांतील समान घटक जो 'मात्रा' त्याचा विचार केल्यानंतर, ताल व छंद यांत आणखी कांही समान धर्म आहेत काय हें पाहणें योग्य होईल.

इ. स. १९११ मध्ये पं. विष्णुशर्मा यांनी 'अष्टोत्तरशतताललक्षणम्' हा ग्रंथ प्रसिद्ध केला; त्यांत छंदःशास्त्राप्रमाणे तालशास्त्राचींहि आद्य सूत्रें 'मयरसतजभनादिसंमितम्' व 'यमाताराजभानसलगम्' हींच आहेत असें दिलें आहे. यावरून तालांतहि गण आहेत व तालांतील गणांचा मात्राक्रमहि वृत्तांतील गणांच्या मात्राक्रमाप्रमाणेच आहे हें उघड दिसतें.

कै. श्री. माधवराव यांनी छं. र. पृ. ९ वर 'काव्य-पठण आणि गायन' या परिच्छेदांत 'छंद म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय. ती अक्षरशः पाहतां, अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक, पंचमात्रक व चतुर्मात्रक अशा आवर्तनांची असते; परंतु गायकी तालांची संख्या पांचच आहे असें नाही' असें म्हटलें आहे. या दृष्टीने तालांचा विचार केला तर तालामध्येहि उपरोल्लेखित पांच प्रकार आहेत असें दिसतें. हे प्रकार पुढीलप्रमाणे—

| | | |
|---|---|---|
| १ अष्टमात्रक ताल | केरवा, धुमाळी | ८ मात्रा |
| | त्रिताल, पंजाबी, अध्धा | १६ ,, |
| २ सप्तमात्रक ताल | तेवरा | ७ ,, |
| | धमार, दीपचंदी | १४ ,, |
| ३ षण्मात्रक ताल | दादरा | ६ ,, |
| | धृपद, एक्का | १२ ,, |
| ४ पंचमात्रक ताल | लघुशेखर, क्रीडा, झंपा | ५ ,, |
| | झपताल, सुरफाक्ता | १० ,, |
| ५ चतुर्मात्रक ताल | आदिताल | ४ व वरील अष्टमात्रक ताल |

यावरून छंदाप्रमाणे तालांतहि तितकेच प्रकार आहेत हें स्पष्ट दिसतें. मिश्रताल वगैरे जे तालांत निरनिराळे प्रकार आहेत तसेंच छंदामध्येंहि अर्धसम, विषम वगैरे मिश्रप्रकार आहेत.

प्रत्येक अंगोपांगांत तालांची व छंदांची समान घटना पाहिली म्हणजे ताल हा छंदाचाच पर्याय शब्द आहे असें म्हणावेंसें वाटतें. तालांची अभिव्यक्ति वाद्याच्या माध्यमांतून होत असल्यामुळे, त्या शास्त्राला तालशास्त्र व वर्णाच्या माध्यमांतून व्यक्त होणाऱ्या सार्थ शब्दप्रबंधाला छंदःशास्त्र अशी परिभाषा त्या त्या शास्त्रांच्या प्रणेत्यांनी ठरविली असावी.

ताल-छंदांतील समान घटकांचा विचार केल्यानंतर कांही इतर पुराव्यांवरून तालांनाहि छंद म्हणत असत असें दिसून येतें. संगीतरत्नाकरांतील एक श्लोक श्री. माधवरावांनीच छं. र. पृ. ५१४ वर दिला आहे. त्याचा प्रथमार्ध ' छंदोभिर्बहुभिर्गेया ओव्या जनमनोहराः ' असा आहे. ओव्या ह्या निरनिराळया छंदांनी गातां येतात असें त्यांत म्हटलें आहे. याचा अर्थ, ओव्या ह्या वृत्त, जाति किंवा अक्षर-छंद अशा निरनिराळ्या छंदांनी गातां येतात असा घ्यावयाचा नसून, त्या निरनिराळ्या तालांनी गातां येतात असाच घेणें सयुक्तिक आहे. एकच पद्य चाली बदलून निरनिराळ्या तालांत म्हणतां येतें तशीच ओवीहि निरनिराळ्या तालांत म्हणतां येते, असा वरील श्लोकाचा अर्थ आहे. यावरून वरील श्लोकांत वापरलेला ' छंद ' हा शब्द तालवाचक आहे हें अगदी स्पष्ट आहे. पूर्वी तालस्वरांत पद्य-रचना करणारांना छंदकार म्हणत असत हें पुष्कळांनी जुन्या पिढींतील मंडळीकडून ऐकलें असावें. गायक लोकांत ' चीज बांधणें ' ज्याला म्हणतात त्याचा अर्थ ताल-स्वरांत पद्य-रचना करणें असाच आहे. अशी पद्यरचना करणारांनाच छंदकार म्हणत असत. हें सांगण्याचा उद्देश इतकाच की छंद-तालांचें अभिन्नत्व पटावें.

आणखी एक विचार असा की, ताल आणि स्वर हे छंदाचे अंगभूतच मानावे लागतात. प्रत्येक जिवंत शरीरयंत्रणेंत एक अंतस्ताल आहे असें आपल्या अनुभवास येतें. प्राण्यांच्या श्वसनक्रियेंत, हृदयाच्या स्पंदनांत, नाडीच्या ठोक्यांत, चालण्यांत एक प्रकारचा ताल आहे हें आपण अनुभवूं शकतों. मग त्याच शरीरयंत्रणेंतून, हृत्स्पंदाच्या, श्वासोच्छ्वासाच्या लयीबरोबर उच्छ्वसित होणारा शब्द किंवा शब्दसंहति, तीच लय किंवा तोच ताल घेऊन उत्स्फूर्त व्हावी हें क्रमप्राप्तच आहे. याच नैसर्गिक सताल शब्दसंहतीला व्यवस्थित रूप देऊन विविध ताल-छंदांची निर्मिति, कालांतराने तज्ज्ञांनी केली. सूक्ष्मविचारांतील स्वराबद्दलहि असेंच म्हणता

येतें. ध्वनि किंवा शब्द यांचें उगमस्थान कंठगत ध्वन्युत्पादक स्नायूंत आहे, तसेंच स्वरांचें उगमस्थानहि तेच स्नायु आहेत. या स्नायूंतून उत्पन्न होणारा जो ध्वनि असतो तो अस्फुट असा स्वरच असतो. छंद म्हणतांना त्याचें स्वरत्व स्फुट व्हावें लागतें.

एकंदरींत ताल, छंद आणि स्वर यांचें वागर्थाप्रमाणेच संपृक्तत्व आहे असेंच प्रत्ययास येतें.

माझ्या मतें तालछंदांच्या घटनेची मूळ बैठक वर विवेचन केल्याप्रमाणे आहे. ही मूळ बैठक ध्यानांत आली म्हणजे या तत्त्वानुसार निर्माण झालेले छंद कोणते व ही बैठक विसरून किंवा मिश्रणें व नवीन प्रयोग म्हणून निर्मिले गेलेले छंद कोणते याचा निर्णय करतां येऊन पूर्ण शास्त्रीय पायावर छंदःशास्त्राची पुनर्घटना करणें हें त्या शास्त्राच्या उपबृंहणाला उपकारक होईल.

कै. श्री. माधवराव पटवर्धन यांनी चालना दिलेल्या छंदोमीमांसेला उजाळा देऊन त्या शास्त्राच्या शास्त्रीय विचारविमर्शाला सहाय्यभूत होतील या हेतूने मी माझे विचार आपणांसमोर मांडले आहेत. ते आपण शांतपणें ऐकून घेतले याबद्दल आपले व ते मांडण्याची व श्री. माधवरावांच्या स्मृतीला अभिवादन करण्याची संधी मला उपलब्ध करून दिली याबद्दल म. सा. प. ची कार्यकारिणी, कार्याध्यक्ष व चिटणीस यांचे मी पुन्हा एकदा अंतःकरणपूर्वक आभार मानतों व आपलें भाषण पूर्ण करतों.

* * *

अनुक्रमणिका

कुमुदिनी घारपुरे, एम्. ए.

# एका अभिनव आरतीच्या निमित्ताने

मराठी भाषेचा तिच्या बालपणापासूनच आरतीशीं निकट परिचय आहे[1] आरती म्हणजे मूर्तिमंत भक्ति! तिचे मंजुळ शब्द महानुभावांपासून आजपर्यंत भाविक मनास मंत्रमुग्ध करीत आहेत, भक्तिवश करीत आहेत—

"बाइसे पांचै वाती उजळीति: आर्ती पालमांडा ठेवीति: गोसावीयासि: धुपार्ती होए: मंगळार्ती होए: 'जयतु मंगळ मंगळा परम मंगळ-रूपा' हे जति ओळगवीति: बाइसांसि आठै सात्वीक प्रकटेती:"—महानुभावांनी 'पूजावसरांत' वर्णिलेल्या या आरतीचें साक्षात् दर्शन आजहि भाविकांच्या मेळाव्यांत किंवा गणेशोत्सवासारख्या प्रसंगीं आपणांस नित्य घडतें. आरतीची क्रियाहि तीच आणि त्यामागील भक्तिभावहि तोच!

महानुभावीय ग्रंथकार म्हाइंभट यांनी केलेल्या दहा आरत्या 'जतीचा दशकु' या नांवाने महानुभावीयांत प्रसिद्ध आहेत. या आरत्यांची यादी हरिबास व सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळांत' पुढीलप्रमाणे दिली आहे:—

"(१) सकळा मंगळाची होत जइं वृष्टी: तिया माते
(२) परम मंगळ जया: परम पावन जया
(३) जएजएकारी मंगळ उच्चारा
(४) परिएळी आरातिया उजळलिया
(५) नारद तुंबर वीणा गाती
(६) भुजंग जीणौनि आले मुरारी
(७) परसरामें जो केला आचारी
(८) जयाचि अवस्था तो पैं भेटला
(९) सकळ सिद्धान्ता अगोचरा
(१०) जए मंगळ मंगळा

ऐसिया दाहा आरातिया."

महानुभावांनी लावलेल्या या आरतीच्या वेलाला संतवाङ्मयांत जणू बहर आला. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या श्रेष्ठ संतकवींनी आरतीची एक परंपराच निर्माण केली. रामदासांच्या आरत्या म्हणजे शब्दरूप धारण केलेलें काव्यच! स्वभावतःच मूर्तिपूजक असलेल्या महाराष्ट्राने या काव्यगंधाने धुंद व्हावें यांत कांहीच नवल नाही. पण

---

१. शके ११७२ च्या तासगांव ताम्रपटांत 'आरती'चा उल्लेख आहे. कान्हरदेव यादवाच्या राजवटींत कलिदेवाचें देऊळ बांधून त्याच्या अष्टांगभोगांसाठी दानें दिलीं. त्यांत "देवासि नित्य पंचामृत त्रिकाल धूपारत्ति नैवेद्यु दीपवर्ति पुष्पे ॥" असें वर्णन ११४ व ११५ या ओळींत आहे— Tasgaon Plates of Yadav Krishna, Shaka 1172 (Ep. Ind. Vol. 27, Page 208–216).

सगुणोपासनेला ज्यांचा कट्टर विरोध अशा इस्लाम धर्माच्या अनुयायांनीहि आरतीच्या परिमलाने बेहोष व्हावें याचें विशेष आश्चर्य वाटतें. कांही मुस्लिम संतांनी आणि त्यांच्या शिष्यांनीहि मराठी आरत्या केल्या आहेत. मुस्लिम संतकवि शेख महंमद यांची मराठी आरती दावलजीने आणि दावलजीचा शिष्य हकीम यानेहि केली आहे.[२] आरतीचा प्रभाव त्या कालावरच इतका लोकविलक्षण होता की, फादर स्टिफन्ससारख्या खिस्ती कवीलाहि खिश्चन धर्मातील एका विशिष्ट विधीचा अनुवाद 'आरती' या शब्दाने करण्याचा मोह आवरतां आला नाही.[3] जैनांच्या साहित्यांतहि विविध विषयांवरच्या आरत्या उपलब्ध आहेत. १८ व्या शतकांतील सुप्रसिद्ध जैन कवि जिनसागर यांच्या आरत्या म्हणजे तर नादमधुर रचना आणि उत्तम विचार यांचा संगमच !

संतकवींच्या सुरांत सूर मिळवून ज्यांनी आरतीचा निनाद आजपर्यंत महाराष्ट्रांत घुमवला त्यांत दासोपंत, समर्थशिष्य कल्याण, अनंत, गिरिधर, नरहरि यांसारख्या आंग्लपूर्व कालांतील भक्तकवींबरोबर स्वातंत्र्यवीर सावरकर, शाहीर गोविंद, भाऊराव आपटे, म. श्री. देशपांडे या आधुनिक कवींचीं नांवेंहि आवर्जून घ्यायला हवीं. स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळीच्या ऐन भरांत खादी, ग्रामोद्योग, चरखा यांसारख्या विषयांवर आरत्या झाल्याचें व त्या मेळ्यांत म्हटल्या जात असल्याचें कांही जुनीं माणसें आपल्या आठवणींत सांगतात; तर स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर आचार्य अत्रे, दत्तू बांदेकर, यांच्यासारख्या विनोदी लेखकांनी केलेल्या राजकीय पुढाऱ्यांच्या विडंबनात्मक आरत्या, 'नवयुग' सारख्या साप्ताहिकांतून प्रसिद्ध झाल्याचें आजच्या पिढीसहि स्मरतें.

आरतीच्या माध्यमांतून विडंबन व्हावें इतका हा भक्तिपर पद्यप्रकार मराठी भाषकांस परिचित असला तरी अतिपरिचयामुळे की काय, आरतीच्या अभ्यासाची राखावी तशी बूज मराठी भाषकाने राखली नाही. 'आरती' या शब्दाची व्युत्पत्ति, एक छंदप्रकार म्हणून केलेली तिची छाननी, आणि संशोधनाच्या निमित्ताने मिळालेल्या कांही आरत्यांच्या संग्रहाची जोपासणी एवढ्याच दृष्टीने आरतीचा अभ्यास आज विखुरलेल्या स्वरूपांत आपल्या दृष्टीस पडतो.

'आरती' हा शब्द 'आर्तिक्य' – म्हणजे मूर्तिपूजेंतील एक समारंभ वा विधि किंवा 'आरात्रिका'–म्हणजे मूर्तीपुढें विशेषतः रात्रीं करावयाचें दीपदर्शन किंवा दीप ओवाळण्याची

---

२. वा. सी. बेंद्रे : 'तुकाराम महाराज यांचे संतसांगाती'—पृ. ६६.

३. फादर स्टिफन्सकृत 'क्रिस्तपुराण' पैलें पुराण (बंडेलू प्रत) पृ. २०४ ओ. ११–१२. — खिस्ती धर्मगुरु चर्चमधील 'आल्टर'पुढे धूप फिरवतांना लॅटिन सूक्तें म्हणतो. हीं सूक्तें 'Rituale Romanum' या लॅटिन भाषेंतील आचारसंहितेंत पृ. ८०५ वर दिलीं आहेत. तीं अशीं :—(i) Tatum ergo sacramentum. (ii) Genitori Genitoque. धूप फिरवण्याचा क्रम 'Missale Romanum' या पुस्तकांत पहिल्या साठ पृष्ठांनंतर आकृति काढून दाखविला आहे.

आरतीच्या विधीसाठीं लागणारी सामग्री, क्रिया किंवा वर्ण्यविषय यांचें उपरोक्त खिश्चन विधीशीं कोणत्याहि प्रकारें साम्य नसतां त्याचा अनुवाद 'आरती' या शब्दाने स्टिफन्सनें करावा हें विशेष !

कृति–या दोन संस्कृत शब्दांपासून व्युत्पादिला जातो. आरती म्हणजे मूर्तिपूजेंत दीप ओवाळण्याच्या वेळीं म्हणावयाचें स्तुतिपर गीत. प्रा. कृ. पां. कुलकर्णी हे आपल्या व्युत्पत्तिकोशांत दोन्ही प्रकारांनी व्युत्पत्ति देतात; तर 'महाराष्ट्र शब्दकोश' 'आर्तिक्य' ही व्युत्पत्ति मानतो.

छंदशास्त्रदृष्ट्या 'आरती'सारखा शुद्ध मराठी छंद राजवाड्यांच्या नजरेंतूनहि निसटला.[४] पण प्रा. हरि दामोदर वेलणकर यांनी मात्र त्याचा थोडा परामर्श घेतला आहे.[५] त्यांच्या म्हणण्याप्रमाणे मूर्तिपूजेंतील 'आर्तिक्य' या समारंभावरून वा विधीवरून 'आरती' हें नांव त्या विशिष्ट छंदास पडलें असून, छंदाच्या विविध प्रकारांस सामावून घेणारी अशी ती एक व्यापक संज्ञा आहे. त्याचप्रमाणे त्यांच्या मताने मराठी आरत्यांत प्रामुख्याने आढळून येणारा, २२ मात्रा व १२ मात्रांनंतर यति असणारा, जो 'द्विपदी' नामक छंदप्रकार आहे, त्याचा उगम विरंहाकाने आपल्या 'वृत्तजातिसमुच्चयां'त ज्यास 'विच्छित्ति' असें नांव दिलें आहे त्या अपभ्रंश वृत्तांत सांपडतो. कै. डॉ. माधवराव पटवर्धनांनी 'छंदोरचने'त इतर पद्यप्रकारांच्या मानाने आरतीविषयी फारच थोडें लिहिलें आहे. 'भुवनसुन्दराची आरती' ते भुवनसुन्दर जातींत समाविष्ट करतात; किंबहुना त्या जातीचें नामकरणच त्यांनी त्या विशिष्ट आरतीवरून केलें आहे.[६] मात्र त्यानंतरच्या एका लेखांत ते म्हणतात,

"आरती म्हणजे विशिष्ट वेळीं म्हणावयाचें पद्य होय. त्याचे अनेक प्रकार आहेत. तो एक विशिष्ट छंद नाही. आरतीच्या एका विवक्षित प्रकाराचा उल्लेख ५२७ पृष्ठावर परिलीना छंद म्हणून दिला आहे. परंतु 'सुखकर्ता दुखहर्ता', या पद्याविषयी माझें मत अद्याप निश्चित होत नसल्याने त्याचा उल्लेख मीं केला नाही. 'परिलीना' छंद 'सुखकर्ता दुखहर्ता' या चालीवर म्हणतां येतो, याबद्दल वाद नाही."[७]

पुढे प्रसिद्ध केलेल्या 'पद्यप्रकाशां'त "आवर्तन हें आठाहून अधिक मात्रांचें बहुशः आढळत नाही. आरतीचा एक प्रकार मात्र अपवादरूप वाटतो" असें म्हणून उदाहरणादाखल 'युगें अठ्ठावीस', 'सुखकर्ता दुखहर्ता', 'दुर्गे दुर्घट भारी' या आरत्यांचा उल्लेख करून या आरत्या त्याच प्रकारच्या आहेत पण रचना शिथिल आहे असें म्हटलें आहे.[८]

अलीकडे डॉ. ना. ग. जोशी यांनी 'आरती' या छंदप्रकाराविषयी सांगोपांग चर्चा केली आहे. अनेक प्रचलित आरत्या त्यांनी परिलीना, चंद्रकांत, दीनवत्सल, भुवनसुंदर या छंदप्रकारांत बसवून दाखविल्या आहेत. तसेंच कांही संमिश्र आरत्यांचे अंबा–हरिभागिनी मिश्र प्रकार–त्यांत नवीन अंबा जाती–, मंगलागौरी, हरितालिका असे प्रकार केले आहेत. महानुभावीय आरत्यांचें वर्गीकरण, आरत्यांच्या छंदाबद्दलचीं मतमतांतरें, यांचें सुंदर विवेचन

४. राजवाडे : 'मराठी छंद'.

५. 'Apabhraṃśa and Marāṭhī Metres'—by H. D. Velankar— (New Indian Antiquary, 1938–1939, Volume I, P. 227.

६. 'छंदोरचना' – प्र. जातिजृम्भण – पृ. ३९८. (१९३७).

७. 'केसरी,' ता. २९ जून १९३७.

८. 'पद्यप्रकाश'—प्र.–जातिविचार, पृ. ६४-६५. (१९३८).

त्यांनी केलें आहे.[९] श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांनीहि पद्यमीमांसेंतील व इतर कांही लेखांतून 'आरतीविषयी थोडी चर्चा' केली आहे.[१०] इतर अनेक मतभेद असले तरी आरती या संमिश्र छंदप्रकारांत तालतत्त्वास; लयीस अधिक प्राधान्य आहे असें सहस्रबुद्धे व जोशी या दोघांचेंहि मत आहे, आणि हें पटण्याजोगेंच आहे.

सार्वजनिक उत्सवांत आणि कांही भाविक देवघरांतहि, नित्याने सांजसकाळ म्हटल्या जाणाऱ्या आणि म्हणून बऱ्याच परिचयाच्या झालेल्या अशा कांही आरत्यांचा संग्रह पांगारकरांच्या 'भक्तिमार्गप्रदीपांत' आहे. देहू-आळंदीसारख्या क्षेत्रीं गाइल्या जाणाऱ्या अनेक दीपारत्या, धूपारत्या, काकडारत्या, शेजारत्या विविध भजनी-मालिकांतून आढळून येतात. केवळ आरत्यांचे असेहि अनेक संग्रह उपलब्ध आहेत.[११] पण अभ्यासाच्या दृष्टीने ज्याचें मोल अमोलच ठरेल असा विपुल आरत्यांचा संग्रह कै. शंकर श्रीकृष्ण देव यांनी धुळयाच्या श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरांत हस्तलिखित स्वरूपांत जतन करून ठेवला आहे. त्यांतील आरत्यांची सुव्यवस्थित सूचि बाडांच्या क्रमांकांनिशी त्यांनी प्रसिद्ध केली आहे.[१२] नजर टाकली तर ठरणार नाही इतकें मराठीचें हें आरती-भांडार तेजस्वी आहे, अमाप आहे.

आजवर उपलब्ध असलेल्या आरत्यांकडे पाहतांना एक गोष्ट आढळली ती अशी की, आरतीमागचें भक्तिपूर्ण व श्रद्धायुक्त अंतःकरण तेंच असलें आणि त्यामुळेच की काय आरतीचें स्वरूप स्तुतिगान हेंच राहिलें असलें तरी आरतीच्या विषयांत बदल होत आलेला आहे. आरतीच्या वर्ण्यविषयाचें वर्गीकरण केवळ जिज्ञासेने म्हणून जें केलें तें खालीलप्रमाणे आहे :—

## १. देवदेवता

प्रारंभापासूनच देवदेवता हा आरत्यांचा प्रमुख विषय आहे. गणपति, शंकर, विष्णु, कृष्ण, राम, दत्त, मारुती, व्यंकटेश, विठ्ठल, खंडोबा या देवांवरच्या व महिषासुरमर्दिनी या देवीवरची आरती भक्तिमार्गप्रदीपांत आहे.[१३] तसेंच सरस्वती व पद्मावती या देवतांच्या आरत्या

---

९. ना. ग. जोशी : 'मराठी छंदोरचना'–कांही भक्तिपर पद्यप्रकार–पृ. २०२ ते २३० (इ. स. १९५५).

१०. (१) महाराष्ट्र साहित्य पत्रिका, वर्ष २५, अंक १०३, पृ. २६ ते २९.
(२) पद्यमीमांसा.

११. (१) आरतीसंग्रह–संपादक: वा. मो. पोद्दार—१८८८.
(२) सचित्र आरतीसंग्रह–निर्णयसागर प्रत—१९२७.
(३) सचित्र आरतीसागर–संपादक : न. वि. बागुल—१९२९.
(४) मंगळारती-संग्रह–रामतत्त्व प्रकाश, बेळगांव—शके १८६०.
(५) प्रेमळ आरत्या-संग्रह–केतकर आणि मंडळी, रत्नागिरी—शके १८६०.

१२. श्रीरामदासी संशोधन, द्वितीय खंड.

१३. पांगारकर : 'भक्तिमार्गप्रदीप' पृ. ७० ते ८६.

जैन कवि जिनसागर यांनी केल्या आहेत.[१४] रामदासी संशोधनाच्या बाडांत देवांवर पुष्कळच आरत्या असून देवतांवरहि पुढील आरत्या मिळतात :

अंबाबाईची — हरिदासकृत – बाड क्र. (६०८)
महालक्ष्मीची — निर्मळदासकृत ,, ,,
महाकालीची — दासकृत ,, ,,
महिषासुरमर्दिनीची — नरहरिकृत ,, (९३६)

## २. संत

देवांनंतरचा स्तुतीचा मान संतांस मिळावा हें स्वाभाविकच आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम, रामदास यांच्या आरत्या तसेंच सर्व भक्तिमार्गी संतांवर एक संतांची आरती गाइली जाते (भक्तिमार्गप्रदीप, पृ. ८३–८५). सर्व संतांची आणि कल्याणांची आरती बाडांतहि आढळते.

संतांची—माधवकृत —बाड क्र. १२३०
१४९७
कल्याणांची—पुरुषोत्तमकृत— ,, ९९७
शिवरामकृत— ,, ११६७
लक्ष्मणकृत— ,, ५५६

साईबाबांच्या अनेक आरत्या 'साईनामसुधा' या आरतीसंग्रहांत ल. अ. लिमये यांनी १९५० मध्ये संपादित केल्या आहेत.

जैन तीर्थंकर शांतिनाथ व महावीर यांच्या आरत्या 'जिनसागरांच्या समग्र कवितें'त समाविष्ट आहेत (पृ. १७२, १७३).

एक थोर आधुनिक संत, गुरुदेव रा. द. रानडे, यांच्या दोन आरत्या उपलब्ध असून या बुद्धिनिष्ठ युगांतहि निंबाळच्या आश्रमांत त्या मोठ्या भक्तिभावाने गाइल्या जातात. त्यांपैकी एक प्रकाशित[१५] असून दुसरी अप्रकाशित पण अत्यंत सुंदर असल्याने त्यांतील कांहीं भाग उद्धृत करण्याचा मोह आवरत नाही.

"जयदेव जयदेव जय सद्गुरुरामा । गुरुदेवा रामा ॥
आरती ओवाळूं तुज आत्मारामा ॥ ध्रु० ॥
निंबाळ आश्रम हा तव मुक्तीचें तीर्थ
परमार्थाचें मंदिर अध्यात्मपीठ
नेमाची नामाची ही साधनपेठ
भक्तजनांना वाटे भूवरि वैकुंठ ॥ जयदेव..."
(श्री. भाऊराव आपटे, जमखिंडी)

१४. 'जिनसागर यांची समग्र कविता', पृ. १७४, १७५, १७६
(संपादक : विद्याधर जोहरापूरकर, नागपूर)

१५. म. श्री. देशपांडे 'श्रीगुरुदेवचरितामृत' पृ. ४० (रानडे आश्रम ग्रंथमाला : २)

महाराष्ट्राच्या आणि मराठी भाषेच्या रक्तांतच आरती किती एकरूप झाली आहे याची साक्ष अगदी अलीकडे झालेली ही आरती देईल.

## ३. भक्तकवि

संतांप्रमाणे भक्तकविहि येथे आरतीचा विषय बनले. त्यांतील कांही खालीलप्रमाणे—

| | | | |
|---|---|---|---|
| शिवरामांची — | आत्मारामकृत—बाड | क्र. | ११६७ |
| कृष्णदयार्णवांची— | — | ,, | ७७८ |
| चिंतामणि देव यांची—त्रिंबककृत | — | ,, | ६७९ |
| गोविंद बल्लाळांची— | — | ,, | १२४५ |

## ४. ग्रंथ

देवाइतकेंच जिला पूज्य मानलें त्या गीतेची व इतर आदरणीय धर्मग्रंथांची आरती मराठीने वेळोवेळीं केली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| ( १ ) गीतेची— | भक्तिमार्गप्रदीप— | पृ. | ७९ |
| ,, | अनंतकृत— | बाड क्र. | ७९३ |
| ,, | अमृतेश्वरकृत— | ,, | ११५८ |
| ,, | जयरामसुतकृत— | ,, | ५९७ |
| ,, | रखुमादेवीवरकृत— | ,, | ५९७ |
| ( २ ) भागवताची— | रामचंद्रकृत— | ,, | ९२६ |
| ,, | भक्तिमार्गप्रदीप— | ,, | ७९ |
| ( ३ ) दासबोधाची— | कल्याणकृत— | ,, | ११४७ |
| | | ,, | १२३८ |
| | | ,, | ११६७ |
| ,, | गिरिधरकृत— | ,, | ६६३ |
| ( ४ ) मनाच्या श्लोकांची— | यशवंतकृत— | ,, | ६५९ |

## ५. अमूर्त कल्पना ( *Concept* )

तत्त्वज्ञान आणि धर्म यांतील कांही अमूर्त कल्पनांना मूर्त रूप देऊन मराठींत कांहीं आरत्या रचलेल्या आहेत. त्या खालीलप्रमाणे :—

( १ ) दशलक्षणधर्मांची— 'जिनसागर यांची समग्र कविता'— पृ. १७४, १७५. क्षमा, मार्दव, आर्जव, सत्य, शौच, संयम, तप इ. दहा अमूर्त लक्षणांचें सुबोध वर्णन करणाऱ्या दोन आरत्या जिनसागर या श्रेष्ठ जैन कवींनी केल्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| ( २ ) आत्मारामाची— | भक्तिमार्गप्रदीप— | पृ. | ७६ |
| ,, | | बाड क्र. | ९६८ |
| ( ३ ) मोक्षपुरीची— | विश्वंभरकृत— | बाड क्र. | १५०९ |

( ४ ) सद्गुरूची —गिरिधरदासकृत -- ,, ६६४
,, तुकारामकृत — ,, ५६४
,, —रामीरामदासकृत —भक्ति० पृ. ८१, क्र. १७
,, —रामानंदकृत — ,, पृ. ८१, क्र. १९
( ५ ) पारमार्थिक अनुभवाची–ज्ञानेश्वरकृत-भ० पृ. ८१, क्र. १८

ही अखेरची आरती भक्तिमार्गप्रदीपांत सद्गुरूची म्हणून दिली आहे, परंतु ती वास्तविक ‘ पारमार्थिक अनुभव ’ ( Mystical experience ) या अमूर्त कल्पनेची असावी असें त्यांतील ध्रुवपदावरून वाटतें. तें असें—

“ तें सुख काय सांगों; वाचे बोलतां नये
आरतीचेनि गुणें, गेलें मीपण माये ” ॥

ही अनुभवाची आरती ज्ञानेश्वरांनी करावी हा समसमां संयोगच म्हणावयाचा !

## ६. ग्रह

ग्रंथांप्रमाणे ग्रहांच्याहि आरत्या येथे गाइल्या जात होत्या.

( १ ) चंद्राची—मोरेश्वरसुत काशीकृत—बाड क्र. ६०८
( २ ) सूर्याची—भक्तिमार्गप्रदीप— पृ. ७४

## ७. दिनविशेष

चंद्रसूर्याप्रमाणे संकष्टीचतुर्थीची एक आरती उपलब्ध आहे.
संकष्टचतुर्थीची— एकनाथकृत-- बाड क्र. ६०८

## ८. वनस्पति

देवतेसमान असलेली एक वनस्पति, तुळशी, हिची आरती--
तुळशीची-- अनंतदेवकृत-- बाड क्र. १४९९
,, भक्तिमार्गप्रदीप-- पृ. ८५

वट हा वृक्ष महाराष्ट्रांत तुळशीइतकाच वंद्य व प्रिय पण त्याची आरती मला मिळाली नाहीं.

## ९. ऐतिहासिक व्यक्ति

शुद्ध धार्मिक किंवा तत्त्वज्ञानात्मक अधिष्ठान ज्यांना होतें अशा आठ स्तुतियोग्य वर्ण्य विषयांनंतर आरतीने आपलीं पावलें किंचित् वळवलीं. श्रद्धेचा व भक्तीचा भाग तोच राहिला तरी अलौकिकाकडून लौकिकाकडे तिचें लक्ष गेलें आणि थोर ऐतिहासिक व्यक्ति, राजे, पुढारी यांच्या आरत्या होऊं लागल्या—

( १ ) शिवाजी महाराजांची-- सावरकरकृत.
( २ ) लोकमान्य टिळकांची-- स्वातंत्र्यशाहीर गोविंदकृत.
( ३ ) अमरसिंहाची—शेषसुतकृत-- बाड क्र. १४९८

“ जयदेव जयदेव जय अमरेश्वरा
आरती ओवाळूं तुज दिल्लीश्वरा ॥ ध्रु० ॥

अनुक्रमणिका

मध्यार्जुनीं उभय कावेरीमाजी
उभयललनायुक्त राहिला आजी ॥ १ ॥ ''

अमरसिंह हा तंजावरचा राजा. पदच्युत अवस्थेंतहि त्यास दिल्लीश्वर म्हणणें ही अतिरिक्त स्तुति, भक्ति, तोंडपुजेपणा कीं विडंबन?—हा प्रश्न ही आरती वाचतांना राहून राहून मनांत येतो.

## १०. विडंबनात्मक आरत्या

अलौकिकाकडून लौकिकाकडे वळल्यावर कालांतरानें आरतीचा एक माध्यम म्हणून विडंबनासाठीं उपयोग होऊं लागला; आणि केवळ लौकिक परंतु थोर व्यक्तींऐवजी थोडेंबहुत नांव कमावलेल्या सामान्य जनांची विनोदी कवि 'आरती' करूं लागले.

( १ ) " सुखकर्ता दुखहर्ता वार्ता युद्धाची।
भंवेरी उडाली मॅक आर्थराची।
कॉंग्रेसमध्यें सरशी टंडनबाबूंची।
शोभा झाली बाबा पंचेवाल्यांची।
जयदेव जयदेव जय मंगलमूर्ती। काळ्या बाजाराला येऊं दे भरती ॥ "

आचार्य अत्रे : 'नवयुग'

( २ ) " जयदेवी जयदेवी जय म्युनिसिपालटी।
नगरभवानी अंबे तव कीर्ति मोठी ॥"

—नागपूर, गणपति-मेळा.

या विडंबनात्मक आरत्यांमागे भावभक्ति नव्हती तर विनोदबुद्धि होती, त्यांत स्तुति नव्हती तर उपहास होता; त्यांच्या गायनानें समुदाय भावाकुल होऊन भक्तिवश होत नव्हता, तर त्यांतील अवखळ उपहासानें गुदगुल्या होऊन खदखदा हंसत होता. श्रद्धेचें युग संपून बुद्धि-निष्ठेचें युग सुरू झालें होतें, याची ती एक साक्ष होती. हा प्रभाव काळाचा होता !

पण या बुद्धिनिष्ठ यंत्रयुगांतहि मराठीच्या भाविक भूमींत कोठेतरी श्रद्धा रुजत होती आणि विदर्भांत त्यास एक कोवळा आणि नव्हाळीचा अंकुर फुटला होता. देवकल्पना अजिबात सोडण्याऐवजी शेतीच्या एका अवजारालाच देवता मानून तिची आरती करण्यांत तो अंकुर गुंग होता.

जिच्या साहाय्यानें जमिनींत पेरणी करून आपण धान्य पिकवतों आणि जीवन समृद्ध करतों त्या 'तिफनी'विषयीं अपार कृतज्ञता आणि असीम जिव्हाळा मनांत दाटून विदर्भांतला शेतकरी भक्तिभावानें 'तिफनची आरती' गातो. त्याचें नित्य जीवन ज्यावर अवलंबून त्या बैलांस 'नंदी' म्हणून आदरानें संबोधून त्यांनाहि या आरतींत शेतकरी मानाचें स्थान देतो आणि शेतकीच्या इतर कांही अवजारांचें 'तिफनी'शीं नातें जुळवतो. वऱ्हाडच्या लोकगीतांत जिचा समावेश व्हावा अशी ही 'तिफनची आरती'[१६] आजहि तेथील शेतकरी गातो.

एक अभिनव आरती ती हीच ! तिचा विषयहि पूर्वीच्या आरत्यांहून अगदी नवा

१६. आरतीच्या वर्ण्यविषयाच्या वर्गीकरणांत 'उद्योगाचें साधन' असा एक वेगळा अकरावा भाग करून त्यांत 'तिफनची आरती' समाविष्ट करतां येईल. कारण, तिफन हें पेरणीचें एक अवजार म्हणजेच शेतीच्या उद्योगाचें एक साधन आहे.

आणि तिची भाषाहि त्या आरत्यांहून नवीच ! अंतरांतला भाव तोच पण अभिव्यक्तीची पद्धत नवी ! 'तिफनची आरती' सारीच अभिनव !

कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांनी आपल्या 'छंदोरचना' या ग्रंथांत 'हरिभगिनी' जातीची रचना [ प । प । प — — + ] अशी दिली आहे.[१७] 'तिफनची आरती' त्या प्रकारांत समाविष्ट करण्यास हरकत नसावी असें वाटतें. मात्र या आरतीची रचना शिथिल असून अखेरच्या अपूर्ण आवर्तनांतील उपान्त्य अक्षर क्वचित् लघु असलें तरी उच्चारतांना तें गुरु करण्याकडे शेतकऱ्याची प्रवृत्ति दिसते. उदा०— । । । '। तोड हो ।' यांतील 'ड' चा उच्चार जोर देऊन व थोडा लांबवून [ डंऽ ] गुरु केला जातो. तसेंच दिवस हा शब्द 'दीवस' असा उच्चारला जातो. या आरतीचा उगम आणि तिचा गायक-समुदाय ध्यानांत घेतला तर अशा प्रकारची शिथिलता अस्वाभाविक खासच वाटणार नाहीं.

ही 'तिफनची आरती' अकोला जिल्ह्यांतील भोकर येथील रहिवासी 'श्री. महादेव नथ्थुसा सोनार' यांच्याकडून मिळाली. मराठीनें हरवलेली ही हिकरणी तिच्या अभ्यासकांच्या स्वाधीन केल्याबद्दल मराठी भाषा व तिचे अभ्यासक त्यांचे नेहमींच ऋणी राहतील.

## 'तिफनची[१] आरती'

आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो ॥
दिवस पाहूनिया बुधवार कुनब्या काटी तोड हो ।
काटी[२] तोडूनिया अवचीत कामठयावर नीट हो ।
कामठा[३] पुजोनियां सुतारा धन्य तु कारागीरा हो ।
दोरा टाकूनिया दोघानं चौपट केली वाक्सान्[४] हो ।
तिफन टोचली अट्टंकार[५] दांडीचा झणकार[६] हो ।
तीनी खूट हे तोडले तिफनीसी भिडवीले हो ।
तीनी दाते हे सोनेरी त्याला पाहुन बेरी[७] हो ।
तीनी फाय्[८] कांब्यापोटीं भिळवावर[९] फाय्चा चुळा[१०] हो ।
तीनी नयाचा[११] सुमार ओढून चाळ दोर हो ।
आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो ॥
रूमन[१२] भीळोनिया मणपोटीं[१३] तिफनकऱ्याच्या मुठी हो ।
आगोला[१४] लाधुनिया बोंडयासि[१५] पुळें वीळ्या[१६] त्यासी हो ।

---

१७. डॉ. पटवर्धन : 'छंदोरचना', प्र. जातिजृम्भण, पृ. ३६८. उदा०— (४) "दीन तुका विन–।–वी कर जोडुनी । नाम तुझें जग–।–पाळा रे ।"

१. तिफन = तीन नळ्या, फण असलेली पाभर, पेरण्याचें यंत्र. २. काटी = बाभूळ. ३. कामठा = सुताराने जमिनींत ठोकलेलें लाकूड. ४. वाकस = सुताराचें हत्यार, तासणी. ५. अट्टंकार = आरपार भोंक. ६. झनकार (झणकार) = झटका. ७. बेरी = भोंक. ८. फाय = फाळ. ९. भिळ्वा = भिडवा. १०. चुळा = पातें. ११. नयाचा = नळ्याचा. १२. रूमन = रुमण, लुमण, नांगराचा हातांत धरायचा खुंट. १३. मणपोटीं = मध्यभागीं, पोटाशीं. १४. आगोला = पहिली बैलजोडी. १५. बोंड्यासि = जाड दोराला. १६. वीळ्या = लाकडाचे वीतभर तुकडे.

आगोला लांबोरे दोरखंड साहा बैल कुरखंड[1] हो।
लोधा[2] बांधोनिया तिफनीवर तिफनकऱ्याचा जोर हो।
ओटी[3] बांधोनिया अवचीत वर दोरीची गांठ हो।
मांजरे[4] लावोनिया जुवाशीं मुचके[5] बैलांशीं हो।
आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो॥
धारया[6] धरोनिया पाहिल्यानं पुढे चाले ठाकून हो।
तिफन जुतोनिया तिफन्यानं तासावर[7] लावून हो।
तास काढोनिया समोर वर सुर्याचें तेज हो।
तिफन गेली हे सेत्यावर[8] वखर[9] ईचा देर[10] हो।
तिफन आहे हे सती एक डवरा[9] ईचा लेक हो।
तिफन आहे हे अपार नांगर ईचा भरतार हो।
आगोल्या सुरल्याची आहे गांठ तिफनकरी नीट हो।
बैला मारूं नको तू काळी[11] तासा पडील आळी[12] हो।
उनाऱ्या[13] उनारतो जगजेठी धरतरीच्या पोटीं हो।
आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो॥
पुडी आनूनिया रंगाची बैलाच्या शिंगाशीं हो।
मनके बांधुनि कपाळाला चाळबोळ बांधा त्याला हो।
झुला टाकोनि नंदीवर हो त्यावर राघोमोर हो।
आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो॥
खोपडी[14] आनोनी धांड्याची[15] दुगटा लावा त्यासी हो।
पांडव करोनिया कांबीचे[16] हळदीकुंकवाचे हो।
जग्र[17] मांडोनि हो गवऱ्याचं वर मापुल दुधाचं हो।
पांडव निघाले वनांत संवंदळ[18] खालीं ठान[19] हो।
नंदी चालले झपाट्यानं कासरा धरा आवरून हो।
आरती ओवाळूं तिफनी नंदी तुझे दोन्ही हो।
। हली भला[20] महादेव।

---

१. कुरखंड = मोठे. २. लोधा = मातीचें ओझें. ३. ओटी = धान्याची पिशवी. ४. मांजरे = बैलाच्या पायांत दोर अडकूं नये म्हणून बांधलेल्या दोऱ्या. ५. मुचके = बैलानें धान्य खाऊं नये म्हणून त्याच्या तोंडाला बांधलेली दोऱ्याची किंवा बुरुडाची जाळी. ६. धारया = तीक्ष्ण कोयता लावलेला बांबू, हा तिफनीपुढे धरायचा. ७. तास = पाभरीने जमिनीस पडणारी रेघा. ८. सेत्यावर = पलीकडल्या मेरीवर. ९. वखर, डवरा = तण काढण्याचीं, कोळपण्याचीं हत्यारें. १०. देर = दीर. ११. काळी = पराणी. १२. आळी पडेल=वेडेंवाकडें होईल. १३. उनाऱ्या=धान्य विवक्षित क्रमाने सोडणारा. १४. खोपडी=पेंढी. १५. धांडा=ज्वारीचें, कडब्याचें ताट. १६. कांबी = ताटाचे लांबट तुकडे. १७. जग्र = जगर, निखाऱ्यांचा ढीग, विस्तव. १८. संवंदळ = सौंदळ नांवाचें झाड, शमी. १९. ठान = ठाण. २०. हली भला महादेव = महादेव शेतकऱ्यांचें भलें करो.

* * *

४

## श्री. मा. कुलकर्णी

# कादंबरी – १९६१

१९६१ सालांत सुमारें तीस कादंबऱ्या पुस्तकरूपाने प्रकाशित झाल्या आहेत. त्यांतील पांच अनुवादित आहेत. उरलेल्या २५ पैकीं १०–१२ तरी कादंबऱ्या या खऱ्या अर्थाने कादंबऱ्या नसून दीर्घकथा किंवा क्वचित् अपुऱ्या वाढीच्या कादंबऱ्या आहेत. राहिलेल्या पंधरांपैकींहि कादंबरी म्हणून ज्यांचा दर्जा वरचा ठरेल अशा फारच थोड्या. हा हिशोब निराशाजनक तर खराच, पण तो मराठी वाङ्मयाच्या विशेषतः कादंबरी-वाङ्मयाच्या अभ्यासकाला व चाहत्याला विचार करायला लावणारा आहे.

या वर्षी प्रकाशित झालेल्या कादंबऱ्यांत मराठी कादंबरीची बूज जर कोणीं राखली असेल तर ती मराठींतील ज्येष्ठ कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके यांनी होय. 'कुहू कुहू', 'कठपुतळी', 'निर्माल्य' आणि 'वेडं वारं' अशा त्यांच्या चार कादंबऱ्या या वर्षी पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्या आहेत. या चारहि कादंबऱ्या केवळ इतरांच्या अपेक्षेनेच नव्हे तर स्वतःसिद्ध गुणांमुळेंहि श्रेष्ठ ठरणाऱ्या आहेत.

'कुहू कुहू' ही फडक्यांची ५० वी कादंबरी. तिच्या प्रकाशनाच्या निमित्ताने प्रा. फडक्यांच्या चाहत्यांकडून त्यांचा उचित असा गौरव झाला होता. या कादंबरींत त्यांनी मांडलेला मानवी जीवनाविषयीचा विचार त्यांच्या आशावादी दृष्टिकोनाचा द्योतक आहे. "माणसाच्या अंतःकरणांतच आशा नांवाची एक कोकिला आहे. संकटाचे कितीहि पावसाळे येऊन गेले, निराशेचे कितीहि हिवाळे उलटले, तरी माणसाच्या अंतःकरणांतला वसंत ऋतु पुनःपुन्हा येतोच. 'कुहू कुहू'चा वासंतिक शब्द उठत राहतोच." हा त्यांचा विचार सर्वांना पटो अगर न पटो, पण फडक्यांची प्रतिभा मात्र या आशेच्या कोकिळेसारखी आहे खरी ! आणि ती वसंतऋतूंतच कुहू कुहू करते असें नव्हे तर ऐन दिवाळींतहि एकदा तिचा पंचम स्वर हमखास ऐकायला येतो. १९१२ च्या सुमारास मारी कॉरेलीच्या 'थेल्मा' या कादंबरीचें रुपांतर 'केरळकोकीळ'मध्ये प्रसिद्ध करून फडक्यांनी आपल्या कादंबरी-लेखनाला प्रारंभ केला. त्याला आज ६२ सालीं पन्नास वर्षें झालीं. या पन्नास वर्षांत पन्नासाहूनहि अधिक कादंबऱ्या निष्ठेने लिहून मराठी कादंबरी-वाङ्मयाची अखंड सेवा करणारा दुसरा लेखक विरळा. कादंबरीकार म्हणून लोकप्रिय झाल्यानंतर सतत तीस-चाळीस वर्षे ती लोकप्रियता टिकविणें आणि आणखी पुष्कळ कादंबऱ्या लिहिण्याची उमेद बाळगणें ही सामान्य गोष्ट नव्हे. या निष्ठापूर्वक सेवेबद्दल रसिकांनी कृतज्ञताच व्यक्त करायला पाहिजे. ही कृतज्ञता एकीकडे व्यक्त करीत असतांनाच फडक्यांची जागा घेऊं शकेल असा एकहि कादंबरीकार पुढे येऊं नये व ६१ सालीं देखील निर्मितीचा मोठा वांटा प्रा. फडक्यांनाच उचलावा लागावा याबद्दल निराशा वाटल्याशिवाय राहत नाही. हें विधान करीत असतांना ज्यांनी फडक्यांच्या कादंबऱ्यांपेक्षाहि सरस अशा कांही कादंबऱ्या लिहिल्या असे कांही विद्यमान कादंबरीकार माझ्या ध्यानांतून सुटलेले नाहीत. तरीपण कादंबरीकाराच्याच भूमिकेवरून उत्साहाने व उमेदीने, आस्थेने व निष्ठेने, कादंबरी-लेखन

करून अनेक कलाकृतींची कादंबरी-वाङ्मयांत भर घालणारा प्रा. फडक्यांशिवाय दुसरा कादं-बरीकार कोणी आहे असें कोणालाहि दाखवितां येणार नाही.

फडक्यांच्या या चारी कादंबऱ्या म्हटल्याच तर प्रेमकथा आहेत. त्यांच्यावर सुप्रसिद्ध असा 'फडके छाप' हि आहे. परंतु हें अगदीच स्थूल दृष्टीनें पाहणें झालें. थोड्याशा बारकाईने पाहिल्या सवा चारहि कादंबऱ्यांचें कथाविश्व परस्परांहून भिन्न असल्यानें दिसेल. कादंबरीच्या कार्यासंबंधी अलीकडे प्रा. फडके जी भाषा वापरतात ती वापरून बोलायचें झालें तर या कादंबऱ्यांतून मानवी आयुष्याच्या अनंत प्रकारांपैकी कांही लक्षणीय व विलोभनीय असे प्रकार अनुभवायला मिळतात आणि वाचकांचा अनुभव, एका विशिष्ट पातळीवरूनच का होईना, विस्तृत आणि समृद्ध होतो.

'कुहू कुहू' या कादंबरीची नायिका अबोली अंबेशीकर हिच्याद्वारा रंगभूमि व चित्रपट या दोन्ही कलाविश्वांतील मोहांनी व धोक्यांनी भरलेल्या जीवनाचा यथार्थ परिचय वाचकांना होतो. अबोली ही श्यामसुंदर नांवाच्या अव्वल दर्जाच्या गायक नटाची, रूपाने सामान्य पण आवाजाची स्वर्गीय देणगी लाभलेली अशी मुलगी. वयाची तिशी उलटेपर्यंतच्या दोन-अडीच तपांच्या काळांतच दैवाचे अनेक चढउतार तिच्या अनुभवाला आले. एका परीने बापाच्या आयुष्याची छायाच तिच्या आयुष्यावर पडलेली दिसते. संपत्ति व कीर्ति यांचें शिखर जसें त्याने गाठलें तसेंच दारिद्र्यापायी होणारे हाल व व्यसनापायी होणारी अपकीर्ति यांची खोल दरीहि त्याने गाठली. बापाच्या संगतींत या दोन्ही अवस्थांतील सुखदुःखें अबोलीच्या वांट्याला आलीं. पण त्याच्या मृत्यूनंतर तिच्या आयुष्याची अधिकच परवड कांही काळ झाली. आपल्या वांट्याला आलेल्या अनाथाश्रमांतील प्रेमहीन जीवनाला कंटाळून तिथून ती निसटते. ते थेट सिनेमा निर्मात्यांना एक्स्ट्रॉ नट्या पुरविणाऱ्या दादाच्या तावडींत सापडते. एक्स्ट्रॉ नटीच्या वांट्याला येणाऱ्या खडतर व लाजिरवाण्या जीवनाचा कटु अनुभव आल्यामुळे आत्महत्येला ती प्रवृत्त होते. परंतु तिच्या बापाचा एक चाहता व भक्त यदुनाथ अनपेक्षितपणें तिला वांचवतो आणि तिच्या आयुष्याला निराळें वळण लागतें. पार्श्वगायिका म्हणून तिला भरपूर संपत्तीची व कीर्तीची जोड होते. पण रघु कार्तिक या तेजतर्रार पंजाबी तरुणाच्या रूपाने तिच्या आयुष्यांत दुर्दैवाचा पुनः प्रवेश होतो; आणि प्रेमाच्या बाबतींत तिची दारुण फसवणूक होते. त्यांतून ती सावरते तोंच दैवाचा आणखी एक तडाखा तिला बसतो. या वेळेला एका अपघातांत सापडून ती आपला आवाजच गमावून बसते. दुर्दैवाप्रमाणेच दैवहि तिच्या पाठीशीं असल्यामुळे त्यांतूनहि ती वर येते. तिचा आवाज पुन्हा परत येतो, आणि तो ज्याच्यामुळे परत आला त्या तरुण डॉक्टराच्याविषयी तिच्या मनांत प्रीतीचा प्रादुर्भाव होतो. अशा रीतीने सुखदुःखांच्या अनेक अवस्थांतून ती जाते. परंतु सुखाच्या वसंताचें आगमन होतांच तिच्या अन्तःकरणांतील आशेची कोकिळा पुनःपुन्हा 'कुहू कुहू'ची साद घालते.

ही कादंबरी अबोलीच्या सुखदुःखांची कहाणी असली तरी ती सांगण्याच्या निमित्ताने व सांगत असतांना फडक्यांनी विविध पात्रांचें आणि प्रसंगांचें प्रभावी चित्रण केलेलें आहे आणि हिरव्या, पांढऱ्या पडद्यामागच्या जीवनाचें दर्शन घडवून वाचकांचा क्वचित् भ्रमनिरास केला आहे, तर क्वचित् त्यांचा अनुभव सुजाण व समृद्ध केला आहे.

या कादंबरींतील श्यामसुंदरचें चित्र व चरित्र पाहून महाराष्ट्रांतील एका सुप्रसिद्ध दिवंगत गायक नटाचें स्मरण होण्यासारखें आहे. तसेंच अबोलीच्या जीवनचित्राकडे पाहून

एका सुप्रसिद्ध पार्श्वगायिकेची आठवण होण्यासारखी आहे. हें साम्य जाणीवपूर्वक निर्माण केलें असेल किंवा नसेलहि, पण तें अगदीच योगायोगानें आलें असेल असेंहि म्हणवत नाही. तें कसेंहि असलें तरी कलेच्या दृष्टीने कांही गौणत्व किंवा नीतीच्या दृष्टीनें गर्हणीयत्व या चित्रणाला प्राप्त झालें आहे असें मला वाटत नाही.

निर्माल्य ही 'कुहू कुहू'च्या अगोदरची कादंबरी होय. तिच्याद्वाराहि जो आशय फडक्यांनी मांडला आहे तो त्यांचा आशावादी दृष्टिकोनच दाखविणारा आहे. मनुष्य कितीहि सामान्य असला तरी त्याच्याहि आयुष्याला महत्त्व आहेच. त्यानें तें निर्माल्यवत् समजूं नये अशा प्रकारचें तत्त्व या कादंबरींतून त्यांनी सूचित केलें आहे.

फडक्यांच्या कादंबऱ्यांत जीवनाच्या अनेक तऱ्हा पाहायला मिळतात. प्रेमकथा असा शिक्का मारून कांहीशा हेटाळणीनें फडक्यांच्या कादंबऱ्यांकडे पाहणें अन्यायाचें होईल. अनेक कादंबऱ्यांतील स्थळ, काळ, परिस्थिति व व्यक्ति यांतील निराळेपणा पाहिला म्हणजे असा विचार मनांत येतो की, या जादूगाराच्या पोतडींत किती विविध चिजा भरलेल्या आहेत. 'निर्माल्य' या कादंबरींतहि अशाच कांही चिजा पाहायला सापडतात. रूढ अर्थानें या कथेला प्रेमकथा म्हणतां येणार नाही. मिलिंद नांवाच्या गरिबींतून कसाबसा मार्ग काढून वर आलेल्या एका मध्यमवर्गीय सामान्य तरुणाच्या सुखदुःखांची ही कहाणी आहे. तीं सुखदुःखें निर्माण करण्याला निमित्त झालेल्या कांही व्यक्ति आणि ते सुखदुःखांचे अनेक प्रसंग यांनी ह्या कादं-बरीचें कथानक साकारलें आहे.

दुसरें महायुद्ध, सुभाषचंद्र बोस यांचा स्वातंत्र्यप्राप्तीचा प्रयत्न, स्वातंत्र्यप्राप्ति, आझाद हिंद फौजेची वाताहत या सर्वांच्या वर्णनाची पार्श्वभूमि या कथानकाला प्राप्त झाली आहे. या कथानकांत वावरणाऱ्या अनेक व्यक्तीहि नवीन वाटण्यासारख्या आहेत. प्लँचेटचा कथानकांत ओघानें आलेला उल्लेख व झालेला उपयोगहि नवीन आहे. एकंदरीनें वैचित्र्यपूर्ण मानवी जीवनाचा धावता परिचय चित्तवेधक रीतीनें या कादंबरीच्या द्वारा फडक्यांनी घडविला आहे.

'वेडं वारं' ही त्यांची तिसरी कादंबरी म्हणजे एक प्रीतिकथाच असली तरी ती वेगळ्या प्रकारची आहे. तिच्यांत एक नव्हे तर प्रीतीच्या तीन तऱ्हा पाहायला सापडतात. सुमति, मालती व रेवती ह्या तीन बहिणींच्या प्रेमाचे तीन नमुने या कादंबरींत पाहायला मिळतात. त्यांचे वडील दादासाहेब साने औषधांचें दुकान चालविणारे सुशिक्षित व सुखवस्तु गृहस्थ होते. सर्वांत वडील सुमति वयाच्या सहाव्या वर्षीच पंगु झालेली होती. त्यामुळें घरांतल्या-घरांत देखील कोणाच्या तरी आधाराशिवाय तिला हिंडतां फिरतां येत नसे. मात्र घरीं शिक्षक ठेवून दादासाहेबांनी तिचें शिक्षण चालू ठेवलें होतें. मालती व रेवती ह्या मात्र शाळेंत जात होत्या व त्यांचें शिक्षण व्यवस्थित चालू होतें. तिघीहि बहिणी सुस्वरूप होत्या. सुमतीचा आजार ही एक बाब सोडली तर या कुटुंबाचें जीवन दृष्ट लागावी असें होतें. तारुण्यांत प्रवेश केल्यानंतर तिघींहि प्रीतीच्या 'वेड्या वाऱ्यांत' सापडल्या. पण प्रत्येकीच्यां प्रतिक्रियेचा आविष्कार किती वेगळा! सुमतीचें प्रेम तिच्या आतेभावावर–रामवर–होतें. त्याचेंहि तिच्यावर होतें. परंतु आपल्या पंगूपणामुळे त्याच्या आयुष्यांत दुःख उत्पन्न होऊं नये म्हणून आपली प्रीति ती दडवून ठेवते. इतकेंच नव्हे तर, रामसह सर्वांनी त्याच्याशीं विवाह करण्याचा तिला परोपरीनें आग्रह केला असतांहि ती त्याला तयार होत नाही.

सुमतीचें प्रेम मूक व त्यागी, तर मालतीचें प्रेम उच्छृंखल व आंधळें. मालती व रेवती पुण्याला वसतिगृहांत राहून कॉलेजांत शिकत असतांना मालती एक नंबरच्या उनाड आणि धोकेबाज अशा एका तथाकथित विद्यार्थ्याच्या जाळ्यांत सापडून आपल्या आयुष्याचा सत्यानाश करून घेते. दोघां वडील बहिणींच्या दोन तऱ्हांनी रेवतीवर खोल परिणाम केला. त्यामुळे ती अधिक जपून पाऊल टाकते. परंतु दिल्लीला एकटीच राहून एम्. ए. चा अभ्यास करीत असतांना पूर्व पाकिस्तानांतून निर्वासित होऊन आलेल्या हरीश नांवाच्या एका पंजाबी तरुणाचा तिच्या जीवनांत प्रवेश होतो आणि प्रीतीचें हें 'वेडं वारं' तिलाहि झपाटतें. मात्र ती त्यांत वाहवून जात नाही. त्याच्याशीं विवाह ठरल्यानंतर अकस्मातच तिच्या आई-वडिलांचा अपघातांत अंत होतो आणि निराधार झालेल्या सुमतीला आधार देण्याच्या कर्तव्य-बुद्धीने हरीशशीं लग्न करण्याचें ती सोडून देते.

सुमति व रेवती ह्या दोघींच्याहि प्रीतीला त्यागामुळे उदात्ततेचा उजाळा मिळतो आणि त्या दोघींचींहि जीवनें वाचकांच्या मनावर खोल ठसा उमटवितात. मालतीला देखील आपल्या कृतकर्माचा पश्चात्ताप होतो व ती आपलें जीवन अनाथांच्या सेवेंत खर्ची घालते. त्यामुळे तिच्याविषयीहि करुणा व सहानुभूतीच वाचकांना वाटते. तारुण्यांतली पहिली प्रीति ही एखाद्या वेड्या वाऱ्यासारखी आहे अशा प्रकारचा विचार या कादंबरीच्या द्वारा फडक्यांना मांडायचा होता असें ते म्हणतात. परंतु त्या विचारापेक्षाहि वाचकांचें लक्ष या तीन बहिणींच्या व्यक्तिरेखांकडे अधिक आकृष्ट होतें आणि त्यांचीं जीवनें वाचकांना चटका लावतात.

या तीनहि कादंबऱ्यांपेक्षा किंबहुना फडक्यांच्या इतर अनेक कादंबऱ्यांपेक्षा त्यांची 'कठपुतळी' ही अगदी वेगळी आहे. मनुष्य हा दैवाच्या अथवा नियतीच्या हातांतील एक बाहुलें आहे. दैव हें सूत्रधार आणि त्या सूत्राच्या हालचालीबरहुकूम हालचाली करणारी कठपुतळी म्हणजे मनुष्य अशा प्रकारचा जीवनाविषयीचा, फडक्यांच्या कादंबऱ्यांत सहसा न आढळणारा, आशय या कादंबरींत आहे. दैव कधीकधी एखाद्या व्यक्तीच्या आयुष्याचें सूत्र दुसऱ्या एखाद्या व्यक्तीच्या हातीं देतें आणि त्या व्यक्तीच्या इच्छेनुरूप त्या दुसऱ्या व्यक्तीला वागावें लागतें हाहि त्या आशयाचाच एक भाग आहे. या वेगळ्या आशयाप्रमाणेच या कादंबरींतील जीवनदर्शनहि वेगळें आहे. त्यांत वावरणाऱ्या मोजक्याच व्यक्ति भिन्न भिन्न जगांतील आहेत. सुरेन्द्र रानडे हा एक सत्प्रवृत्त व कर्तबगार तरुण एका बँकेचा मॅनेजर व हौशी नट व सरिता मराठे ही एका बड्या बापाची सुशिक्षित, सुस्वरूप व आकाशवाणी केंद्रांत नोकरी करणारी तरुणी या दोघांचाहि परिचय होऊन त्यांचें प्रेमांत रूपांतर होतें आणि दोघांचा विवाह होण्या-चेंहि निश्चित होतें. परंतु दैवाने कांही वेगळें योजलें होतें; आणि अगदी अकल्पितरीत्या करुणा नांवाच्या एका विवाहित परंतु परित्यक्त अशा दुर्दैवी स्त्रीचा त्याच्या आयुष्यांत प्रवेश होतो. जगांत कुठेच आधार नसलेल्या या स्त्रीला आधार देण्याच्या सद्बुद्धीनेच व कांहीशा अपरिहार्य-पणेंहि सुरेन्द्र तिला आश्रय देतो. पण त्यामुळे गैरसमज करून घेऊन सरिता त्याच्यापासून दूर जाते. एका माणसाने बँकेच्या व्यवहारांत त्याला फसविल्यामुळे त्याची नोकरीहि जाते. प्रेमाला व नोकरीला मुकल्यानंतरहि आणि समाजामध्ये अपकीर्ति झाली असतांनाहि सुरेन्द्र करुणेला अंतर देत नाही, आणि सर्व आपत्तींना धैर्याने तोंड देत राहतो. पुढे त्याला बरे दिवस येतात. दरम्यान कृतज्ञतेच्या पोटीं करुणेच्या मनांत सुरेंद्राविषयी भक्तियुक्त प्रेम प्रादुर्भूत होतें. सुरेंद्राच्या मनांतहि सहानुभूतीच्या पोटीं अशाच प्रीतीचा जन्म होतो. मात्र दोघेहि हें प्रेम मनांतच ठेवून संयमाने यथापूर्व वागत राहतात. शेवटीं करुणेच्या पूर्वायुष्यांतील एक खलपुरुष तिचा छळ

करण्याला अचानक जेव्हा उद्भवतो तेव्हा त्याच्यापासून तिची कायमची सुटका करण्याचा निर्णय सुरेंद्र घेतो; आणि करुणेशीं विवाहबद्ध होण्याच्या निर्णयाबरोबरच स्वतःच्या संयमी प्रेमाचा उच्चार तो करतो. इथेच कादंबरी संपते.

करुणेच्या दुःखी कहाणीमुळे या कथेंत कारुण्याची छटा मिसळली आहे, तर सुरेन्द्राच्या सत्प्रवृत्त व कर्तव्यदक्ष व्यक्तित्वामुळे तिला उदात्तता प्राप्त झाली आहे. या करुणोदात्ततेमुळे ही कादंबरी वाचकांच्या मनावर खोल परिणाम करते. या कादंबरीचा शेवट सुखकारक करण्यांत फडक्यांचा आशावादी दृष्टिकोनच व्यक्त झाला आहे. मात्र तो कृत्रिम किंवा ओढूनताणून आणलेला असा वाटत नाही. त्यांत किंचित् आदर्शवादाचीहि झाक आहे. या सर्व कारणांसाठी फडक्यांची ही कादंबरी वेगळी व आगळी ठरते.

फडक्यांचे म्हणून जे कलागुण आहेत ते या चारहि कादंबऱ्यांत प्रकर्षानें प्रकट झाले आहेत. कथानक फुलवीत नेण्याचें व अनेक लहानमोठ्या प्रसंगांच्या वास्तव परंतु चटकदार चित्रणाने त्याला खुलविण्याचें त्यांचें कसब असामान्य आहे. स्थळकाळाचीं अचूक वर्णनें करून निरनिराळ्या प्रसंगांना व एकंदर कथानकाला पार्श्वभूमि ते निर्माण करतात. कथानकाइतकेंच व्यक्तिदर्शनाकडेहि ते लक्ष देतात, आणि व्यक्तीच्या अंतरंगाप्रमाणेच बाह्यांगाचेंहि वर्णन करून वर्ण्य व्यक्ति जिवंतपणें वाचकांच्या समोर उभी करतात. गौण व्यक्तींच्या चित्रणांतहि ते कसूर करीत नाहीत. थोडक्यांत उठावदार चित्रण केल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांतील कित्येक गौण पात्रें दीर्घकाळ स्मरणांत राहतात. या चारहि कादंबऱ्यांतून अनेक प्रमुख व गौण व्यक्ति फडक्यांनी उभ्या केल्या आहेत. प्रत्येक पात्राच्या जीवनाची तऱ्हा वेगळी असल्यामुळे या पात्रसृष्टींत वैचित्र्यहि भरपूर आलेलें आहे.

फडक्यांचें या सर्व बाबतींतील कौशल्य अद्याप चढतें-वाढतेंच आहे. त्यांत कांही-एका प्रमाणांत तोचतोपणा आढळला तरी तो अपरिहार्य आहे, आणि कोणालाहि तो टाळतां येत नाही ही गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे. त्यांच्या कादंबऱ्या वाचून कलात्मक रंजन भरपूर होतें. इतकेंच नव्हे तर, कादंबरीविषयक ज्या नव्या अपेक्षा फडक्यांनी स्वतः बाळगल्या आहेत, त्यांना अनुसरून वाचकांच्या जीवनविषयक माहितींत व अनुभवांत भरहि पडते. या दोन दृष्टींनी तर प्रस्तुत चार कादंबऱ्या स्वागतार्ह आहेतच, परंतु याहूनहि अधिक स्वागतार्ह अशी कोणती गोष्ट असेल तर ती ही की, या कादंबऱ्यांनी वरची पातळी गाठली आहे. ५९ सालांतल्या 'धोका' व 'भरारी' या कादंबऱ्यांच्यासंबंधी मीं असें लिहिलें होतें की, 'कादंबऱ्या बव्हंशीं वासनेच्या पातळीवर रेंगाळतात व पुनःपुन्हा तिलाच चाळवितात.' असा प्रकार या कादंबऱ्यांच्या बाबतींत झालेला नाही. वाचकांच्या कल्पनेला व भावनेला आवाहन करून क्वचित् त्यांच्या विचारशक्तीलाहि या कादंबऱ्या जागृत करतात. आणखी एक गोष्ट 'काय' व 'कसें' त्यांतहि 'कसें' वर प्रा. फडके विशेष भर देत आले आहेत. 'कुहू कुहू' या कादंबरीला जोडलेल्या प्रस्तावनेंत चांगलें लिहिणें म्हणजे काय हें त्यांनीं सोदाहरण दाखविलें आहे. 'कसें'ला फडक्यांनी दिलेलें महत्त्व योग्यच आहे. परंतु कादंबरीकाराने 'काय' व 'कसें' इथेच थांबावें काय ? 'कां ?' हा प्रश्न देखील त्याने हाताळायला हवा. याचाच अर्थ असा की, जीवनाचें नुसतें वास्तव दर्शन घडवूनच कादंबरी-काराने थांबूं नये तर जीवनाचा अर्थ त्याने उलगडून दाखवावा. कलावंत हा जीवनाचा भाष्यकारहि असतो व असायला हवा. सखोल चिंतनामुळेच त्याला हें शक्य होतें. या भाष्या-

मुळेच कादंबरीला लांबीरुंदीबरोबरच खोली हें एक तिसरें परिमाण प्राप्त होतें. प्रा. फडके यांना हें तिसरें परिमाण अमान्य असावें असें वाटतें आणि म्हणून लांबीरुंदीपुरतेंच आपलें जीवनचित्रण मर्यादित ठेवण्याचा कळत न कळत ते प्रयत्न करीत असावेत. पण तरीहि या चार कादंबऱ्या वाचतांना त्यांच्यांतील भाष्यकार जागा होत असल्याची चाहूल लागते आणि हीच माझ्या मतें सर्वांत अधिक स्वागतार्ह गोष्ट आहे.

फडक्यांच्या या चार कादंबऱ्या सोडल्या तर ६१ सालांतील फारच थोड्या कादंबऱ्या अशा आहेत की ज्यांचा स्वतंत्रपणाने परामर्श घ्यावा. अशा कादंबऱ्यांत माधव कानिटकर यांची 'अधर्म', चंद्रकांत काकोडकर यांची 'सुजाता' व उद्धव शेळके यांची 'अगतिका' ह्या प्रमुख होत.

माधव कानिटकरांनी कादंबरी-लेखनाला प्रारंभ करून दोन-तीनच वर्षे झालीं. परंतु या अवधींत त्यांच्या दहा-बारा कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. ६१ सालांतच 'इंद्रधनूचा सेतु', 'अनोळखी' व 'अधर्म' अशा त्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. परंतु यांतील पहिल्या दोन कादंबऱ्यांना कादंबऱ्या म्हणणें देखील कठीण आहे. दीर्घकथा किंवा अपुऱ्या वाढीची कादंबरी असेंच कांहींसें वर्णन त्यांचें करावें लागेल. 'अधर्म' हीच कादंबरी या नांवाला साजेशी अशी कथा आहे. लेखकानें संपूर्ण स्वतंत्र सामाजिक कादंबरी असें विशेषण तिला लावलेलें असलें तरी तिच्या सामाजिकतेचा ठसा कादंबरी वाचून मनावर उमटत नाहीं. रेणुका नांवाच्या एका परित्यक्त स्त्रीच्या वासनापूर्तीची व व्यभिचाराची ही कथा आहे. रेणुकेच्या दोन मुलींपैकी धाकटी जी सुगंधा तिच्या तारुण्यांतील एका मोहप्रसंगापासून या कादंबरीला प्रारंभ होतो, आणि शेवटहि त्या मोहप्रसंगांतून सावरून एका सच्छील तरुणाशीं तिचा विवाह निश्चित होण्यांत होतो. परंतु कादंबरीचा तीन-चतुर्थांश भाग सुगंधेच्या आईच्या म्हणजेच रेणुकेच्या जीवनकथेनें व्यापला आहे. त्यामुळे पहिल्या प्रकरणाच्या शेवटीं सुगंधेचे काय झालें हें जाणून घेण्याला उत्सुक असलेला वाचक शेवटपर्यंत तात्कळत राहतो आणि कांहींशा अनिच्छेनेच रेणुकेची दीर्घकथा वाचतो. फ्लॅश बॅक पद्धतीचा किंवा जिला फडक्यांनी सिंहावलोकन पद्धति असें नवें नांव दिलें आहे, त्या पद्धतीचा यथायोग्य उपयोग करतां न आल्यामुळे हें असें झालें आहे.

स्वतःचा कांहींहि अपराध नसतांना पतीनें त्याग केला त्यामुळे रेणुकेच्या स्वाभिमानाला धक्का बसतो व ती त्याचा सूड घेण्याच्या किंवा निदान त्याला वठणीवर आणण्याच्या ईर्षेने घराबाहेर पडते व एका वकिलाकडे जाते. पण हा तिचा बाणेदारपणा इथेंच संपतो आणि पुढच्या संपूर्ण आयुष्यांत एकामागोमाग एक अशा तीन पुरुषांच्या आहारीं जाऊन त्यांची व आपली वासनापूर्ति करण्यापलीकडे ती कांहींच करीत नाहीं. त्यामुळे या कथेनें सुरवातीला निर्माण केलेल्या अपेक्षा फोल ठरतात.

रेणुकेच्या वांट्याला जें जीवन आलें त्याची बव्हंशीं जबाबदारी तिच्यावरच येते. तिचा पति थोड्याफार प्रमाणांत त्याला जबाबदार आहे असें म्हटलें, तरी त्या गोष्टीवर कादंबरींत भर नाहीं आणि समाजानें तिला या जीवनांत लोटलें असाहि परिणाम कादंबरी वाचून मनावर होत नाहीं. त्यामुळे या कादंबरीचें स्वरूप सामाजिक न होतां वैयक्तिकच राहतें. कलात्मक परिणामाच्या दृष्टीनेंहि ती प्रभावी ठरत नाहीं. तथापि बहुप्रसवाच्या नादीं न लागतां प्रयत्न केल्यास श्री. कानिटकर हे चांगली कादंबरी लिहूं शकतील, अशी साधार आशा या कादंबरीनें निर्माण केली आहे.

कानिटकरांच्याप्रमाणेच चंद्रकांत काकोडकर हेहि बहुप्रसू लेखक दिसतात. त्यांच्यांहि ६१ सालीं चार कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. परंतु त्यांतील ' सुजाता ' ही एकच विशेष उल्लेखनीय आहे. पाकिस्तानच्या निर्मितीसाठी देशाची फाळणी झाली आणि त्यांतून निर्वासितांचा एक अभूतपूर्व वर्ग निर्माण झाला. या फाळणीच्या पार्श्वभूमीवरील ही कादंबरी आहे. पूर्व बंगालांतील एका गावच्या जमीनदाराच्या मुलाची –विपिनची– व त्याच गावांतील एका गरीब कुटुंबांतील मुलीची –सुजाताची– ही कथा आहे. सुजाताला सून करून घेण्याचें वचन बड्याबाबूंनीं तिच्या वडिलांना दिलें होतें. सुजाता व विपिन लहानपणीं एकत्र खेळले, वाढले. विपिन कलकत्त्याला उच्च शिक्षणासाठी गेला व तें पूर्ण करून तो परत आला. त्या दरम्यान सुजाताचें प्रेम दुसऱ्या एका तरुणावर –जितेंद्रवर– बसलें आणि बड्याबाबूंनीं रीतसर घातलेल्या मागणीला सुजाताने नकार दिला. पाकिस्तानची निर्मिति जवळ आल्यामुळे गावांतील वातावरण तंग झालें आणि पश्चिम बंगालांत जाणाऱ्या असंख्य लोकांबरोबर सुजाताशीं लग्न न करतांच जितेंद्रहि निघून गेला. सुजाताच्या घरावर आलेल्या हल्ल्यांत तिचे वडील ठार होतात व ती गुंडांच्या तावडींत सापडून शीलभ्रष्ट होते. ही बातमी लागतांच विपिन तिच्या मदतीला धावून येतो आणि मोठ्या धाडसाने तिची सुटका करतो. पाठोपाठ होणाऱ्या हल्ल्यांत विपिन सर्वस्व गमावतो व निर्वासित होऊन भारताकडे धाव घेतो. मात्र सुजाताला तो अंतर देत नाही. कलकत्त्याला आल्यावर जितेंद्राचा शोध करून विपिन सुजाताला त्याच्या घरीं नेतो. परंतु या शीलभ्रष्ट मुलीला घरांत थारा द्यायला ते तयार होत नाहीत. सुजाता व विपिन एका खोलीवर राहून कसे तरी दिवस काढीत असतांना एका सामाजिक ढोंगी कार्यकर्त्याच्या साखरपेरणीला फसून सुजाता आपल्यावर पुनः संकट ओढवून घेते. पण त्यांतूनहि विपिनच तिची सुटका करतो. शेवटीं विपिनच तिचा स्वीकार करतो.

बलात्काराने शीलभ्रष्ट झालेल्या स्त्रियांची सामाजिक समस्या यांतून सूचित झाली असली तरी या कादंबरीचें मुख्य आकर्षण विपिनचें व्यक्तिमत्त्व आहे. विपिनच्या वडिलांच्या रूपाने काकोडकरांनी वरून कठोर पण आंतून प्रेमळ अशा एका निग्रही व निश्चयी खानदानी जमीनदाराचें चित्र चांगलें रेखाटलें आहे. बापाच्या गुणांचा वारसा घेऊन आणि त्यांत शिक्षणाच्या व बदलत्या युगाच्या परिणामाने औदार्याची भर पडून, विपिनचें व्यक्तिमत्त्व आकारलें आहे. धीरोदात्त नायकाचा काळ महाकाव्याबरोबरच संपल्यासारखा झाला होता. तो आता पुन्हा सुरू होण्याचीं चिन्हें विपिन किंवा फडक्यांच्या सुरेंद्राकडे पाहून वाटतें. तसें झालें तर ती एक चांगलीच गोष्ट म्हटली पाहिजे. नायक धीरोदात्तच असावा असें बंधन घालण्याचें कारण नाही. पण तो सामान्यच असावा असेंहि बंधन असण्याचें कारण नाही. अधूनमधून होणारें धीरोदात्ततेचें दर्शन सद्‌गुणावरील व सत्प्रवृत्तीवरील विश्वास वाढविणारें ठरतें यांत शंका नाही.

काकोडकरांच्या व कानिटकरांच्याहि कादंबऱ्यांत संवादांचा जो अतिरिक्त वापर दिसतो तो याहि कादंबरीमध्ये थोडाबहुत आहेच. लेखकाने स्वतः निवेदन करून कादंबरीला जो भरीवपणा आणायचा व त्याची जी रंगत वाढवायची तिला या कादंबरींत भरपूर वाव आहे. या दिशेने लेखकाने प्रयत्न करावा असें सुचवावेसें वाटतें.

श्री. कृ. ज. दिवेकर यांची ' उपास्वप्न ' ही कादंबरी लेखकाच्या भावी यशाबद्दल अपेक्षा उत्पन्न करणारी आहे. लेखकाची ही दुसरीच कादंबरी आहे हें लक्षांत घेतां आत्मकथनाच्या पद्धतीने एका स्वप्नाळू परंतु दुर्दैवाच्या तडाख्याने भग्नस्वप्न झालेल्या एका कुमारी मातेची कहाणी

सांगण्यांत त्याने बऱ्यापैकी यश मिळविलें आहे असेंच म्हणावें लागेल. प्रभाकरासारख्या लाघवी परंतु स्त्रीद्वेष्टया व सूड घेऊं तरुणाच्या तावडींत सापडून कुमारपणींच अपल्याला जन्म देणाऱ्या आणि सुखी संसाराचें स्वप्न भंगल्यानंतरहि समाजाच्या टीकेला व उपेक्षेला तोंड देऊन धैर्याने स्वतःच्या पायावर उभ्या राहणाऱ्या उषेची ही कहाणी साधी असूनहि चटका लावते. मात्र तिला सामाजिक स्वरूप देण्यांत लेखकाला यावें तसें यश आलेलें नाही. अनेक कलागुणांचाहि अपुरेपणा जाणवतो. पण तरीहि आरंभाला म्हटल्याप्रमाणे ही कादंबरी लेखकासंबंधी अपेक्षा उत्पन्न करते.

कथाकार म्हणून व ग्रामीण जीवनाचें चित्रण करणारे लेखक म्हणून श्री. उद्धव शेळके यांचें नांव आता सुपरिचित झालें आहे. कादंबरीच्या क्षेत्रांतहि अलीकडे त्यांनी प्रवेश केला आहे. 'अगतिका' या कादंबरीच्या द्वारा त्यांनी एका निराळ्या व उपेक्षित अशा जगाचें दर्शन घडविलें आहे. तसें पाहिलें तर महारोग्याचें जीवन मराठी कादंबरींत श्री. शेळके यांनी अगदी पहिल्याप्रथमच चित्रित केलें आहे असें नाही. १०–१२ वर्षांपूर्वीच श्री. विवलकरांनी आपल्या 'शुभा' या कादंबरींत हा विषय हाताळला आहे. त्यानंतर अगदी अलीकडे श्री. गो. नी. दांडेकर यांनी 'आनंदवनभुवन' या आपल्या कादंबरींत त्या जीवनाचा परिचय करून दिला आहे; तरीहि उद्धव शेळके यांनी महारोग्यांच्या जीवनाचें अगदी तपशीलवार व मर्मभेदी असें जें चित्रण या कादंबरींत केलें आहे, तें पूर्वोक्त दोन्ही कादंबऱ्यांच्यापेक्षा अधिक प्रभावी आहे.

शांता नांवाच्या एका सुखवस्तु कुटुंबांत वाढलेल्या व सुशिक्षित अशा मुलीच्या वांट्याला आलेल्या दारुण दुःखाची आणि असहायतेची ही करुण कहाणी आहे. काकासाहेब वकिलांची क्रमांक तीनची सून म्हणून—वसंतची पत्नी म्हणून—शांता आपल्यांच्या भरलेल्या कुटुंबांत प्रवेश करते. जुन्या वळणाच्या अविभक्त कुटुंबांत जेवढें सुख तिच्या वांट्याला येण्यासारखें होतें त्याहून थोडेसें अधिकच तिला मिळतें. परंतु एक मूल होतें न होतें तोंच महारोगाच्या चिन्हाच्या रूपाने दुर्दैवाचा प्रवेश तिच्या आयुष्यांत होतो आणि अखेर महारोग्यांच्या कुष्ठधामांत प्रवेश करून तिथलें ओंगळवाणें जीवन असहायपणें जगण्याची पाळी तिच्यावर येते.

शांताचा कुष्ठधामांत प्रवेश झाल्यानंतर लेखकाने आपलें सगळें लक्ष त्या उपचार–केंद्रांतील वातावरणाचें तपशीलवार व मर्मभेदी चित्रण करण्याकडे केंद्रित केलें आहे; आणि महारोग्यांच्या मानसिक व्यथांची, दुःखांची आणि नातलगांकडून व समाजाकडून त्यांना मिळणाऱ्या उपेक्षेच्या वागणुकीची चांगलीच कल्पना वाचकांना आणून दिली आहे. हें जग आणि त्यांतील हीं दुर्दैवी माणसें श्री. शेळके यांनी जवळून न्याहाळलेलीं असल्यामुळे, त्यांच्या वर्णनांतील तपशील व बारकाई प्रत्ययोत्पादक झाली आहे.

समाजांतील अनेक दलितांच्याकडे आणि उपेक्षितांच्याकडे गेल्या तीस-पस्तीस वर्षांत समाजाचें थोडेंबहुत लक्ष गेलें आहे व वेधलें आहे. आर्थिक, धार्मिक किंवा सामाजिक दृष्ट्या दलित असलेल्या समाजापेक्षा महारोगासारख्या भयंकर सांसर्गिक रोगाने पछाडलेल्या लोकांची समस्या अगदीच वेगळी आहे व अधिक भयानक आहे. त्यांची समाजाकडून होणारी उपेक्षा ही केवळ कृत्रिम नाही, तर तिला त्या रोगाच्या भयानकतेचें वास्तव कारणहि आहे; आणि त्यामुळे ही समस्या फार गुंतागुंतीची व बिकट अशी आहे. तथापि अज्ञान व सहानुभूतीचा

अभाव यामुळे महारोग्यांच्या जीवनाला प्राप्त झालेली दारुण असहायता ज्ञानाच्या व सहानु-भूतीच्या वाढीने पुष्कळच कमी होण्यासारखी आहे. या प्रश्नाकडे सहानुभूतीने पाहण्याची गरज आहे येवढें या कादंबरीच्या वाचनाने वाचकांच्या मनावर ठसण्यासारखें आहे, आणि तें कांही कमी नाही.

ही कादंबरी वाचीत असतांना आणि वाचून झाल्यावरहि माझ्यापुढे जो प्रश्न उभा राहतो तो हा की, महारोग्यांच्या या प्रश्नाकडे वाचकांचें लक्ष व सहानुभूति वेधून घेण्यांत मूळ विषयाचा वाटा किती आणि लेखकाच्या कलेचा वांटा किती ! एखाद्या वृत्तपत्र-प्रतिनिधीने कुष्ठधामाला भेट देऊन तेथील जीवनाचा तपशीलवार वृत्तान्त सादर केला तर या प्रश्नाकडे वाचकांचें लक्ष वेधलें जाणार नाही काय आणि त्यांना त्याविषयी सहानुभूति वाटणार नाही काय ? त्याहून अधिक या कादंबरीनें कांही केलें आहे काय ? शांताच्या काल्पनिक पूर्वजीवनाचें थोडेंबहुत चित्रण करून लेखकाने निव्वळ वृत्तान्त-कथनापेक्षा थोडेंफार अधिक कांही साधलेंहि असेल. परंतु कलेचें सामर्थ्य मोठ्या प्रमाणांत यांत प्रत्ययाला येत नाही. लेखकाने कादंबरीची मांडणी कशा रीतीने करायला पाहिजे होती हें टीकाकाराने सांगितलेंच पाहिजे असें नाही. तथापि येवढें म्हणतां येईल की दोनशेहून अधिक पृष्ठें कुष्ठधामांतील जीवनाचें तपशीलवार वर्णन करण्यासाठी जीं खर्ची घातलीं आहेत, तीं तशीं न घालतां शांताच्या रोगाला बळी पडण्या-पूर्वीच्या जीवनाचें वर्णन अधिक विस्तारानें केलें असतें व तें करीत असतांनाच कांही निमित्ताने कुष्ठधामांतील जीवनाचें आवश्यक तेवढें चित्रण केलें असतें आणि एखाद्या शोकांतिकेप्रमाणे मांडणी करून अगदी शेवटीं शेवटीं शांताचा प्रवेश त्या कुष्ठधामांत करविला असता तर कादंबरीची परिणामकारकता खचित वाढली असती. तें कांही असलें तरी मला जो मुद्दा येथे मांडावयाचा आहे तो निव्वळ वृत्तान्त-कथनाहून वेगळ्या अशा कलेच्या कार्यासंबंधी व सामर्थ्या संबंधीचा आहे आणि तो आतापर्यंत स्पष्ट झाला असावा असें मला वाटतें.

श्री. स. श. देसाई यांची 'अब्बासअली' ही कादंबरी अगदीच वेगळ्या प्रकारची आहे. दोन वर्षांपूर्वी त्यांनी आपल्या 'आहुति' या कादंबरीच्या द्वारा भूतपूर्व हैद्राबाद संस्थानांतील रझाकारांच्या अत्याचारांचें आणि तेथील हिंदूंनी दिलेल्या लढ्याचें चित्रण केलें होतें. 'अब्बासअली' या कादंबरीच्या द्वारा हैद्राबाद संस्थानाच्या विलीनीकरणानंतरहि चालू असलेल्या पाकिस्तानी कारवायांचें चित्र त्यांनी रेखाटलें आहे. याहि कादंबरींत पार्श्वभूमि व पूर्वसूत्र या दोन्ही दृष्टींनी रझाकार-चळवळीचा थोडाबहुत परिचय घडतो. तसेंच पाकिस्तान-निर्मितीनंतर भारतांतून पाकिस्तानांत गेलेल्या मुसलमानांचा भ्रमनिरास कसा झाला व तेथे त्यांच्या वांट्याला उपेक्षेचें व उपासमारीचें जीवन कसें आलें, याहि गोष्टीवर विदारक प्रकाश पडतो. अब्बासअली हा एक भूतपूर्व रझाकार. पोलिस-कारवाईनंतर पाकिस्तानांत जातो व कांही काळाने पाकिस्तानचा हस्तक म्हणून, एजंट प्रव्होकेटर म्हणून, हैद्राबादला येतो व आपल्या कारवायांना प्रारंभ करतो. या त्याच्या कारवाया रोशन नांवाच्या एका श्रीमंत गणिकेच्या साहाय्याने पोलिसखात्याने कशा उघडकीला आणल्या याचा मनोरंजक वृत्तान्त या कादंबरींत वाचायला मिळतो. रोशनच्या प्रेमकथांनीहि ह्या कादंबरीची रंगत वाढविली आहे. पाकिस्तानी हेराची ही हेरगिरी उघडकीस आणण्यांत रोशन व तिचा शोफर अन्वर ह्या दोघां मुस्लिमांनी हातभार लावल्याचें दाखवून श्री. देसाई यांनी आदर्शवादाची जोडहि या कादंबरीला करून दिली आहे. एकंदरीने एका नव्या विषयावरील एक वाचनीय कादंबरी असाच 'अब्बासअली' या कादंबरीचा उल्लेख करावा लागेल.

'हरिभाऊ' या प्रबंधाचे लेखक म्हणून प्रसिद्ध असलेले श्री. ल. म. भिंगारे यांनी 'लवणाची मासोळी' ही कादंबरी लिहून कादंबरीच्या क्षेत्रांत प्रवेश केला आहे. 'लवणाची मासोळी' हें सत्प्रवृत्त पांढरपेशा माणसासाठी वापरलेलें प्रतीक आहे. स्वार्थी, ढोंगी, अनीतिमान् अशा समाजजीवनांत पांढरपेशा सत्प्रवृत्त माणसाला जगणें अशक्य आहे असा कांहीसा आशय या कादंबरीच्या द्वारा लेखकाला मांडायचा दिसतो. त्यासाठी रघु जोशी या एका भिक्षुकाच्या सालस व पापभीरु मुलाच्या जीवनाची परवड कशी झाली हें लेखकाने सांगितलें आहे. कथानक अनावश्यक तपशिलाने संथ गतीचें झालें आहे व तें वाचकांच्या मनाची फारशी पकड घेऊं शकत-नाही. लेखकाने योजलेला आशयहि प्रभावीपणाने व्यक्त झाला आहे असें म्हणतां येत नाही. तथापि संवादरचना, व्यक्तिदर्शन, प्रसंगचित्रण इत्यादि बाबतींतील लेखकाच्या अंगच्या कलागुणांचा आल्हादायक प्रत्यय या कादंबरींत अनेक ठिकाणीं येतो.

आरंभालाच म्हटल्याप्रमाणे या वर्षी १०-१२ तरी कादंबऱ्या अशा आहेत कीं, ज्यांनी आपला पसारा ९० ते १५० पानांमध्ये आटोपला आहे. केवळ विस्तारानेच नव्हे तर कुलागुणांनीहि यांतील बहुतेक कादंबऱ्या लघुच आहेत. कांही दीर्घकथा आहेत, तर कांहींची सामग्री कादंबरीची असूनहि त्यांची वाढ अपुरी झालेली आहे, तर कांहींचे विषयच कादंबरीजोगे नाहीत. यांतीलहि बहुतेक कादंबऱ्यांचा विषय स्त्री-पुरुषांतील प्रेम हाच आहे. अशा प्रेमकथांत वि. ग. कानिटकर यांची 'खोलां धावे पाणी' ही एका मुग्ध व कांहीशा दुर्दैवी अशा नोकरी करणाऱ्या मुलीच्या मूक व असफल प्रेमाची कहाणी मनाला चटका लावणारी आहे. रुपेरी पडद्यामागील जीवन आता कादंबरीकारांचें लक्ष वेधून घेत आहेसें दिसतें. कुहू कुहू व अधर्म या दोन मोठ्या कादंबऱ्यांप्रमाणेच 'माणुसकीचें मोल' ह्या छोट्या कादंबरींतहि तें जीवन पाहायला सापडतें. श्री. दत्ता जी. कुलकर्णी ह्यांची ही कादंबरी एखाद्या पटकथेसारखीच वाटते. तथापि त्यांचा हा प्रयत्न उत्तेजनार्ह आहे. चंद्रकांत काकोडकरांच्या 'आसावरी' या कादंबरीचा एक वाचनीय 'हलकी फुलकी रहस्यकथा' असा उल्लेख करतां येईल. डी. एम्. कोठारी यांची 'आपला हात जगन्नाथ' ही देखील एक बऱ्यापैकी रहस्यकथाच आहे. भाऊ पाध्ये यांची 'करंटा' आणि वि. वा. हडप यांची 'नवा संदेश' ह्या दोन मजूर-जीवनावरील कथा आहेत. 'करंटा' या कादंबरींतील आझाद-चाचा या ध्येयवादी मजूर पुढाऱ्याची शोकांतिका फारशी परिणामकारक वाटत नाही. 'नवा संदेश' ही हडपांची शेवटचीच कादंबरी. पेशवाईतील कादंबऱ्यांमुळे अनेकांच्या लक्षांत राहिलेले हडप हे एक जुन्या पिढींतील कादंबरीकार होत. त्यांचा कल बोधवादाकडे अधिक. त्यांनी भूमिकाहि अनेकदा बदलल्या, पण प्रत्येक भूमिकेवरून ते उपदेश करीत राहिले. 'नवा संदेश' ह्या कादंबरींत ६२ सालच्या निवडणुकींत अमलांत आणण्यासारखा एक संदेश त्यांनी दिला आहे. एकच नव्हे तर अनेक संदेशांचें गाठोडें या कादंबरींत बांधलेलें आहे. परंतु तें सोडून पाहावें असें देखील वाटणें कठीण आहे. मग त्यांतील संदेशाने प्रभावित होणें तर दूरच ! अमरेन्द्र गाडगीळ यांनी 'पानशेत' प्रकरणावर 'वटपत्र' नांवाची एक लघुकादंबरी लिहून सादर केली आहे. प्रासंगिक औचित्य यापेक्षां कादंबरी म्हणून तिला अधिक महत्त्व देतां येत नाही·

या वर्षी प्रसिद्ध पाश्चात्त्य कादंबऱ्यांचे पांच अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचें समालोचन येथें करण्याचें प्रयोजन नाही. तथापि या संदर्भात एक-दोन विचार व्यक्त करणें आवश्यक वाटतें. मराठी वाङ्मय समृद्ध होण्याच्या दृष्टीनें सर्व वाङ्मय-प्रकारांतील जागतिक

वाङ्मयांतील प्रसिद्ध कृतींचें सरस भाषांतर होणें ही अत्यावश्यक गोष्ट आहे. त्या दृष्टीनें या पांचहि अनुवादित कादंबऱ्यांचें मराठी वाङ्मयाचे वाचक व हितचिंतक स्वागतच करतील. या पांच कादंबऱ्यांपैकी दोन कादंबऱ्या श्री. भा. रा. भागवत यांनी अनुवादिल्या आहेत. त्या कादंबऱ्या अमेरिकन लेखिका लॉरा इंगाल्स वाइल्डर यांच्या आहेत. तिसरी एक कादंबरी श्री. भा. म. गोरे यांनी मराठी वाचकांना सादर केली आहे. गोरे यांनी यापूर्वी हार्डीच्या Far From the Madding Crowd या प्रसिद्ध कादंबरीचा अनुवाद प्रसिद्ध केला आहे आणि आता हार्डीच्याच Two on the Tower या कादंबरीचा अनुवाद ते सादर करीत आहेत. भाऊ धर्माधिकारी यांनी पार लागेर क्विस्ट या स्वीडिश लेखकाच्या 'बाराब्बास' या कादंबरीचा अनुवाद करून नोबेल पारितोषिकाचा मान लाभलेल्या या कादंबरीचा परिचय मराठी वाचकांना करून दिला आहे. गुस्टॉव्ह फ्लॉबर्ट या फ्रेंच लेखकाची मॅदाम बोव्हारी ही कादंबरी जगप्रसिद्ध आहे. श्री. श्री. ज. जोशी यांनीं 'पाप' या नांवाने तिचें मराठींत स्वैर रूपांतर केलें आहे. अशा रीतीने या चारहि लेखकांनी मराठी कादंबरीचें दालन समृद्ध करण्याचा केलेला हा उपक्रम स्तुत्य आहे.

या अनुवादित कादंबऱ्यांच्या योगाने मराठी कादंबरीचा आणखी एक लाभ होण्यासारखा आहे. जगप्रसिद्ध कादंबऱ्यांच्या तुलनेंत मराठी कादंबरी कुठे बसते ह्याचा अदमास वाचकांना व लेखकांनाहि घेतां येण्याची सोय त्यामुळे उपलब्ध होईल आणि मराठी कादंबरीचा दर्जा वाढण्याला तिचा उपयोग होईल. एक सूचना मात्र करणें आवश्यक वाटतें. अनुवादित कादंबऱ्यांच्या प्रारंभीं अनुवादकाने लहानसें तरी निवेदन जोडावें व त्यांत मूळ कादंबरीचें नांव, लेखक अगर लेखिकेचा त्रोटक परिचय, त्यांच्या इतर कादंबऱ्यांची नामावली आणि अनुवाद–विषय असलेल्या कादंबरीसंबंधीची त्या त्या देशांतील टीकाकारांचीं मतें असा मजकूर असावा. श्री. भागवत यांच्या या दोन्ही कादंबऱ्यांना असलें निवेदन नाही, ही गोष्ट खटकते.

कादंबरीच्या क्षेत्रांत एका दशकांत देखील नव्या प्रवृत्ति व नवे प्रवाह स्पष्टपणें दृग्गोचर होतीलच असें नाही. अशा स्थितींत एका वर्षातील कादंबऱ्यांचा आढावा घेतांना नव्या प्रवृत्तींचा व प्रवाहांचा विचार करणें अशक्य म्हणून अनावश्यकहि ठरतें. तथापि ६१ सालांतील कादंबऱ्या वाचून मराठी कादंबरीच्या प्रगतिपरागतीसंबंधी कांही विचार सुचणें अपरिहार्य आहे. विषय, आशय, मांडणी इ. बाबतींत कांहीं नावीन्य आढळल्यास त्याचीहि नोंद करणें इष्ट आहे. याच दृष्टिकोनांतून कांही विचार येथे मांडण्याचा मानस आहे.

कादंबरी हा प्रकार नाटकाप्रमाणें बंदिस्त नसून लवचिक आहे. त्याची समावेशकताहि मोठी आहे. परंतु तरीहि या प्रकाराचे कांहीं मूलभूत गुणधर्म आहेत; आणि ते कांही एका किमान मर्यादेपर्यंत तरी ज्या कथात्मक लिखाणांत आढळतात त्यालाच कादंबरी हें नांव देणें योग्य होईल. कादंबरीच्या स्वरूप-निश्चितीचा विचार गेल्या कांही वर्षांपासून माझ्या मनांत पुनःपुन्हा येत आहे. ६१ सालांतील कादंबऱ्या वाचून तो पुन्हा तीव्रतेने उद्भवतो. कशाहि प्रकारचें केवढेंहि लहान-मोठें लिखाण लेखकाने अगर प्रकाशकाने कादंबरी या सदरांत ढकलावें आणि वाचकांनी व टीकाकारांनी त्याला निमूटपणें कादंबरी म्हणूनच स्वीकारावें हा जो प्रकार सध्या चालू आहे तो कादंबरीच्या वाढीला कितपत पोषक आहे आणि मुळांत तो चालू देणें हें योग्य आहे काय हे विचार करण्यासारखे प्रश्न आहेत. कथा आणि कादंबरी यांच्यांत असलेला विस्ताराचा भेद बाह्य दिसत असला तरी वस्तुतः तसा तो नाही. या दोन प्रकारांच्या

उद्दिष्टाचा परिणामस्वरूप तो उत्पन्न झालेला आहे. त्याबरोबरच या दोन प्रकारांतील भेद केवळ विस्ताराचाच नाही हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. कादंबरीच्या द्वारा व्यापक व सखोल असें जीवन-दर्शन लेखकाला घडवायचें असतें. त्यासाठी कादंबरीच्या कथानकाला भरीवपणा असणें, तिची वाढ अनेकांगीं होणें, या गोष्टी आवश्यक आहेत. प्रत्येक वाङ्मय-प्रकारांत कथेला एक विशिष्ट गति असते. ती त्या त्या प्रकाराच्या व्यापाला व उद्दिष्टाला अनुसरून ठरत असते. या दृष्टीनें कादंबरींत ही गति कांहींशी संथ असावी लागते. कथानक फुलवून व खुलवून सांगणें, व्यक्तिदर्शन होईल तिकडे सूक्ष्म व परिपूर्ण करणें, आणि या सर्वांतून जीवनाचें व्यापक दर्शन घडविणें व त्याचा सखोल अर्थ सूचित करणें हीं सर्व कार्यें साधण्यासाठी कथानकाची गति संथ असणें आवश्यकच ठरते. ६१ सालांतील शंभर-सव्वाशें पानांत आपला पसारा आवरणाऱ्या ज्या अनेक कादंबऱ्या (?) आहेत त्या दीर्घ कथा आहेत. कादंबऱ्या नव्हेत असें जें मी म्हणतों तें या सर्व गोष्टी लक्षांत घेऊनच होय. प्रा. फडके यांनी एका व्याख्यानांत कादंबरीची जी व्याख्या इंग्रजींत केली होती व जिचा कांहींसा अनुवाद 'कुहू कुहू' या कादंबरीला जोडलेल्या प्रस्तावनेंत त्यांनी दिला आहे, ती व्याख्या कादंबरीच्या उपरिवर्णित स्वरूपाच्या व उद्दिष्टाच्या दृष्टीने उद्बोधक ठरेल. ती व्याख्या अशी 'It is a sustained account of the fulfilment or frustration of the wishes of a person or persons.' यांत sustained account हे शब्द अत्यंत महत्त्वाचे आहेत. ६१ सालांत पुस्तकरूपाने प्रकाशित झालेल्या 'देव चालले' या दि. बा. मोकाशी यांच्या तथाकथित कादंबरीने कादंबरीच्या स्वरूपाला व उद्दिष्टाला धाब्यावर बसवून एक नवें आव्हान दिलें आहे. काव्य आणि कथा यांचें क्षेत्र प्रयोगसुलभ असल्यामुळे त्या दोन क्षेत्रांत गेल्या एक-दोन दशकांत अनेक बरे-वाईट प्रयोग झाले. कादंबरीचें क्षेत्र मोठें म्हणून प्रयोग करण्याला कठीण, त्यामुळेच आजवर नवकाव्य व नवकथा यांच्याप्रमाणे नवकादंबरी अवतरली नाही. 'देव चालले' ह्या कादंबरीच्या (?) रूपाने नव्या प्रयोगाला सुरुवात होत आहे किंवा कसें हें आज सांगतां येणार नाही. मात्र हा प्रकार अनिष्ट आहे असें स्पष्ट म्हटलें पाहिजे.

कथालेखकाच्या लेखनानुसार वा सूचना-अपेक्षांनुसार चित्रपट-दिग्दर्शक कथेंतील प्रसंगांना मूर्त रूप देत असतो. परंतु ६१ सालांतील कित्येक कादंबऱ्यांतील कांही वर्णनावर चित्रपटांतील देखाव्यांचा परिणाम झालेला पाहून आश्चर्य वाटतें. 'सुजाता' ह्या कादंबरींतील अनेक मारामारीचे प्रसंग किंवा 'आसावरी' कादंबरींतील कोर्टाच्या कामकाजाचें सविस्तर वर्णन, याची उत्तम साक्ष देतील. याहूनहि खोल स्वरूपाचा परिणाम चित्रपटसृष्टीने कादंबरीच्या लेखन-तंत्रावर केला आहे असें वाटतें सिंहावलोकन पद्धतीचा सर्रास व अतिरेकी वापर जो अनेक कादंबऱ्यांतून दिसतो, त्याच्या मुळाशीं चित्रपटांतील फ्लॅश बॅक पद्धति असण्याची बरीच शक्यता आहे. अनेक कादंबऱ्यांतून अलीकडे दिसणारा संवादांचा अतिरिक्त वापर किंवा अनावश्यक तपशील व बारीकसारीक वर्णनें, तसेंच कथेचा वाढता दृश्य गुण अथवा चित्रगुण यांच्या मुळाशींहि चित्रपटाचा परिणाम असावा असा दाट संशय येतो.

कादंबरीचे वाचक वेगवेगळया दर्जाचे असतात, आणि निरनिराळया कादंबऱ्यांना निरनिराळ्या प्रकारचा वाचकवर्गहि लाभतो असें अनुमान करणें अयुक्त होणार नाही. ही गोष्ट लक्षांत घेऊन कादंबऱ्यांचेंहि एका निराळया प्रकारचें वर्गीकरण करणें इष्ट होईल असें मला वाटतें. नाटकाच्या बाबतींत गंभीर व थिल्लर असें वर्गीकरण केलें जातेंच. कादंबऱ्यांच्या बाबतींत थोड्याशा वेगळया भूमिकेवरून हलक्या–फुलक्या कादंबऱ्यांचा एक वेगळा वर्ग

कल्पिला आणि दोन घडी कशी तरी करमणूक करण्यासाठी लिहिलेल्या कादंबऱ्यांना अशा वर्गात टकललें म्हणजे गंभीर प्रकृतीच्या, कलापूर्ण रीतीने जीवनदर्शन घडविणाऱ्या कादंबऱ्यांना वेगळें प्रतिष्ठेचें स्थान ओघानेच प्राप्त होईल आणि सब घोडे बारा टक्के या तत्त्वानुसार सर्व कादंबऱ्या व कादंबरीकार एकाच मापाने मापले जाणार नाहीत.

आजच्या मराठी कादंबरीचें स्वरूप हें प्रामुख्याने वैयक्तिक असलेलें आढळतें. म्हणजेच ती सामाजिक राहिली नसून व्यक्तिजीवनाच्या चित्रणामध्येच रमलेली आहे ती वास्तववादी आहे, परंतु तिचें स्वरूप छायाचित्र-लेखनासारखें आहे. वृत्तान्त-लेखकाची भूमिका हीच आजच्या कादंबरीकाराची भूमिका प्रामुख्याने दिसते. विषयक्षेत्राच्या दृष्टीने विचार केला तरी फारशी विविधता तिच्यांत दिसत नाही. ऐतिहासिक कादंबऱ्यांचें दालन तर बव्हंशीं रिकामेंच राहिलेलें दिसतें. इतिहासाच्या क्षेत्रांत गेल्या दशकांत कितीतरी नवीन माहिती उपलब्ध झाली. परंतु एकाहि कादंबरीकाराचें लक्ष इतिहासाकडे वळलेलें दिसत नाही. ऐतिहासिक कादंबरी-लेखनासाठी लागणारा व्यासंग आणि भूतकालांतील समाजस्थितीचें दर्शन घेण्यासाठी आवश्यक असलेली दिव्यदृष्टि आजच्या कादंबरीकारांत नाही असा याचा अर्थ घ्यावा काय? गेल्या पाव शतकांत विज्ञानाने मानवी जीवन सरणींत जो क्रांतिकारक बदल घडवून आणला आणि मानवासमोर ज्या अनेक गंभीर समस्या उभ्या केल्या, त्या सर्वांची तरी जाणीव लेखकांना कितीशी आहे व वाचकांना त्यांनी ती कितपत करून दिली आहे?

कथांमधून व काव्यामधून दिसणारें विफल व मरगळलेलें जीवन हा फार तर या विज्ञान-युगाचा एक वरवरचा दृश्य असा गौण परिणाम म्हणतां येईल. पण त्याहून खोलांत आमचे लेखक शिरलेच नाहीत. माणसाचें धार्मिक व सांस्कृतिक जीवन तर आमच्या कादंबरीकारांना अविचारणीय वाटत असावें. या सर्व क्षेत्रांची कादंबरीकारांनी दखल घ्यावी याचा अर्थ त्या त्या क्षेत्रांतील घडामोडींचा अहवाल सादर करावा असा नव्हे. मानवाच्या भावजीवनाच्या संदर्भातच या सर्व घडामोडींचा अन्वयार्थ लावून हातीं आलेल्या सत्याचें आपल्या कथा-विश्वाच्या द्वारा वाचकांना दर्शन घडवायचें असा त्याचा अर्थ आहे.

६१ सालामध्ये अगदी मोजक्याच उल्लेखनीय कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या असल्या तरी तेवढ्याने निराश होण्याचें कारण नाही. एका वर्षाच्या निर्मिति-अनिर्मितीवरून भवितव्याबद्दल आडाखे बांधणें योग्य होणार नाही. कादंबरी या प्रकाराचें वेगळें क्षेत्र आहे, वेगळें कार्य आहे व वेगळें सामर्थ्यहि आहे. या प्रकाराला अगदी बंदिस्त करण्याचें कारण नसलें तरी हा वेगळेपणा लक्षांत घेऊन तें कार्य पेलण्याइतक्या सामर्थ्यशाली प्रतिभेने कादंबऱ्यांची निर्मिति झाली तर या लघुतेच्या युगांतहि या भव्य प्रकाराचें स्थान अढळ राहील यांत शंका नाही.

* * *

---

'पत्रिके'च्या मागील अंकीं 'हवेंतील वेली' या पुस्तकावर परीक्षण आलें आहे. प्रस्तुत पुस्तकाचे लेखक परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य श्री. रा. पु. सगदेव आहेत—संपादक.

---

गो. म. कुलकर्णी

# नाट्य-वाङ्मय – १९६१

१९६१ सालीं प्रसिद्ध झालेल्या नाटकांची एकूण संख्या इतर वाङ्मयप्रकारांच्या तुलनेनें विपुल आहे. अलीकडच्या काळांतील नाट्याबद्दलच्या सार्वत्रिक उत्साहाचाच हा परिणाम म्हणावयाचा. १९६१ च्या नाट्यलेखकांत विश्राम बेडेकर, पु. ल. देशपांडे, वसंत कानेटकर, गंगाधर गाडगीळ, श्री. ना. पेंडसे यांसारख्या प्रथितयश लेखकांपासून या क्षेत्रांत पहिलेंवहिलें पाऊल टाकणाऱ्या हौशी उमेदवारापर्यंत अनेक प्रवृत्तींचे व प्रकृतींचे लेखक आहेत. यांतील कांही नाट्यकृति मातब्बर कलावंतांकडून रंगभूमीवर आलेल्या, कांही स्थानिक मंडळाच्या गरजा भागविण्यासाठी अवतीर्ण झालेल्या, तर कांही रंगभूमीच्या उंबरठ्याशीं तिष्ठत असलेल्या आढळतात. या निर्मितीच्या मागे विद्यालयीन स्नेहसंमेलनांची वा महिला-मंडळांच्या उत्सवांची हंगामी गरज भागविण्यापासून तों रंगभूमीवर कांही नवें घडवून आणावें येथपर्यंत अनेक प्रकारचीं प्रयोजनें दिसतात. सरकारी, निमसरकारी पातळीवरून प्रचार करणारीं किंवा समस्याप्रधान गंभीर अशीं कांही नाटकें आढळतात तशीं कांही शुद्ध मनोरंजनाच्या उद्देशानेहि निर्माण झालेलीं आहेत. गद्य नाटकाइतकीच संगीत नाटकेंहि आहेत. सुखात्मिका वा शोकात्मिका यांची संख्याहि कांही कमी नाही. एकांकिका किंवा वगासारखे नाट्यप्रकारहि आपलें अस्तित्व भासविल्याशिवाय राहत नाहींत. ग्रामीण जीवनाच्या खालच्या प्रवाहापासून तों नागरजीवनाच्या वरच्या पातळीपर्यंत अनेक थरांचें चित्रण या सालच्या नाट्यकृतींतून आलें आहे. नागपूरपासून कोंकणपर्यंतच्या बोलभाषांचेंहि दर्शन येथे घडतें. वातावरणदृष्ट्या मुख्य भर आहे तो मध्यमवर्गीय सुशिक्षितांच्या जीवनावर. (बहुसंख्य नाटकांचा प्रारंभ ठराविक पद्धतीचा दिवाणखाना, सोफा सेट इत्यादींने होतो, याचें हें तर कारण नसेल!) श्रीधर देशपांडे यांचें 'आन्दान' व प्रा. फणसळकर यांचें 'विठ्ठल विठ्ठल गजरी' या दोनच कृति ऐतिहासिक स्वरूपाच्या मानतां येतील अशा. 'चंद्र नभींचा ढळला' व 'माते तुला काय हवंय्?' यांतील वातावरण ऐतिहासिक थाटाचें असलें तरी या दोन्हीहि कृति पूर्णपणें स्वतंत्र अशा न मानतां येण्याजोग्या. अनुवादात्मक नाट्यकृतींची संख्या १९६१ च्या निर्मितींत अगदी अल्प आहे. 'स्त्री जात तेवढी' व 'चंद्रावर मधुचंद्र' यांनाच काय तें अनुवादित असें विशेषण लावतां येण्याजोगें. 'स्वतंत्र व सामाजिक' अशी बिरुदावली मिरविणारीं नाटकेंच संख्येने अधिक.

एके काळीं मराठी नाट्यसृष्टींत ऐतिहासिक, पौराणिक वा तत्सम नाटकांना फार महत्त्व होतें, तसें तें अनेक कारणांनी आज राहिलेलें नाही. या प्रकारच्या विषयांचें भूतकालीन महत्त्व, प्रचार करणें, आदर्श समोर ठेवणें, सांस्कृतिक अभिमान फुलविणें, कायद्याच्या कक्षेंतून पळवाट शोधणें, इत्यादि कलाबाह्य मूल्यांवरच आधारलेलें होतें. या मूल्यांना गौण स्थान प्राप्त झाल्यामुळे व संक्रमणकालांतील सामाजिक समस्यांना महत्त्व आल्यामुळे पौराणिक वा ऐतिहासिक थाटाचा विषय मागे पडावा, हें एक प्रकारें स्वाभाविकच; तथापि एखादा भव्य, उत्कट, उग्रगंभीर अटीतटीचा जीवनसंघर्ष आविष्कृत करण्यास ऐतिहासिक वा पौराणिक

अनुक्रमणिका

स्वरूपाचा आशय व तदनुषंगिक वातावरण अधिक उपकारक ठरतें. दारव्हेकर लिखित 'चंद्र नभींचा ढळला' किंवा गो. के. भट लिखित 'माते तुला काय हवंय्?' या नाटकांवरून हें लक्षांत येतें. आजच्या बहुसंख्य नाटकांतून भव्य, गंभीर आशयाकडे दुर्लक्ष केल जातें याचें कारण आजच्या नाटककाराला दैनंदिन सामान्य जीवनांतील नाट्य अधिक आकृष्ट करतें हें, की व्यावहारिक वा व्यावसायिक दृष्ट्या आटोपशीर नाट्य असणें आवश्यक झालें आहे हें? कारणें कोणतींहि असोत नाट्यसंघर्षदृष्ट्या भव्यत्व असलेलीं नाटकें आजकाल क्वचितच निर्माण होतात हें मात्र खरें.

वरील परिस्थितींत श्री. श्रीधर देशपांडेसारखा एखादा लेखक 'आव्हान' सारखी ऐतिहासिक नाट्यकृति सादर करतो, त्या वेळीं त्याचें कौतुक वाटतें; पण प्रत्यक्ष नाटक वाचल्यानंतर मात्र या कौतुकाला फारसा अर्थ उरत नाही. 'पानिपतच्या संग्रामावरील ऐतिहासिक नाटक' असें मुखपृष्ठावर वर्णन असलेल्या या नाटकांत पानिपतच्या रणसंग्रामाची भीषणता कुठेच जाणवत नाही. ऐतिहासिक नाटकाला आवश्यक असलेलें विशिष्ट वातावरण वा व्यक्तिदर्शन यांचा येथे प्रत्यय येत नाही. ऐतिहासिक घटनांपेक्षा काल्पनिक घटनांवरच भर अधिक आहे, आणि त्यांचा परस्परांशीं नीट अनुबंधहि साधलेला नाही. आरंभ तर एखाद्या कादंबरीला शोभेल इतका संथ आहे. पानिपतच्या रणभूमीवर पतन पावलेल्या बळवंतराव मेहेंदळ्यांच्या पत्नीच्या सहगमनाचें चित्रण एवढेंच काय तें या नाटकांत चटका लावणारें, बाकीचा बराचसा भाग विश्वासराव व अनुराधा यांच्या शोकान्त प्रेमाच्या मामुली चित्रणाला वाहिलेला. वास्तविक विश्वासरावासारखा भावी पेशवा व अनुराधेसारखी गरीब कुळांत जन्माला आलेली एक बालविधवा यांची परस्परानुरक्ति, हा पेशवेकालीन सामाजिक संकेतांच्या संदर्भांत केवढा प्रक्षोभक विषय, पण हा प्रक्षोभ साऱ्या नाटकांत क्वचितच जाणवतो. १९६१ सालीं पानिपतच्या घटनेला दोनशे वर्षें झालीं, त्याचें हें स्मृतिश्राद्ध असल्याचें जें प्रस्तावनेंत लेखकाने म्हटलें आहे, तेवढ्या नोंदीपुरतेंच या नाटकाचें महत्त्व.

प्रा. द. गं. फणसळकर यांनी संत चोखोबांच्या जीवनावर जें दोनअंकी छोटें नाटक लिहिलें आहे, त्याला त्यांनी 'सामाजिक' (परिस्थितिदर्शनदृष्ट्या) मानलें असलें तरी त्याची गणना घटनादृष्ट्या ऐतिहासिक नाटकांतच करतां येईल. पौराणिक नाटकाला शोभेल असा अद्भुततेचाहि भाग यांत आहे. हा अद्भुत भाग व एकंदर रचनेचा प्रवचनी थाट लक्षांत घेतां, चोखोबासारख्या अज्ञान, दारिद्र्य आणि उपेक्षित हरिजन समाज यांत जन्माला आलेल्या एका कवीच्या काव्यशक्तीचा विकास दाखविण्याचें लेखकाचें उद्दिष्ट साध्य झालेलें दिसत नाही. लेखकाची या विषयाबद्दलची आत्मीयता मात्र ठिकठिकाणीं जाणवते.

ऐतिहासिक स्वरूपाची भव्यता, प्रखर नाट्यसंघर्ष, उत्कट भावनाविष्कार व या उत्कटतेंतून सहजपणें स्फुरणारें तत्त्वचिंतन, हें सारें पेलून धरणारी भाषाशैली, निरनिराळ्या प्रकारचे दृश्यबंध, पात्रांच्या साभिप्राय हालचाली, संगीताचा व ध्वनिघोषांचा केलेला समर्पक वापर या दृष्टीने प्रा. गो. के. भटकृत 'माते तुला काय हवंय्?' व पुरुषोत्तम दारव्हेकरकृत 'चंद्र नभीचा ढळला' हीं दोन नाटकें महत्त्वाचीं आहेत. 'माते तुला काय हवंय्?' हें मुळांत रवींद्रनाथ टागोरांच्या 'विसर्जन' (Sacrifice) या काव्यनाट्यावर आधारलेलें; रवींद्रनाथांच्या जन्मशताब्दी महोत्सवाच्या निमित्ताने टागोर व टागोर-वाङ्मय यांचा १९६१ मध्ये जो निरनिराळ्या प्रकारें विचार झाला त्याचाच हा एक परिपाक. टागोरांच्या एका नाट्यकृतीला मराठी पेहराव चढवून टागोरांची स्मृति जागविण्याचा प्रा. गो. के. भट यांचा

श्री गुरुदेव

सत्यं शिवं सुंदरम्

कौमुदी प्रकाशन पुरस्कृत

अथर्ववेदान्तर्गत संस्कृत भारतगीताचा प्राकृतांत काव्यात्मक पद्धतीनें अनुवादीत केलेलें–

# ❋ भारत राष्ट्रगीत ❋





श्रीकृष्णचरणरज

–: अनुवादक व कवि :–

[illegible]देव हणमंत तथा नानासाहेब खिद्रापूरकर

( सूरदास ) कोल्हापूर.

[ शाशनशाशीत – सूरदास ]

[illegible]मावतरण  शके १८८२

मुल्य चार आणे



॥ श्री गुरुदेव ॥

सत्यं शिवं सुंदरम्
अथर्ववेदांतर्गत संस्कृत भारत राष्ट्रगिताचा प्राकृत
काव्यात्मक अनुवाद :–

**वन्दनम्, वन्दनम् भारत भूऽमाते वन्दनम् ।।ध्रु.।।**

**वलयांकिता सप्त जलधि जले, सप्तद्विपवती, समृध्दगुणशीलें**
**सुरक्षा, सुशांति दे, 'सत्यं शिवं सुंदरम्'** नितस्मरणम् **वंदनम**

सुजलां सरिता जान्हवी, जमुना परम पावना अघहिनाशना,
सुरनदिख्याता कृष्णा, वेण्या, गौतमि, गंगा, नर्मधन्या,
शरयू गोमती हिमगिरीकन्या, मला–पहारी महेंद्र-तनया,
तुंगभद्रा तीर्थमंगलम्, वंन्दनम् ।। १ ।।

कल्पद्रुम सोमसंयुता दिव्य वनौषधीलता प्रफुल्ल कुसुमांकिता,
मंदार पुष्प समन्विता, मंद सुगंधित मलयज मरुता,
श्रांता सुख साधनम् वन्दनम् ।। २ ।।

हिमनग नगाधि राजा अमित अत्युच्चधवला,
हिमगिरी शिखरें, हिमसरिता, कैलास, सह्य,
मंदार मेरु, विंध्य मलयगिरी सुगंध अगरु,
गुणगान तव गाती नारद तुंबरुम् वन्दनम् ।। ३ ।।

अनुक्रमणिका

वर्ष ३४,
अंक १३७ :
जून १९६१

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक
दि. के. बेडेकर



अनुक्रमणिका



# नवीन सभासद

## ( एप्रिल ते ९ जुलै या कालावधींत झालेले )

### तहहयात

१. प्रा. मो. व्यं. पेठे, मुंबई २८.
२. श्री. ग. ल. ठोकळ, पुणें २.
३. श्री. के. जी. नारखेडे, भुसावळ.
४. श्री. मोहन धारिया, पुणें २.
५. डॉ. प. ल. वैद्य, पुणें २.

### साधारण

१. श्री. शकुंतला रानडे, पुणें ४.
२. श्री. ल. स. कुलकर्णी, अहमदनगर.
३. श्री. द. वि. सांगोलकर, पंढरपूर.
४. सौ. कमला द. जोगळेकर, मुंबई १४.
५. श्री. वा. रा. होनप, पुणें २.
६. प्रा. शालिनी पराडकर, उज्जैन.
७. श्री. द. श्री. जोशी, पुणें २.
८. श्री. अ. वि. बेंद्रे, मुंबई ६.
९. श्री. शां. वां. पाठक, सोनगीर (धुळें).
१०. सौ. ताराबाई कुलकर्णी, पुणें ४.
११. सौ. कमलाबाई बंबावाले, पुणें ४.
१२. श्री. सुलभा मु. आरस.
१३. प्रा. अं. गं. चिपळूणकर, जळगाव.
१४. प्रा. माधव रा. कानिटकर, पुणें २.
१५. श्री. ल. धों. शिंदे, मंचर ( पुणें ).
१६ श्री. शि. बा. लोंढे, मंचर ( पुणें ).
१७. श्री. म. स. पेठे, मुंबई १६.
१८. श्री. प. वि. जोशी, पुणें २.
१९. श्री. विमल राणे, जळगाव.
२०. श्री. वि. ग. कानिटकर, पुणें २.
२१. श्री. वि. वि. सातव, पुणें २.
२२. श्री. श्री. वि. खेर, पुणें २.
२३. श्री. दा. ए. दगडे, बार्शी.
२४. श्री. व्रि. भा. हेडा, नया अकोला.
२५. श्री. वसंत सबनीस, मुंबई ३२.
२६. श्री. वि. शं. पारगावकर, पुणें २.
२७. श्री. श्री. रा. लाड.
२८. श्री. र. न. जोशी, टाकळी.
२९. श्री. गो. वा. केळकर, होसूर.
३०. प्रि. वा. वि. भागवत, इंदोर.
३१. श्री. ना. ल. वैद्य, भोपाळ.
३२. प्रा. वि. वि. दळवी, दादर.
३३. श्री. य. ल. फडके, पुणें २.
३४. श्री. वा. य. गाडगीळ, डोंबिवली (ठाणें).
३५. श्री. द. ता. भोसले, पुणें ७.
३६. श्री. य. ग. जोशी, नवी दिल्ली १.
३७. श्री. वी. पां. लेले, सोलापूर.
३८. प्रा. वा. पु. गिंडे, माधवपूर वडगाव.
३९. श्री. दौ. त्र्यं. वाघ, कळवण (नाशिक).
४०. श्री. के. व्ही. देशपांडे, गोंदवलें बु. ( सातारा ).
४१. श्री. शकुंतला आठवले, कंधार (नांदेड).
४२. श्री. श्री. बा. आठवले, पुणें २.
४३. श्री. पु. पां भावे, पुणें २.
४४. श्री. श्री. मा. चिंगळे, अमळनेर.
४५. प्रा. द. के. बर्वे, उस्मानाबाद.
४६. प्रा. सरोजिनी कुलकर्णी, पुणें २.
४७. श्री. गो. कृ. पटवर्धन, पुणें २.
४८. श्री. पु. वि. डावरे, पुणें २.
४९. सौ. मीना मराठे, नवी दिल्ली.
५०. श्री. अ. बा. चव्हाण, पुणें ४.
५१. श्री. ग. र. तुळशीबागवाले, पुणें २.
५२. श्री. रा. कृ. शिंदे, पुणें २.
५३. श्री. अ. कृ. अत्रे, पुणें ५.
५४. श्री. भा. द. केळकर, पुणें ४.
५५. श्री. सू. द. वैद्य, पुणें २.
५६. श्री. दिनकर साळशिंगीकर, भुसावळ.
५७. श्री. सावित्री पां. चव्हाण, पुणें २.
५८. श्री. वि. स. वझे, पुणें २.
५९. प्रा. द. भि. कुलकर्णी, कोल्हापूर.

हा प्रयत्न अभिनंदनीय आहे. हा पेहराव चढवितांना मूळ कृतींतील नाट्य अधिक उठावदार करण्याच्या दृष्टीने प्रा. भटांनी तींत बरेच फेरफार केले आहेत. कोणत्याहि कृतीचा शुद्ध अनुवाद चांगला की तींत हेतूप्रमाणे फेरफार करणें इष्ट हें ठरविणें तेवढें सोपें नाही. मोठ्या लेखकाच्या कृतींत केले गेलेले फेरफार बहुधा मूळ कृतीवर अन्याय करणारे असतात. प्रस्तुत कृतीपुरता विचार केल्यास पारंपारिक शास्त्रांचे कर्मकठोर आदेश व मानवतेचा हळुवार असा स्वाभाविक कंद यांच्यांतील मूळ कृतींत असलेला संघर्ष प्रकट करण्यांत प्रा. भट यशस्वी झालेले आहेत. प्रा. भटांनी केलेली गीतयोजनाहि समर्पक वाटते. नाट्यवस्तूचा प्रस्तावहि स्वाभाविकपणें झाला असून, सर्व नाटकभर या ना त्या प्रकारच्या कृतीची अपरिहार्यता व तज्जन्य ताण जाणवतो. काव्य व तत्त्वविवेचन यांचें एक मनोहर मिश्रण टागोरांच्या साऱ्याच कृतींत आढळतें, तसें तें येथेहि आहे. हें सारें असूनहि या नाट्यकृतीच्या वाचनानें अंतःकरण जेवढें भरून यावें तेवढें येत नाही, याचें कारण टागोरांची विशिष्ट प्रकारची नाट्यलेखन-पद्धति–शॉप्रमाणे टागोरहि आपल्या पात्रांना कांही अंशीं आपल्या विचारांचीं बाहुलीं बनवितात व हीं बाहुलीं आपल्या निर्मात्याचें तत्त्वज्ञान बोलत राहतात त्याचा हा परिणाम.

'माते तुला काय हवंय्?' पेक्षाहि अधिक वैशिष्ट्यपूर्ण ठरलेली कृति म्हणजे 'चंद्र नभीचा ढळला' ही. वेगळ्या प्रकारच्या वातावरण-निर्मितींत विशेषतः लोकविलक्षण अशा व्यक्तित्वाच्या दर्शनांत या नाटकाचें यश सामावलें आहे. यांतील सारींच स्त्रीपुरुषपात्रें आपापल्या परीनें वैशिष्ट्यपूर्ण असलीं तरी या नाटकाचा केंद्रबिंदु सम्राट् चंद्रकुमार हाच आहे. काव्यात्म, स्वप्नाळू, छांदिष्ट, विक्षिप्त ध्येय आणि वेड यांच्या सीमारेषेवर तरळणारें हें व्यक्तित्व बऱ्याचसा बालसदृश हळुवारपणा व राक्षसी क्रौर्य या दोन टोकांत आंदोलित होत राहतें; किंवा दुःखादि एकाच वृत्तीचीं दोन अंगें असल्याचेंहि येथें जाणवतें. सर्वसाधारणपणें कोणत्याच साच्यांत न बसणारें विरोधाभासात्मक आणि तरीहि तर्कसंगत असें हें व्यक्तिचित्र रेखाटण्यांत श्री. दारव्हेकरांनी यश मिळविलें आहे. एवढें गुंतागुंतीचें व्यक्तिदर्शन असलेलें नाटक मराठींत तरी अपूर्वच मानावें लागेल. हाताशीं असलेल्या पात्रांचा वकूब पाहून व प्रेक्षकांच्या नाडीवर बोट ठेवून हमखास व्यावहारिक यश मिळवून देणाऱ्या युक्त्यांचा अवलंब करणाऱ्या नाट्यलेखकांच्या परंपरेला अद्यापि खंड पडलेला नाही. अशा परिस्थितींत श्री. दारव्हेकरांनी पत्करिलेली व वहिवाटीची नसलेली ही बिकट वाट विशेष नजरेंत भरते.

श्री. दारव्हेकरांनी या नाटकाची प्रेरणा फ्रेंच लेखक आल्बर्ट कामू याच्या 'कॅलिगुला' या नाटकांत असल्याची प्रांजळ कबुली प्रस्तावनेंतच दिली आहे. 'कॅलिगुला'च्या तुलनेनें मात्र दारव्हेकरांचें हें नाटक थिटें वाटतें. रोमन साम्राज्याच्या विशिष्ट पार्श्वभूमीमुळे कामूच्या नाटकाला जी वास्तवता व प्रखरता प्राप्त झाली आहे, तशी ती येथे नाही. मुळांतील व्यक्तिदर्शनहि अधिक सूक्ष्म व गुंतागुंतीचें आहे. हें सारें मराठींत आणणें कठीण असल्याची जाणीव श्री. दारव्हेकरांनाहि आहे. एका सामर्थ्यशाली नाट्याने प्रभावित झालेला व तें सारें प्रामाणिकपणें व जिद्दीने पकडण्याची इच्छा असलेला लेखक असूनहि तें सारें त्याच्या कक्षेत येऊं शकलें नाही. याला अनेक कारणें असूं शकतील; या कारणांपैकी प्रस्तावनेंत लेखकाने उभ्या केलेल्या प्रश्नचिन्हांकित कारणाकडे लक्ष देण्यासारखें आहे. "साधेल तसा अनुवाद केला तरी तो रंगभूमीवर आणणें अत्यंत कठीण आणि हेंहि कदाचित् साधलें तरी प्रेक्षकांची त्या लोकविलक्षण नाटकाबद्दलची

प्रतिक्रिया?'' श्री. दारव्हेकरांच्या मनांत आलेलें भीतियुक्त प्रश्नचिन्ह बऱ्याच नाटककारांच्या मनांत घर करून राहत असतें. मूळ नाट्यप्रेरणेवर त्याचें दडपण येतें आणि नवे नवे प्रयोग त्यामुळे होणें मुष्किलीचें होतें व मग नाट्यक्षेत्रांत आवर्त निर्माण होतात.

'चंद्र नभीचा ढळला'च्या निमित्ताने निर्माण झालेला हा विचार येथेच सोडून इतर दोन अनुवादित कृतींकडे वळल्यास त्यांत विशेष विचारणीय असें कांही आढळत नाही. श्री. शं. बा. चव्हाण यांनी मोलिअरच्या एका नाटकाचें ''स्त्रीजात तेवढी'' या नांवाने केलेलें स्वैर रूपांतर विशेष लक्षांत घेण्यासारखें नाही. अनेक प्रकारच्या विनोदी नाटकांत आणखी एकाची भर, एवढेंच याचें महत्त्व. दुसरा अनुवाद श्री. स. अ. शुक्ल यांनी बॅरिस्टर ए. एम्. पी. अय्यर यांच्या 'दि ट्रायल ऑफ् सायन्स फॉर दि मर्डर ऑफ् ह्युमॅनिटी' या पुस्तकाचा केलेला आहे. मूळ नाटकाचा मथळा विषयाचें व मांडणीचें स्वरूप स्पष्ट करणारा आहे. 'चंद्रावर मधुचंद्र' हें त्याचें मराठी नांव मात्र केवळ आकर्षक मथळ्याच्या विलोभनापायी दिलें गेलेलें दिसतें. मूळ कृतींतील विषय व्यापक व जिव्हाळ्याचा असला व त्याची मांडणीहि प्रभावीपणें केलेली असली तरी याला नाटक म्हणण्यापेक्षा न्यायालयीन साच्यांत बसविलेला एक प्रबंध असें संबोधणेंच इष्ट. विचारप्रवर्तन, चर्चा, खंडनमंडन, प्रचार इत्यादि गोष्टी येथे प्राधान्याने अभिप्रेत आहेत.

नाटक हा वाङ्मयप्रकार प्रचारासाठी अनेक वेळां राबविला गेला असला तरी १९६१ च्या एकूण नाट्यकृतींत प्रचारात्मक नाटकांची संख्या फार थोडी आहे 'स्वार्थाचे बळी' (डॉ. बा. ब. मुंढे), 'हेहि दिवस जातील' (पांडुरंग व्ही. चव्हाण), 'माळेंतील मणी' (डॉ. रा. सी. कापडी) व 'डाग' (नामदेव व्हटकर) याच काय त्या खास प्रचारात्मक नाट्यकृति. प्रचाराचा हुकमी परिणाम साधण्यासाठी यांतील तीनहि कृतींना शोकात्मिकतेची डूब दिली आहे. 'हेहि दिवस जातील' हें नाटक सुखान्त आहे. प्रचारात्मक नाटकाचा सांकेतिक नमुना म्हणून 'स्वार्थाचे बळी' या नाटकाकडे बोट दाखवितां येईल. दारूबंदीच्या प्रचारार्थ लिहिली गेलेली ही नाटिका अमली पदार्थांच्या सेवनास बळी पडणाऱ्यापेक्षा याच्या निर्मितीच्या मोहास बळी पडणाऱ्या व्यक्तींच्या जीवनांतील अनर्थ येथे लेखकाला अभिप्रेत आहेत. 'एकच प्याल्या'प्रमाणे पति, पत्नी व मूल यांचा भयानक अपघाती अंत येथेहि दाखविला आहे. प्रचार म्हटला की सामान्यतः त्यांत भडकपणा, कृत्रिमता, भावविवशता, स्थूलता इत्यादि घटक आढळतात तसे ते येथेहि आहेत. अशा प्रकारच्या लेखनांत कलामूल्यांचा शोध घेणें व्यर्थ असलें तरी निदान त्यांत कमींत कमी कांही सुसंगतता असावी ही जी अपेक्षा तीहि खोटी ठरविणारें प्रचारनाट्य म्हणजे 'माळेंतील मणी'. वाकडें पाऊल पडलेली स्त्री जर भ्रष्ट मानावयाची तर वाकडें पाऊल पडलेला पुरुष कां भ्रष्ट मानूं नये? या प्रश्नावर या नाटिकेची उभारणी करण्याचा लेखकाचा इरादा आहे. अनुषंगाने कुटुंबनियोजनाच्या पद्धतीचा प्रचार हाहि आणखी एक उद्देश त्याने ठेवला आहे. या साऱ्यांची सांगड घालण्यासाठी त्याने सर्व बाजूंनी नाटक जेवढें भरकटूं देतां येईल तेवढें दिलें आहे. याचा प्रत्यय घ्यावयाचा असल्यास नाटकाचें पहिलेंच पान पहावें. नाटिकेच्या प्रारंभाला सकाळची दहा वाजतांची वेळ असल्याचें सांगितलें असून, विजा चमकत असल्याचें व मेघांचा गडगडाट होत असल्याचें वर्णन आहे. रंगभूमीवरील स्त्री आपल्या मुलाला गीत म्हणून झोपवीत असतां जें गाणें म्हणते त्यांत 'शांत झालें विश्व सारें' असे शब्द आहेत आणि त्या पुढच्या लांबलचक स्वगतांत गडकऱ्यांच्या प्रोफेसर कोटिबुद्धेंना मागे टाकील या प्रकारचें अवडंबरात्मक भाष्य आहे; आणि हें सारें केलें

अनुक्रमणिका

आहे तें गंभीर भावनिर्मितीसाठी ! ! नाट्य-लेखनाची कुवत अंगीं नसतां निर्माण केल्या गेलेल्या कृतींत 'कळावें लोभ असावा' (गोविंद भिडे); 'नवऱ्याला हवीय पोटगी' (अशोक देशपांडे); 'तेथे कर माझे जुळती' (म. भा. कदम); 'दोन घडीचा डाव' (शरद वराडकर) यांचाहि अंतर्भाव करावयास पाहिजे.

'हेहि दिवस जातील' हें अस्पृश्योद्धारावर आधारलेलें नाटक नाट्यापेक्षा चर्चेवर, वाद-विवादावरच अधिक भर देणारें आहे. प्रचार व नाट्य यांचा समतोल साधलेलें नाटक म्हणून श्री. नामदेव व्हटकर यांच्या 'डाग'चा उल्लेख करतां येईल. ग्रामीण वातावरणांतील एका अस्पृश्य पोरीच्या जीवनाची कथा हींत अंतर्भूत केली आहे. अस्पृश्यांचें पारंपरिक समाज-जीवनांतील हीन दीन स्थान व तदनुषंगिक समस्या यांची चर्चा या नाटकांत आली असली, व संगीत, नृत्य इत्यादींचा भरपूर वापर केला असला, तरी नाट्यमूल्यांवर त्यांची सहसा कुरघोडी होत नाही याचें कारण या नाटकाचा लोकनाट्यात्मक घाट. या लोकनाट्याच्या तंत्र-पद्धतींतील मोकळेपणाचा लाभ या नाटकाला मिळाला असून, शिवाय नाटकांतील नायिकेच्या जीवनांतील वास्तव घटना व ती वसवीत असलेल्या शकुंतलेच्या जीवनावरील वगांतील घटना यांची सांधेजोडहि लेखकाने केली आहे. कथानकाच्या विशिष्ट स्वरूपामुळे 'डाग' मध्ये जें साधलें गेलें आहे तसें तें नेहमीच साधेल असें नाही. लोकनाट्याचें आकर्षण वाटत्या प्रमाणांत असल्याची निशाणी म्हणून वसंत सबनीस यांच्या 'अदपाव सुतार, पावशेर न्हावी, सव्वाशेर शिंपी' या विनोदी वगाचा निर्देश करतां येईल. लोकनाट्याच्या अनेक वैशिष्ट्यांपैकीं उत्स्फूर्तता हें त्याचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य मानण्यांत येतें; अशा वगांनीं लोकनाट्यांतील सैराटपणाला आळा कदाचित् बसेल, पण त्याबरोबरच उत्स्फूर्ततेलाहि धक्का बसेल की काय अशी शंका येते. याचा निर्णय अर्थात् कालांतरानेच लागणारा आहे.

प्रचारात्मक नव्हेत पण खास मर्यादित उद्दिष्टें ठेवून लिहिलेल्या कृति म्हणजे 'समर्पण' (सौ. आशा परचुरे), 'दिवस सोनियाचा' (प्रभा दाते), 'दारींच्या चिमण्या उडून जाती' (सौ. कुमुदिनी रांगणेकर) या स्त्रियांनी स्त्रियांसाठी स्त्री-जीवनावर लिहिलेल्या या नाटिका या प्रकारच्या नाट्यलेखनावर पडलेल्या अनेक बंधनांमुळे कृत्रिम वाटणें अपरिहार्य आहे. तीनहि नाटिका सुखान्त आहेत. उत्सवप्रियतेला शोभेल असा सारा थाट या तीनहि नाटिकांत आहे.

या लुटुपुटीच्या नाटिकांतून बाहेर पडून समस्याप्रधान गंभीर नाटकाकडे वळावयाचें झाल्यास श्री. मो. स. साठे यांच्या 'भुजंग' व श्री. विश्राम बेडेकर यांच्या 'नरो वा कुंजरो वा' या नाटकांचा विचार केला पाहिजे. 'भुजंग' नाटक हैद्राबादच्या रझाकार चळवळीच्या पार्श्व-भूमीवर लिहिलेलें आहे. गुंडांच्या पाशवी तडाख्यांत सापडलेल्या निरपराध अबलांची सामाजिक दुःस्थिति चित्रित करून त्यांच्या भवितव्याकडे लक्ष वेधणें व स्त्रीच्या अब्रूचें पुढे होऊन रक्षण करण्यास असमर्थ असलेल्या भेकड समाजाने तिच्या तथाकथित अधःपतित्वाबद्दल तिला हकनाक छळण्यामागे लपलेल्या अन्याय्य वृत्तीला वाचा फोडणें, हें या नाटकाचें उद्दिष्ट आहे. रझाकार चळवळ ही येथे निमित्तमात्र आहे. लेखकाला अभिप्रेत आहे तें या समस्येचें व्यापक स्वरूप. नाटकांतील नायिकेच्या-अलकेच्या-रूपाने त्याने तें साकार करण्याचा प्रयत्न केला आहे. लेखकाच्या उदात्त हेतूबद्दल आदर बाळगूनहि या समस्येचें चित्रण जेवढें प्रभावी व्हावयास पाहिजे तेवढें झालें नाही, असें खेदाने म्हणावें लागतें. गुंडांच्या पाशवी अत्याचारांना बळी

पडणाऱ्या दुर्दैवी स्त्रियांचें प्रतिनिधित्व अलका करूं शकत नाही; कारण तिच्या पतीचा दुबळेपणा, सासऱ्याचा दांभिकपणा व सासूचा हताशपणा प्रकट होऊनहि योगायोगाने का होईना तिच्या अब्रूचें रक्षण झाल्याच लेखकानें दाखविलें आहे; तिच्या शूर दिराचा तिला पाठिंबा आहे. शेवटीं तिच्या पतीने तिचा स्वीकार केल्याचेंहि दृश्य दिसतें. यामुळे मूळ समस्येची धार बोथट होते, आणि प्राधान्याने शिल्लक उरतो तो तिच्या सासऱ्याचा दांभिकपणा.

अलकेची समस्या मांडतांना श्री. साठे यांनी रामायणांतील सीतेचा उल्लेख करून या प्रकाराच्या अन्यायाची प्राचीन परंपरा सूचित केली आहे, तर श्री. विश्राम बेडेकरांनीं 'नरो वा कुंजरो वा' हा महाभारतांतील उद्गार नाटकाच्या मथळ्यासाठी घेऊन न्यायदान-पद्धतींतील वैगुण्यामुळे फासावर लटकणाऱ्या निरपराध्यांचीच समस्या मांडली आहे. अशा प्रकारच्या अन्यायांची कल्पना येण्यासाठी पुस्तकाच्या शेवटीं निरनिराळ्या काळांतील वृत्त-पत्रांचे उतारेहि दिले आहेत आणि नाटकाच्या तिसऱ्या अंकांत गुन्हेगार मानल्या गेलेल्या व्यक्तीवर कोणकोणत्या प्रकारचे अन्याय घडण्याची शक्यता आहे याचा विस्तारहि केला आहे. निरपराध, सत्त्वशील, उमद्या व्यक्तीवर कायद्याच्या विशिष्ट चौकटीमुळे हकनाक बळी जाण्याची शक्यता कशी निर्माण होते, हें स्पष्ट होईल अशा पद्धतीनेच कथानकाची इमारत रचली आहे. गुन्हेगार, पोलीस, मॅजिस्ट्रेट, पंच, तुरुंग, कायदा, पुरावा, फाशी इत्यादि 'या क्षेत्रांतील' सारे घटक या ना त्या स्वरूपांत डोळ्यांसमोर सारखे वावरतील अशी योजनाहि आहे. गुन्हेगारांच्याहि निर्घृण, स्वार्थी, हळव्या, दुबळ्या अशा निरनिराळ्या परी येथे दाखविल्या आहेत. हें सारें सोद्‌कपणें दाखवितां यावें म्हणून जेलरच्या कुटुंब-घटकांनाच प्रामुख्य देऊन नाटक लिहिलें आहे. तंत्रशरण कायदा विरुद्ध स्वाभाविक माणुसकी असा हा संघर्ष जेलर बेवूर व त्यांचा धाकटा भाऊ प्रकाश यांच्या अनुषंगाने उभा केला आहे. फाशीचें केवळ दृश्य पाहूनच भोवळ येण्याइतका सहृदय, सत्प्रवृत्त असलेल्या प्रकाशवर खुनाचा आणि स्वतःच्या भावजयीचें शील बिघडविल्याचा आरोप यावा व कायद्याचीं चक्रें फिरून त्याच्यावर फाशी जाण्याची पाळी यावी, अशा दिशेने कथानकाची झपाट्याने वाटचाल होते. विपरीत घटनांच्या या घोडदौडीच्या टापाखाली प्रकाश व माया यांच्या प्रेमाचा चेंदामेंदा होण्याची कशी पाळी येते, हें दाखवून मूळ कथावस्तूंतील कारुण्याला अधिक उत्कट करण्याचा लेखकाचा उद्देश दिसतो. प्रकाश, माया, मेजर बेवूर, त्यांची पत्नी चित्रा या साऱ्याच व्यक्तिरेखा लक्षणीय आहेत. मॅजिस्ट्रेट वा पोलीस अधिकारी यांच्या वृत्तीवरहि जातां जातां प्रकाश टाकला आहे. मेजर बेवूर-प्रकाश, चित्रा-माया, बारक्या-बंकट, इन्स्पेक्टर जावळे व रावबहादुर या जोड्यांची परस्परांच्या व्यक्तित्वावर प्रकाश टाकणारी योजना कौशल्यपूर्ण आहे. संवादांतून प्रकट होणारा भेदकपणा आणि तिखट उपरोध बेडेकरांच्या संवाद-कौशल्याची साक्ष देतात. जेलमधून ऐकूं येणारे घंटेचे टोले, खळकन फुटून चुरा होणारीं मद्यपात्रें, पिस्तुलाचे बार, तोडकीमोडकी गाण्याची लकेर या साऱ्यांचा बेडेकरांनी मार्मिक उपयोग करून घेतलेला आहे.

पण हें सारें असूनहि नाटकाचा साकल्याने तेवढा परिणाम होत नाही. अलग अलग पडलेल्या तुकड्यांची सांधेजोड करण्याच्या प्रयत्नासारखें हें वाटतें. कथानकाचा विस्कळितपणा सर्वाधिक उघडा पडला आहे तो तिसऱ्या अंकांतील जंगलच्या प्रवेशांत. लेखकाबद्दलच्या मुळांतच उंचावलेल्या अपेक्षा लक्षांत घेतां हें नाटक त्यामुळे थिटें वाटतें.

समस्याप्रधान नव्हेत पण गंभीर स्वरूपाचीं मानतां येतील अशीं जीं कांही नाटकें १९६१ मध्ये निर्माण झालीं त्यांत श्री. मधुसूदन कालेलकर यांचें 'संगमरवरी स्वप्न', सौ. वसुंधरा पटवर्धन यांचें 'हिरकणी', शशिकला आळंदकर यांचें 'एकदाच गाऊं दे', श्री. ना. पेंडसे यांचें 'महापूर' यांचा प्रामुख्याने अंतर्भाव करावयास पाहिजे. यांपैकी कथानकाच्या विस्कळितपणामुळे, अपघाती घटनांच्या अतिरेकी योजनेमुळे, सुष्टदुष्टांच्या सांकेतिक चित्रणामुळे व भावविवशतेमुळे 'संगमरवरी स्वप्न' अयशस्वी झालें आहे.

१९६१ च्या एकूण नाटकांत आठदहा तरी अशीं नाटकें दाखवितां येतील की, ज्यांतील घटना अपघाती वा अपवादात्मक आहेत. अशी एखादी अपवादात्मक घटना पार्श्वभूमीदाखल घेऊनहि त्यांतून सुसंबद्ध व वास्तव नाट्य कसें निर्माण करतां येतें हें सौ. वसुंधरा पटवर्धन यांच्या 'हिरकणी' वरून दिसतें. वैवाहिक व विवाहबाह्य अशा दोन्ही प्रकारच्या अपत्यांवर सारखेंच प्रेम करणाऱ्या पण हीं दोन्ही विश्वें त्या त्या घटकांच्या हिता-साठीच अलग अलग ठेवूं इच्छिणाऱ्या एका व्यक्तीच्या जीवनावर व तदनुषंगिक आंतरिक संघर्षावर हें नाटक आधारलेलें आहे. गृहीत घटना जरी कांहीशी अपवादात्मक असली तरी या घटनेचा जसजसा स्फोट होत जातो, तसतसा या कुटुंबाच्या जीवनावरील त्याचा ताण जाणवूं लागतो. हा ताण लेखिकेने दैनंदिन जीवनक्रमाच्या आधारेंच दाखविल्यामुळे मुळांतील कांहीशी अपवादात्मक घटना तेवढी खटकत नाही. एका मानसिक संघर्षाला प्रवर्तित करण्यापुरताच मूळ घटनेचा संयमित वापर लेखिकेने केला आहे.

अलकेच्या ठिकाणीं जागृत झालेल्या वात्सल्यभावनेने तिच्यांत झालेलें परिवर्तन जितकें स्वाभाविक तितकेंच हृद्य आहे. नाटकाचा एकंदर घाट या स्वाभाविकतेला पोषक होईल असाच आहे.

'हिरकणी' प्रमाणेच श्री. ना. पेंडसे यांच्या 'महापूर' मधील घटना कौटुंबिक स्वरूपाच्या व सुखात्मिकेंत पर्यवसित होणाऱ्याच पण 'हिरकणी' पेक्षाहि अधिक स्वाभाविक मानतां येतील, अशा आहेत. त्यांतील योगायोगाची घटना मानावयाचीच झाल्यास ती महापुराचीच मानावी लागेल. अनपेक्षितपणें पूर आल्यामुळे नको असलेल्या माणसांच्या संगतींत नाइलाजाने कांही काळ राहावें लागणें व त्यांतून घडत राहणाऱ्या प्रतिक्रियांवर या नाटकाची मदार आहे. मूळच्या कोकणांतील पण पुढे स्वतःच्या कर्तृत्वामुळे पुढे आलेल्या बापूंचा स्वयंमन, शिष्ट असा जीवनविषयक दृष्टिकोण त्यांच्या एकुलत्या एक मुलीचें—शालनचें-किसनसारख्या बापूंच्या दृष्टीने सामान्य असलेल्या माणसावर बसलेलें प्रेम व त्याबाबतचा बापूंचा चडफडाट येथून नाटकाला प्रारंभ होतो.

ठराविक पद्धतीच्या दृश्यांना व वातावरणाला कंटाळलेल्या वाचकांचें वा प्रेक्षकांचें खाडीच्या किनाऱ्यावरील पडक्या धर्मशाळेचें वातावरण स्वतःच्या वेगळेपणानें लक्ष वेधून घेतें. सामान्य दृश्यें, घटना वा वातावरण यांतून नाट्य निर्माण करण्यांत या नाटकानें बरेंच यश मिळविलें आहे. मात्र बापूंना वठणीवर आणण्यासाठी शालनला सर्पदंश झाल्याचा जो बनाव रचला गेला आहे, त्याऐवजी पुराच्या दडपणाच्या संदर्भातच बापूंचें परिवर्तन झालेलें दाखविणें अधिक स्वाभाविक झालें असतें. श्री. पेंडसे यांनी त्यांच्या कादंबऱ्यांप्रमाणे या नाटकांतहि कोकणशीं इमान राखलें आहे.

'हिरकणी' व 'महापूर'मध्ये व्यक्तिदर्शनाला जसें महत्त्व आहे, तसें घटनांनाहि; पण केवळ व्यक्तिदर्शनालाच प्राधान्य देऊन लिहिलेल्या गंभीर प्रकृतीच्या स्वतंत्र नाटकांत शशिकला आळंदकर यांच्या 'एकदांच गाऊं दे'चा क्रम बराच वर लागेल. श्रीराम या गायक कलावंताच्या व्यक्तित्वाचें चित्रण हा या नाटकाचा प्रमुख उद्देश. अस्सल कलावंताच्या कलंदर, गुंतागुंतीच्या, विरोधाभासात्मक व्यक्तित्वाचा वेध घेणें मुळांतच कठीण; त्यांतून नाटकासारख्या अनेक बंधनांनीं परिवेष्टित असलेल्या माध्यमांतून तें आविष्कृत करणें त्याहूनहि कठीण. पण हें अवघड काम शशिकला आळंदकर यांनी बऱ्याच यशस्वीपणें पार पाडलें आहे. कलावंताच्या जीवनांतील हर्षशोक, छांदिष्टपणा, जिद्द, प्रलोभनें, वैभव वा दैन्य यांचें सखोल व कारुण्यगर्भ दर्शन येथे घडविलें जातें आणि हें सारें भावविवशतेच्या आहारीं न जातां; श्रीरामसारख्या कलावंताचा लोकविलक्षणपणा व सर्वसामान्यांची बाजारी वृत्ति यांच्यांतील विरोधाचें दर्शन नाटकाच्या प्रारंभींच होतें. श्रीरामचें जीवन आरंभापासून शेवटपर्यंत मृत्यूच्या छायेंत वावरत असल्याने नाटकाचा आरंभच एका विमनस्क दबलेल्या लयींत होतो. दुसऱ्या अंकांत श्रीरामच्या वैभवाचें दर्शन होत असलें तरी दैन्यांत वा वैभवांत त्याचा असा एक जो अलिप्त वा अनासक्त सूर आहे तो शेवटपर्यंत; मृत्यूच्या सावटामुळे त्याच्या बोलण्याचालण्याला वा तत्त्वचिंतनाला एक वेगळीच धार प्राप्त होते.

श्रीराम या कलावंताइतकेंच त्याच्या पत्नीचें—पार्वतीचें—चित्रणहि मोठ्या सहृदयतेने केलें आहे. कलावंताची पत्नी म्हणून तिच्या वांट्याला येणारीं सारीं दुःखें ती प्रौढपणें, समंजसपणें व संयमाने सहन करते. या दांपत्याच्या लोकविलक्षण जीवनाशीं समरस होणारा अहंमद, आपल्या उदार पण खेळकर वर्तनाने या नाटकाला एक प्रकारचा तोल आणतो. रोहिणी ही प्रतिभावंताच्या जीवनांत कधी कधी डोकावून जाणाऱ्या व्यक्तींची प्रतिनिधि; नाटकाचा शेवट मात्र धूसर वाटतो; कलावंताच्या जीवनाचा हाहि एक स्वाभाविक पैलूच मानावयाचा काय ?

'एकदाच गाऊं दे' चा नायक गायक कलावंत असल्याने आणि त्याच्याभोवतीची प्रभावळहि गायनप्रेमी असल्याने नाटकांतील संगीताला स्वाभाविकपणा व अपरिहार्यता आली आहे; असें असलें तरी संगीताचा येथील वापर मितस्थ व औचित्यपूर्ण असा आहे. रागदारी-बरोबरच श्लोक, दोहे, अभंग यांचाहि येथे समयोचित अंतर्भाव आहे. १९६१ च्या एकंदर नाटकांत संगीत नाटकांची संख्या बरीच आहे. त्यांत संगीताचा मार्मिक वापर करणारी 'एकदाच गाऊं दे' किंवा 'चंद्र नभीचा ढळला,' 'माते तुला काय हवंयू' सारखीं नाटकें थोडींच.

संगीत आणि नाट्य यांच्या परस्परसंबंधावर आजपर्यंत उलटसुलट पुष्कळ चर्चा झाली आहे. नाटकांतील पारंपारिक संगीताचा अस्वाभाविकपणा दूर करण्यासाठी जे निरनिराळे प्रयोग चालले आहेत, त्यांतच स्वर-नाट्याचा अंतर्भाव करावयास हवा. असें खास स्वरूपाचें स्वरनाट्य १९६१ च्या नाट्यकृतींत आढळत नाही. तथापि एका बाजूला निव्वळ गद्यनाट्य व दुसऱ्या बाजूला शुद्ध स्वरनाट्य यांच्यांतील सुवर्णमध्य घेऊन एक नवें रसायन बनविण्याचा प्रयत्न श्री. प्रभाकर नेने यांनी आपल्या 'सूत्रधार, तो आणि ती' मध्ये केला आहे. या प्रयोगाचें त्यांनी जें नामकरण केलें आहे, तें 'काव्यनाटिका' असें. या रचनाप्रयोगांत रेडिओ-तंत्र व रंगभूमीवरील तंत्र यांचें मिश्रण असल्याचें प्रा. अनंत काणेकरांनी या

नाटकाच्या प्रास्ताविकांत सूचित केलें आहे. खुद्द लेखकाने आपली भूमिका मांडली आहे ती अशीः—

"साध्या संगीतप्रधान नाटकापेक्षा काव्यनाटिका निराळी म्हणावयाची ती दोहोंतील पद्यविभागाच्या आणि संगीताच्या भिन्न पद्धतीमुळे. संगीतप्रधान नाटकांत वापरलेल्या पदांचा (नाट्य–गीतांचा) आपल्या मनावर जो काय परिणाम होतो तो पदांच्या शब्दार्थांमुळे नसून शब्दामागून स्वरांचा गुंजारव उठविणाऱ्या संगीतकलेच्या विलासामुळे. नाट्यवस्तूच्या विकासाच्या दृष्टीनं असली पद्यरचना वाचतांना वगळली अथवा प्रयोगांत प्रसंगोपात्त गाळली तर कथानकांत अनुस्यूत असलेल्या प्रसंगाच्या रंगसंगतीला धक्का पोहोचेलच असं नाही. संगीत नाटकांतून वापरलेलीं पदं ऐकतांना शब्दांपेक्षा स्वरांवर व अर्थापेक्षा स्वरविस्तारावर आपलं अवधान अधिक असतं आणि म्हणूनच संगीत पडलं की, नाटक कोलमडलं असं आपण म्हणतों. केवळ संगीतकलेला खेळविण्यासाठी केलेलीं ठुमरी स्वरूपाचीं पदें हीं नाट्यकथाबीजाच्या मार्गांतील विसाव्याच्या जागेप्रमाणे वापरलेलीं असतात, तर काव्यनाटिकेंत अभिप्रेत असलेली पदरचना ही प्रथम काव्यपूर्ण असते. या काव्यांतून कथानकाचा एक धागा पुढं सरकत असल्याकारणानं तें काव्य नाटकाच्या वाचनांत अथवा प्रयोगांत गाळलं तर कथानकाच्या रंगसंगतीचा एखादा दुवा तुटला आहे असं आपल्याला वाटतं ! अशा स्वरूपाची काव्यरचना गाऊन दाखविली अथवा साधी म्हटली तरी आपल्यावर होणाऱ्या तिच्या परिणामांत फरक पडायचा नाही. काव्यनाटिका हा गद्य आणि पद्य यांचा रसपरिपूर्ण असा मिलाफ आहे ! कथानकाच्या ओघांत उत्कटत्वाला पोहोचलेली भावना काव्यांतून रंगवावयाची व भावनेची उत्कटता उतरंडीला लागली की, काव्यकला आटोपती घ्यायची या धोरणाचं अवलंबन लेखकाला प्रस्तुत नाट्यप्रकारांत करावं लागतं !"

नाटकांतील संगीताचा घाट उत्तरकालीन संगीत नाटकांतून अनेक कारणांनी बिघडला असला तरी किर्लोस्कर-देवल यांनी पदरचना करतांना श्री. नेने यांना अभिप्रेत असलेलीच भूमिका तत्त्वतः पत्करिली असावी, असें 'सौभद्र' वा 'संशयकल्लोळ' मधील संगीतयोजनेवरून वाटतें. संस्कृत नाटकांतील गद्यपद्याचें मिश्रणहि याच धोरणाने केलें जात होतें.

काव्यनाटिकेची ही कल्पना तशी नवी नसली तरी त्यामुळे श्री. नेने यांच्या प्रयोगाचें महत्त्व कमी होत नाही. कारण त्यांनी या प्रकारच्या प्रयोगाकडे पुन्हा लक्ष वेधून त्याच्या पुनर्विचारास प्रवृत्त केलें आहे.

एकाऐवजी अधिक लेखकांनी एखादें नाटक लिहिण्याच्या पद्धतीला नवा प्रयोग मानल्यास श्री. मो. ग. रांगणेकर, श्री. वसंत सबनीस व श्री. ग. दि. माडगूळकर या तीन लेखकांनी प्रत्येकी एकेक अंक लिहून पूर्ण केलेल्या 'हेही दिवस जातील' या नाटकालाहि प्रयोगशील म्हणावें लागेल. पण या नाटकाकडे एक नवा प्रयोग या दृष्टीने न पाहतां एक टूम या दृष्टीनेच पाहणें इष्ट. काव्य, कथा, कादंबरी या क्षेत्रांत ही टूम हाताळून झाली आहे. तींतून कांही फलनिष्पत्ति झाल्याचा दाखला नाही.

प्रस्तुत नाटकाच्या प्रास्ताविकांत या नाटकाला फार्स न म्हणतां विनोदी नाटक संबोधावें, अशीहि एक कांहीशी आग्रही सूचना श्री. रांगणेकर करतात. फार्स हा हलक्या प्रतीचा नसतो, हें त्यांनीच मान्य केल्यानंतर अमुक कृति फार्स आहे कीं विनोदी नाटक आहे याचा विचार एकप्रकारें निरर्थकच. फार्स हा घटनाप्रधान असतो व विनोदी नाटक हें बौद्धिक कोटिबाजपणा वा

साहित्यिक विनोद यावर आधारलेलें असतें, असा जो वरील दोन प्रकारांतील फरक रांगणेकर दाखवितात तोहि तेवढा बरोबर नाही. हास्यनिर्मिति करणें हें एकमेव उद्दिष्ट ज्या वेळीं गृहीत धरलेलें असतें, त्या वेळीं त्याची जात फार्साचीच मानावी लागेल, मग त्यांतील विनोद घटनांप्रधान आहे कीं वाङ्मयीन कोटिबाजपणाचा आहे हा मुद्दा गौण ठरतो. खेळकर वातावरण, तरलता, प्रसन्नता, भावनेचा हलुवारपणा, व्यक्तिदर्शनांतील सूक्ष्मता इत्यादि घटकांमुळेच एखादी हास्य-प्रधान नाट्यकृति कॉमेडी ठरत असते. 'हेही दिवस जातील' मधील केवळ हास्यनिर्मिती-साठी स्थूल पद्धतीचा केलेला अवलंब पाहतां याला फार्स म्हणणेंच योग्य होईल. या नाटकाचा एकूण घाट पाहतां नाटकापेक्षाहि तो विनोदी लेखालाच अधिक जवळचा वाटतो. खुसखुशीत विनोदी लेखांत असलेला सारा मालमसाला-उपरोध, उपहास, विडंबन, अतिशयोक्ति, टीका वगैरे–यांत भरपूर आहे.

फार्स की कॉमेडी असा प्रश्नच निर्माण करावयाचा झाल्यास तो प्रा. वसंत कानेटकर यांच्या 'प्रेमा तुझा रंग कसा' च्या संदर्भात करणें अधिक वाजवी ठरेल. खुद्द लेखक या नाटकाला कॉमेडी मानतो तर या नाटकाची भलावण करणारे प्रा. ना. सी. फडके याला फार्सच्या सरहद्दींना स्पर्श करणारें नाटक मानतात. या नाटकांतील प्रमुख पात्र, प्रा. बल्लाळ सोडल्यास बचाजी, बब्बड, बाजीराव, प्रियंवदाबाई इत्यादि पात्रांचें चित्रण फार्सकडेच झुकणारें आहे. नाटकाच्या मांडणींतहि, गांभीर्याची शक्यता निर्माण होत असतांहि ती टाळून हास्यनिर्मितीकडेच हेतुपुरस्सर लक्ष पुरविलें आहे. बहुसंख्य विनोदी नाटकें विनोदाच्या जोडीला शृंगाराचा आश्रय करतात. येथे तर प्रत्येक पिढींत प्रेमविषयक कल्पनांचें ठराविक पद्धतीने कसें आवर्तन घडतें हेंच लेखकाला दाखवावयाचें असल्याने, प्रेम या विषयाला अग्रस्थान स्वाभाविकपणेंच मिळतें. विवाहपूर्व स्वप्नाळू प्रेमकल्पनांपासून तों प्रेमाला प्रौढ, समंजस स्वरूप प्राप्त करून देणाऱ्या अपत्यप्राप्तीपर्यंतचीं प्रेमाचीं अवस्थांतरें प्रकट करण्या-साठी बल्लाळकन्या बब्बड व जामात बाजी यांना नाटककाराने प्राधान्य दिलें आहे. प्रत्येक अंकांत स्थूलमानाने एकेका अवस्थेचें चित्रण येतें; हें सारें चक्र पूर्ण करण्यासाठी नाटकाचा एकंदर काल दोन-अडीच वर्षांचा पत्करावा लागला आहे. बल्लाळपुत्र बच्च्याजीच्या निमित्ताने प्रेमाच्या पुस्तकी कल्पना व त्यांचें विडंबन लेखकाला अभिप्रेत दिसतें. निळूभाऊ गोरे हे प्रेमविषयक सनातन दृष्टिकोण प्रगट करणारे तर सुशील तुळजापूरकर प्रेमाकडे आत्मकेंद्रित व स्वार्थी दृष्टीने पाहणारी, अशी ही प्रेम या विषयाला वाहिलेली पात्रयोजना आहे;या योजनेंत बल्लाळ-पत्नी सौ. प्रियंवदाबाई यांना मात्र विनोदनिर्मितीला साह्य करण्यापलीकडे कसलेंच स्थान नाही, त्यामुळे सर्व नाटकभर त्या प्रामुख्याने वावरून सुद्धा अधांतरीं तरंगत असल्यासारख्या दिसतात. या सर्वांत अतिशय महत्त्वाची कोणती व्यक्ती असेल तर ती प्रा. बल्लाळ मार्तंड गुप्ते ही; हें नाटक प्रहसनाच्या मर्यादा ओलांडून वरच्या पातळीवर जातें, तें या व्यक्तीमुळेच. प्रौढ, वत्सल, खेळकर, खोडकर, रसिक व प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा हा माणूस उभा करून प्रा. कानेटकरांनी मराठी रंगभूमीला एक चांगली व्यक्तिरेखा बहाल केली आहे. प्रा. कानेटकरांचें हें तिसरें नाटक असल्यामुळे त्याच्या मांडणींत एक अनुभवी सराईतपणा जाणवतो. एका ठराविक पद्धतीचीच नाट्यकृति न लिहितां प्रत्येक खेपेला कांही नवा उपक्रम करण्याची ही प्रा. कानेटकरांची पद्धति रंगभूमीच्या विकासाला पोषक ठरणारी आहे.

'प्रेमा तुझा रंग कसा ?', 'सूत्रधार–तो आणि ती' प्रमाणेच विनोदप्रवण आणि स्त्री-पुरुषाविषयक प्रेमाची चर्चा करणारें आणखी एक नाटक म्हणजे डॉ. वा. व. मुंढे यांचें 'लग्न

न केलें तर !' या नाट्यकृतीची प्रकृति वरील दोन नाटकांपेक्षा अधिक गंभीर आहे. तींत चर्चाप्राधान्य आढळतें. हुंडा, मुलींचीं वाढतीं वयें, कुमारी माता इ. सारेच प्रश्न एकाच नाटकांत गुंफण्याचा येथे प्रयत्न केल्याने सुसंगता कमी झाली आहे. रचनापद्धतींतील ताजे-पणाचा अभावहि जाणवतो. हाच अभाव श्री. राजा बढे यांच्या 'अशी गंमत आहे'मध्येहि जाणवतो. हें नाटक १७–१८ वर्षांपूर्वी लिहिलें गेलें, हें कांही याचें कारण नव्हे. नाटक केव्हाहि लिहिलें तरी चांगल्या नाटकाला न शोभणारा संथपणा, बालिश कोट्या, कृत्रिम व्यक्तिरेखाटन इत्यादि घटक येण्याचें कारण नाही. छोटू नांवाच्या १२–१३ वर्षांच्या व तीन-चार इयत्ता इंग्रजी शिकलेल्या एका मुलाला प्राधान्य देऊन हें नाटक रचलें आहे. पण या मुलाचें बोलणें, वागणें त्याच्या वयाला न शोभणारें, प्रौढ, फाजील सलगीचें व क्वचित् शिष्टपणाचें वाटतें. हें सारें विनोदनिर्मितीसाठी केलें आहे असें मानल्यास त्यांतील उथळपणा बोचत राहतो.

विनोदप्रवण नाट्यकृतींचा (व १९६१ च्या एकंदर नाटकांचा) विचार संपविण्या-पूर्वी गंगाधर गाडगीळ यांच्या 'बंडू नाटक करतो' व पु. ल. देशपांडे यांच्या 'विठ्ठल तो आला आला' या एकांकिका संग्रहांचा आवर्जून उल्लेख करावयास पाहिजे. हे दोघेहि आजचे सिद्धहस्त पण वेगवेगळ्या प्रकृतीचे लेखक. पु. ल. देशपांडे हे नाट्य व विनोद या क्षेत्रांत प्रामुख्याने वावरणारे तर विनोद हा गाडगिळांच्या लेखनशैलीचा एक विशिष्ट पैलू, नाटकांच्या संदर्भात तर त्यांचा संबंध एकांकिकेपुरता मर्यादित व तोहि बंडूच्या अनुरोधाने आलेला, त्यांचें बरेंचसें विनोदी लेखन बंडू-स्नेहलतेच्या अनुषंगानेच झालेलें. या दांपत्याला श्रीपाद कृष्ण, गडकरी, चिं. वि. जोशी इत्यादि लेखकांनी घडविलेल्या विनोदमूर्तींचा वारसा लाभलेला आहे. विक्षिप्त, वेंधळ्या, भाबड्या आणि सामान्य जीवनक्रमांत रुळलेल्या या व्यक्तींच्या लोकविलक्षण दृष्टिकोणांतून दैनंदिन जीवनांतील घडामोडींवर विडंबन, उपरोध, उपहास, विसंगति वक्रोक्ति इत्यादींचें हत्यार उपसावयाचें, हें यांचें मुख्य काम. या त्यांच्या कामगिरीला नाट्याच्या माध्यमाची तशी गरज (प्रस्तुत एकांकिकापुरती तरी) दिसत नाही. बंडू स्नेहलतेच्या वागण्या-बोलण्याला अभिनयाची जोड मिळण्याची संधि मात्र यामुळे निर्माण झाली आहे. या साऱ्या नाटिकेंतून प्रामुख्याने हीं दोनच पात्रें वावरतात. वातावरणहि ठराविक पद्धतीचें आहे. घटनाहि अगदी साध्या व घरगुती, भामुली मानतां येतील अशा; आणि त्यांची प्रतिक्रियाहि ठरलेली अशीच म्हणजे विक्षिप्त,' ब्रात्य वा पोरकट. वेगळेपणा आहे तो स्नेहलतेच्या कुरघोडीचें स्वरूप बदलण्यांत; स्नेहलता बंडूपेक्षा अधिक व्यवहारचतुर आहे. बंडूचें वर्तन पूर्णतया फार्सच्या पातळीवरचें.

अतिशयोक्ति, बालिशता, आर्षता, विडंबन आणि व्यंग चित्राच्या पद्धतीचें चित्रण ही गाडगिळांची विनोदनिर्मितीची पद्धति तर निरनिराळ्या प्रकारचें व निरनिराळ्या पातळ्यांवरून केलेलें व्यक्तिदर्शन, विरोधी वातावरणाची निर्मिति, उपरोध, विसंगति इत्यादींचा अवलंब हीं पु. ल., यांच्या विनोदाचीं वैशिष्ट्यें. 'विठ्ठल तो आला, आला' मध्ये तीनच एकांकिका आहेत. पण त्या तीन प्रकारच्या 'विठ्ठल तो आला आला' मध्ये विठ्ठल-मंदिरांत मूर्तिमंत विठ्ठलाचा अवतार झाल्यास निरनिराळ्या सामाजिक थरांतील भक्तगणांवर त्याचा काय परिणाम होईल, याचें उपरोधपूर्ण चित्रण आहे. तर 'नाही आसू नाही माया'-मध्ये एका विशिष्ट सामाजिक स्थराचें चित्रण आढळतें. माध्यमिक शाळेंतील शिक्षकवर्गाची

खोली व तेथील शिक्षक-शिक्षिकांच्या मनोवृत्तीचे कंगोरे व त्यांच्या कळंजलेल्या जीवनांतील कारुण्य, पु. ल. यांना येथे अभिप्रेत दिसतें. या नाटिकेला त्यामुळे एक कडवटं चव आली आहे. कारुण्याच्या कडावर तरळणारा विनोद नेहमीच श्रेष्ठ मानला जातो, कारण त्यांच्या पातळ्या परस्परांत मिसळणें दुष्कर असतें, अशी दुष्कर किमया पु. ल. यांनीं 'सांत्वन'मध्ये विशेषत्वाने साधली आहे. सच्चें मूक दुःख, पोशाखी उपचार, मतलबी शिष्टाचार आणि निष्पाप मोकळेपणा यांचें एक सूक्ष्म, तरल आणि भेदक रसायन येथे तयार झालें आहे. हस्तिदंताच्या बारीक तुकड्यांवर नाजूक व गुंतागुंतीचें नक्षीकाम साधण्याचें कौशल्य येथे लेखकाने प्रकट केलें आहे. मराठींत आधीच एकांकिका फार थोड्या, यशस्वी झालेल्या त्याहूनहि थोड्या आणि वाचकाच्या मर्माला जाऊन भिडणाऱ्या तर विरळाच. अशा दुर्मिळ एकांकिकेंत 'सांत्वन'ची गणना करावयास पाहिजे.

१९६१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या नाट्यवाङ्मयाचें सर्वसाधारण स्वरूप वरीलप्रमाणे आहे. या समालोचनांत प्राधान्याने वाङ्मयीन दृष्टिकोणाचाच अवलंब केला आहे; प्रसिद्ध झालेल्या यच्चयावत् नाटकांचा अंतर्भाव येथे झालेला नाही. कांही नाट्यवाङ्मय प्रस्तुत लेखकाला उपलब्ध होऊं शकलेलें नाही, त्यामुळे एखादी दुसरी महत्त्वाची नाट्यकृति दुर्लक्षित राहिली असण्याचाहि संभव आहे. तथापि जीं नाटकें हातीं आलीं त्यांवरून सर्वसामान्य स्वरूपाचे निष्कर्ष काढावयाचे झाल्यास असे—

नाटकांचें संख्यात्मक वैपुल्य व रचनावैविध्य विचारांत घेतां नाट्याबद्दलचा सर्वसाधारण उत्साह ज्याप्रमाणे त्यांतून प्रकट होतो, त्याप्रमाणेच समाजांतील विविध प्रकारच्या अभिरुचि, गरजा व अपेक्षा यांचीहि कल्पना येते. एकूण नाटकांत प्रचारात्मक, अनुवादात्मक, ऐतिहासिक, पौराणिक इत्यादि प्रकारच्या नाटकांची संख्या फार थोडी असून सामाजिक नाटकांवरच विशेष भर आहे.; त्यांतहि समस्याप्रधान नाटकें थोडींच आढळतात. वातावरण-निर्मिति, व्यक्तिदर्शन वा घटनांची गुंतागुंत यावर दृष्टि ठेवून लिहिलेलींच नाटकें बहुसंख्य. त्यांतहि उथळपणाच अधिक दिसतो. संगीताचा सैलपणें वापर करणाऱ्या नाटकांची संख्याहि दुर्लक्षितां येण्याजोगी नाही. शोकात्मिका व सुखात्मिका यांचें प्रमाण जवळजवळ सारखें असलें तरी एकंदर काटा झुकतो तो सुखात्मिकाकडे; सुखात्मिकांतहि विशेष भरणा आहे तो फार्सचा. अस्सल नाट्यनिर्मितीपेक्षा उत्साहाचें भांडवलच एकंदरीने अधिक. १९६१ च्या नाट्य-वाङ्मयाच्या प्रकाशकांत परचुरे प्रकाशन-मंदिर व चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर या दोन संस्था अग्रस्थानीं आहेत.

१९६१ च्या नाट्यकृतींत आणखी एक गोष्ट ठळकपणें जाणवते ती म्हणजे तंत्राचा कमी झालेला बडिवार वा सोस. गेल्या कांही वर्षांत विशिष्ट प्रकारच्या तंत्रपद्धतीला (एक-प्रवेशी अंक, स्वगतांचें उच्चाटन इ.) काटेकोरपणें जखडून घेण्याची वृत्ति या सालच्या निर्मितींत आढळत नाही. अनेक प्रवेशी अंक वा स्वगतांचा वापर करणारीं नाटकें १९६१ च्या निर्मितींत थोडीं नाहीत. यांत्रिक वा तांत्रिक युक्त्यांच्या अवलंबाने प्रेक्षकांना दिपविण्याचा खास हव्यासहि या सालच्या नाट्यकृतींत दिसत नाही. एखादा नवा प्रयोग करून पाहण्याची जिद्दहि कमीच आहे. काव्य या कथेच्या तुलनेने मराठी नाटकाला अद्यापि बरीच मजल मारावयाची आहे, तसा एखादा टप्पा दृष्टिपथांत येण्याजोगें १९६१ च्या नाट्यकृतींत कांही घडल्याचें आढळत नाही.

* * *

रामचंद्र चिंतामण ढेरे

# साहित्य-संशोधन-१९६१

## सांस्कृतिक इतिहासाचें एक अंग

साहित्याला सुसंबद्ध आणि सुस्पष्ट इतिहास लिहिण्याची पार्श्वभूमि तयार करणें हें साहित्य-संशोधनाचें उद्दिष्ट असतें. मराठी साहित्य-संशोधन हें प्राधान्याने बाराव्या शतकाच्या प्रारंभापासून अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत निर्माण झालेल्या वाङ्मयाशीं निगडित आहे. या सात शतकांतील वाङ्मय-संभारांतील अनेक कृति साहित्य-गुणांनी समृद्ध असल्या तरी या सर्व वाङ्मय-प्रवाहामधील प्रेरणा साहित्य-सृजनाच्या नसून, बहुंशीं भक्ति-साधनेच्या आहेत. हें सर्व वाङ्मय प्राधान्याने धर्माधिष्ठित आहे. हें वाङ्मय निर्माण करणारे बहुतेक ग्रंथकार परमार्थ-पथावरचे प्रवासी होते आणि ते सर्व विविध भक्ति-पंथांच्या परंपरांच्या धाग्यांत गुंफले गेले होते. या वस्तुस्थितीमुळे मराठी-साहित्य-संशोधन हें साहित्याच्या इतिहासापेक्षा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचें एक अंग म्हणूनच नांदत आलेलें आहे.

## साहित्य-संशोधनाचीं अंगोपांगें

विवक्षित कालखंडांतील अज्ञात कृतींचा शोध घेणें, उपलब्ध ग्रंथांचा स्थल-काल आणि कर्ता निश्चित करणें, ग्रंथकर्त्यांच्या चरित्राचें आणि परंपरेचें संशोधन करणें, नामसाम्यामुळे निर्माण झालेली संदिग्धता दूर करण्यासाठी पुरावे शोधणें, प्रसिद्ध ग्रंथकारांच्या नांवावर आपली कृति हेतुतः खपविण्याच्या प्रवृत्तीमुळे शंकास्पद बनविलेल्या ग्रंथ-कर्तृत्वाचा उलगडा करणें, ग्रंथान्तर्गत प्रक्षेप शोधून दूर करणें, उपलब्ध ग्रंथांचें अंतरंगपरीक्षण करून त्या त्या ग्रंथाच्या प्रेरणांचा शोध घेणें, लेखन दोषामुळे विकृत बनलेल्या संहितांची पाठशुद्धि करणें आणि ग्रंथ व ग्रंथकार यांविषयीच्या सर्वांगीण परीक्षणासह ग्रंथांच्या विचिकित्सित संहितांचें संपादन करणें हीं स्थूलपणाने साहित्य-संशोधनाचीं अंगोपांगें आहेत. प्राचीन मराठी साहित्य हें बहुंशीं भक्ति-प्रेरित असल्यामुळे भक्तिसंप्रदाय आणि भक्तिविषय बनलेल्या देवता यांविषयींचें संशोधनहि साहित्य-संशोधनाशीं जवळचें नातें जोडतें.

## सन १९६१ मधील संशोधन

मराठी साहित्य-संशोधनाची उपरिनिर्दिष्ट कालव्याप्ति आणि विषयव्याप्ति ध्यानीं घेऊन सन १९६१ मधील संशोधनविषयक ग्रंथांचें व लेखांचें समालोचन करावयाचें योजिलें आहे. सन १९६१ मध्ये 'हरिवरदा' : खंड सातवा (संपादक रा. चिं. ढेरे), 'शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह' (संपादक वा. सी. बेंद्रे), 'आज्ञापत्र' (संपादक प्रा. श्री. ना. बनहट्टी) आणि 'अयाचितसुत-काशी-कृत द्रौपदी-स्वयंवर' (संपादक डॉ. वा. दा. गोखले) हीं चार प्राचीन ग्रंथांचीं संपादनें प्रकाशित झालीं आहेत. तसेंच, 'लोकनाट्याची परंपरा' (वि. कृ. जोशी) व 'मराठी शाहिरी वाङ्मय' (म. ना. सहस्रबुद्धे) हे दोन

अनुक्रमणिका

शाहिरी वाङ्मयविषयक संशोधन-ग्रंथ, 'खंडोबा' (रा. चिं. ढेरे) हें देवता वैज्ञानिक संशोधन आणि 'मुकुंदराजांची अंबानगरी कोणती?' (वि. अं. कानोले) हा मुकुंदराज-चरित्रांतील स्थलविषयक वादावर प्रकाश टाकणारा ग्रंथ यांचाहि समावेश मी प्रस्तुत समालोचनांत करणार आहें; त्याचबरोबर नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या (मला आढळलेल्या) संशोधनात्मक लेखांचाहि स्थूल परामर्श घ्यावयाचा आहे.

## प्राचीन ग्रंथांचीं संपादनें

हरिवरदा : खंड सातवा : नाथांच्या परंपरेंतील श्रीकृष्ण दयार्णवांची दशमस्कंधावरील 'हरिवरदा' ही प्रचंड टीका आता सर्व अभ्यासक-रसिकांच्या परिचयाची झालेली आहे. सुमारें ऐंशी वर्षांपूर्वी श्री. तेंडुलकर नामक सद्गृहस्थांनी हा बेचाळीस हजार ओव्यांचा बृहद्ग्रंथ पोथीस्वरूपांत छापून प्रसिद्ध केला होता. ती छापील पोथीहि आता हस्तलिखिताइतकीच दुर्मिळ झाली आहे. श्रीकृष्णदयार्णवांचे वंशज श्री. दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर यांनी या ग्रंथाचें पुनः प्रकाशन करण्याचा विराट् संकल्प करून तो सुमारें सात वर्षांत पूर्णतया प्रत्यक्षांत आणला. (हरिवरदेचा आठवा आणि अखेरचा खंड नुकताच प्रसिद्ध झाला आहे.) एकहि पूर्ण हस्त-लिखित संपादक-प्रकाशकांच्या स्वाधीन होऊं न शकल्याने तेंडुलकरांच्या मुद्रित प्रतीचेंच पुनर्मुद्रण करावें लागलें. डबलक्राऊन आकाराच्या एकवीसशेंहून अधिक पृष्ठांत पुनः मुद्रित केलेला हा ग्रंथ मुद्रणदृष्ट्या सर्वांगसुंदर झाला आहे. प्रस्तुत ग्रंथाचें संपादन माझ्याकडे चौथ्या खंडापासून आलें. क्र. ४ ते ८ या पांच खंडांना लिहिलेल्या छोट्या प्रस्तावनांतून मीं माझ्या अल्पशक्त्यनुसार ग्रंथकाराच्या प्रज्ञेचे, रसिकतेचे आणि भक्तीचे विशेष उलगडून दाखविले आहेत आणि ग्रंथकाराच्या चरित्राविषयी व परंपरेविषयी कांही नवी माहिती उजेडांत आणली आहे. या ग्रंथाची बृहत्ता आणि ज्ञानकोशासारखी महत्ता ध्यानीं घेतां लहानशा संपादकीय लेखनांत त्याच्या समग्र अंतरंगाचा वेध घेणें सर्वथा अशक्य आहे. संपादकांनी प्रस्तावनांतून निर्देशिलेल्या वैशिष्ट्यांच्या अनुरोधाने अध्ययन करणाऱ्या अभ्यासकांची मांदियाळी सिद्ध होईल, तेव्हाच या ग्रंथांतील रत्नांचा पुरेसा उपसा करणें शक्य होईल. काव्य, तत्त्वज्ञान व भक्ति यांचा त्रिवेणीसंगम बनलेला हा ग्रंथ संस्कृतप्रचुर विदग्ध मराठींत लिहिलेला आहे. "मोरोपंतांनी मराठी भाषेला संस्कृतची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली," हें विधान 'हरिवरदे'च्या प्रकाशनानंतर श्रीकृष्णदयार्णवांना अधिक यथार्थपणें लागू पडतें, अशी अनेक रसिकांनी ग्वाही दिली आहे.

शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह : नामवंत संशोधक श्री. वा. सी. बेंद्रे यांनी सन १९५९ मध्ये शेख महंमदाचा 'योगसंग्राम' हा ग्रंथ विचिकित्सित स्वरूपांत प्रसिद्ध केला आणि आता शेख महंमदाच्या संकीर्ण कवितेची विचिकित्सित आवृत्ति त्यांनी मराठी अभ्यासकांच्या पुढे ठेवली आहे. श्री. बेंद्रे यांच्या या कार्यामुळे शेख महंमदासारख्या मुक्त चिंतकाची समग्रवाणी आपल्या हातीं पडली आहे. 'योगसंग्रामा'ला लिहिलेल्या प्रस्तावनेंत श्री. बेंद्रे यांनी शेख महंमदाच्या चरित्राविषयीचें संशोधन विस्तारपूर्वक मांडलें असल्यामुळे प्रस्तुत संग्रहाच्या प्रस्तावनेंत त्यांनी चरित्राविषयी कांही न लिहितां, संकीर्ण कवितासंग्रहांत व्यक्त झालेल्या विचार-प्रणालीचाच तात्त्विक परामर्श घेतला आहे. विशेषतः शेख महंमदाच्या विचारांवरील कुराणाचा प्रभाव दाखवूनहि त्यांनी हें स्पष्ट करून दाखविलें आहे की, शेख महंमदाची वाणी ही पंथनिरपेक्ष शुद्ध पराविद्येने नटलेली आहे. तो कबीरासारखा मुक्त चिंतक

आहे. या प्रखर विवेकनिष्ठेमुळे, तो स्वतः सूफी परंपरेतला असूनहि सूफींच्या अनाचारांवर हल्ला चढवितो. शेख महंमदाच्या परंपरेतील माहिती हातीं असूनहि श्री. वेंद्रे यांचा त्याच्या परंपरेविषयी कांहीं गैरसमज झालेला दिसतो. शेख महंमद ज्या कादरी पंथांतील आहे, तो कादरी पंथ म्हणजे भारतांत प्रविष्ट झालेल्या सूफींच्या चार प्रमुख उपपंथांपैकी एक होय, हें श्री. वेंद्रे यांना अज्ञात दिसतें. इ. स. १५१६ मध्ये भारतांत आलेला पहिला कादरी सूफी प्रचारक सय्यद महंमद गौस हा होय. या महंमद गौसचा शिष्य सय्यद राजे महंमद (शेख महंमदाचा पिता) होय. महंमद गौस–राजे महंमद–चांद बोधले–शेख महंमद अशी शेख-महंमदाची परंपरा आहे. मुसलमान घराण्यांत जन्म, महाराष्ट्रांत निवास आणि हिंदु गुरूचा परमार्थबोध असा विचित्र योग ज्याच्या जीवनांत घडून आला, तो हा शेख महंमद या योगा-योगाचें वर्णन 'बाभळीच्या झाडा। आंबे आले पाडा' अशा भाषेंत करतो !

धार्मिक अनाचारांवर हल्ला चढवितांना शेख महंमदाने जो तपशील पुरविला आहे, तो शिवकालीन सामाजिक इतिहासाला अत्यंत उपकारक ठरणारा आहे. श्री. वेंद्रे यांच्या-सारख्या इतिहासज्ञ संपादकाने त्या तपशिलाचें ऐतिहासिक महत्त्व विशद करून सांगावयास हवें होतें, अशी स्वाभाविक अपेक्षा निर्माण होते. शेख महंमदाच्या या कवितासंग्रहांत महानु-भावीयांविषयी आलेले अनेक उल्लेख (पृ ३१, ३२, ३३, ५६, ९३, १०४, १०८) एकत्र तपासले, तर या पंथाविषयी महाराष्ट्रांत अप्रीति कां निर्माण झाली, याचें कारण स्पष्ट होतें. खंडोबासारख्या क्षुद्र देवतांची उपासना, मुरळ्यांच्या प्रथेसारखे धार्मिक अनाचार, तंबाखूचें व्यसन इत्यादि सामाजिकदृष्ट्या महत्त्वाच्या बाबींचे तपशील अनेक ठिकाणीं आलेले आहेत. 'दुरूनि डोंगर दिसती शोभिवंत' (पृ. ६१), 'वस्त्राआड नग्न काष्ठाआड अग्न' (पृ. ६८); 'हुरळल्या मेंढ्या, लांडग्यापाठीं लागल्या' (पृ. ८७) अशा कवितेंत गोवलेल्या रूढ म्हणींचें तत्कालीन अस्तित्व भाषेच्या अभ्यासकांना उपकारक आहे. अनाचारी जनांवर हल्ला चढवितांना दोन-तीन स्फुटांत (पृ. ९१, १०१) शेख महंमदाने वापरलेली भाषा अत्यंत ग्राम्य आहे. हेतूची शुद्धता ध्यानीं घेऊनहि आजच्या वाचकाला ही ग्राम्यता असमर्थनीय वाटेल. श्री. वेंद्रे यांच्या प्रस्तावनेंत आशयाच्या या विविध अंगांची आणि रंगांची चर्चा अपेक्षित होती. परंतु काय केलें नाहीं, त्यापेक्षा काय केलें आहे, याचाच विचार अधिक विधायक ठरेल. श्री. वेंद्रे यांनी इतक्या चांगल्या स्वरूपांत शेख महंमदाची उपलब्ध समग्र वाणी वाचकांच्या हातीं दिली, हें त्यांचें कार्य निःसंशय मोलाचें आहे. पृ. ६९ वरील 'मूर्ति एकली मीं देखिली' (क्र. १२१) हें पद समर्थ वाग्देवता मंदिरांतील बाडांतून शेख महंमदाचें म्हणून येथे संग्रहित केलें आहे. परंतु 'साहेबनाथ गुरुकिल्ली। शेख सुलताना दाखविली॥' या नाममुद्रे-वरून स्पष्ट होत आहे की, तें पद शेख महंमदाचें नसून त्रिपुटीच्या गोपाळनाथांचा शिष्य शेख सुलतान याचें आहे. पृ. ८३ वर 'ब्रह्मपुरीचे तुरुक' (क्र. १७९) अशा आरंभाचा एक अभंग आहे. शेख महंमद उद्गारतो :

कोणी आम्हांसी बाटले। बाटुनि मूळ ठायां गेले॥ ४॥
शेख महंमदीं बाटले। यातीवेगळें घातले॥ ५॥

या उद्गारांत शेख महंमद स्वतःच्या 'बाटग्या' कुळाचा तर अप्रत्यक्ष उल्लेख करीत नाही ना ? विचार करण्यासारखें हें स्थळ आहे.

आज्ञापत्र : 'आज्ञापत्र' हा ग्रंथ प्राचीन मराठी गद्याच्या इतिहासांत अनन्यसाधारण महत्त्व पावलेला आहे. या ग्रंथांत शिवछत्रपतींनी आचरलेली राजनीति अत्यंत प्रभावी भाषेंत ग्रथित केलेली आहे. प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी हस्तलिखित प्रतींवरून तयार केलेली ही संशोधित आवृत्ति सर्वांगसुंदर झालेली आहे. विस्तृत विवेचक प्रस्तावना, संशोधित संहिता, स्पष्टीकरणात्मक विपुल टीपा आणि उपयुक्त परिशिष्टें असें या आवृत्तीचें स्वरूप आहे. प्रा. बनहट्टी यांनी 'आज्ञापत्रा'चें अंतर्बाह्य निरीक्षण मोठ्या साक्षेपाने आणि रसज्ञ वृत्तीने केलें आहे.

'आज्ञापत्रा'चा कर्ता आणि त्याच्या पहिल्या दोन प्रकरणांतील ऐतिहासिक उल्लेख हे वादविषय बनलेले आहेत. प्रा. बनहट्टी हे 'आज्ञापत्रा'चा कर्ता रामचंद्रपंत अमात्य नव्हे, या पक्षाचे आहेत, हें सर्वांना अनेक वर्षांपासून माहीत होतें. परंतु 'आज्ञापत्रा'चा कर्ता त्यांच्या मतें कोण, हें या आवृत्तीच्या प्रकाशनापर्यंत प्रकट झालेलें नव्हतें. या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत प्रा. बनहट्टींनी 'आज्ञापत्रा'चें कर्तृत्व प्रत्यक्ष शिवछत्रपतींनाच बहाल करून टाकलें आणि अभ्यासकांना आश्चर्याचा प्रचंड धक्का दिला! स्वतः शिवछत्रपतींनी आपण व्यवहृत केलेल्या राजनीतीवर एक सुंदर ग्रंथ लिहिला आहे, ही घटना तशी भावनेला अत्यंत सुखविणारी आहे. परंतु शुद्ध ऐतिहासिक भूमिकेवरून ती स्थिर होऊं शकणार नाही. प्रा. बनहट्टींच्या मतें, हा ग्रंथ स्वतः शिवछत्रपतींनीच केलेला आहे—तो त्यांनी आग्र्याला जातांना प्रवासांत स्वमुखें कारकुनांना सांगितला आणि कारकुनांनी तो आपल्या प्रौढ अभिजात शैलीमध्ये उतरून घेतला! या सत्याचा साक्षात्कार प्रा. बनहट्टी यांना किती अभिनव रीतीने झाला आहे, तें त्यांच्याच शब्दांत पहा—

"आज्ञापत्रांत शिवाजीमहाराजांचीच राजनीति प्रकट झाली आहे, हें मान्य असल्यानंतर त्यावरून निघणारें स्वाभाविक अनुमान 'ती महाराजांनीच सांगितलेली असावी,' हें पटण्यास कांही अडचण वाटूं नये. राजनीतीसंबंधाचे आपले विचार एकदा ग्रंथनिविष्ट करून ठेवावे, असें महाराजांना केव्हा वाटलें असेल? असा काळ त्यांच्या आयुष्यांत एकदाच आला. तो म्हणजे जयसिंगाशीं तह करून ते औरंगजेबच्या भेटीला उत्तरेंत गेले तेव्हाचा होय. राजे ५ मार्च १६६६ रोजीं उत्तरेस जाण्यास निघाले व सव्वादोन महिन्यांनी आग्र्यास पोचले......असा कयास होतो की, याच काळांत नर्मदापार होत असतां राजांनी राजनीति सांगितली असावी आणि ती जवळच्या कारकुनांनी आपल्या प्रौढ अभिजात भाषेंत लिहून काढली असावी." (प्रस्तावना पृ. ४८).

"पुष्कळ चिंतनाअंतीं प्रस्तुत लेखकाचें असें मत झालें आहे की, या राजनीतीचे कर्ते प्रत्यक्ष शिवाजीमहाराज होत; दुसऱ्या कोणाच्या बुद्धींतून ही निघालेली असणें शक्य वाटत नाही. राजनीतींतील प्रत्यक्ष शब्द सगळेच महाराजांच्या तोंडून निघालेले नसतील. पण त्यांतला अर्थ–विचार आणि आशय–महाराजांनी सांगितलेला असला पाहिजे." (प्रस्तावना पृ ४७).

— या अनुमान-पद्धतीला कसलीहि शास्त्रीय बैठक नाही, हें वरवर पाहतांहि दिसून येईल.

(१) 'आज्ञापत्रांत शिवाजीमहाराजांचीच राजनीति प्रकट झाली आहे', हें मान्य असल्यावर 'ती महाराजांनीच सांगितलेली आहे', हें अनुमान स्वाभाविक कसें ठरतें? शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानावर लिहिलेला ग्रंथ, केवळ त्या ग्रंथांत शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान विवरिलें आहे आणि कर्त्याचा स्पष्ट निर्देश नाही, म्हणून शंकराचार्यांचाच मानावयाचा कीं काय?

(२) "राजांनी ही राजनीति सांगितली असावी आणि जवळच्या कारकुनांनी आपल्या प्रौढ अभिजात भाषेंत लिहून काढली असावी." "राजनीतींतले प्रत्यक्ष शब्द सगळेच महाराजांच्या तोंडून निघालेले नसतील. पण त्यांतला अर्थ–आशय व विचार–महाराजांनी सांगितलेला असला पाहिजे." प्रा. बनहट्टींचीं हीं विधानें 'पुष्कळ चिंतनाअंतीं' त्यांनी बनविलेल्या मताला बाधक आहेत. कारण प्रत्यक्ष शब्द महाराजांचे नसतील आणि प्रौढ अभिजात भाषा जवळच्या कारकुनांची असेल, तर केवळ आशयासाठी या ग्रंथांचें कर्तृत्व महाराजांकडे न जातां, तें 'जवळच्या कारकुनां' कडे जाईल, ही साधी गोष्ट स्वप्नरंजनाच्या ओघांत संपादक विसरून गेले आहेत.

(३) शिवछत्रपति हे आज्ञापत्राचे कर्ते आहेत, असें मत मांडल्यावर 'आज्ञापत्रां'त शिवछत्रपतींचे आलेले भूतकालीन उल्लेख नडूं लागले, म्हणून प्रा. बनहट्टींनी 'आज्ञापत्रा'च्या अनेक संस्करणांचा सिद्धान्त बनविला! वादविषय बनलेलीं पहिलीं दोन प्रकरणें आणि उपसंहार (या भागाचें ग्रंथाच्या गाभ्याशीं अंतरंगसाम्य स्पष्ट असतांनाहि) हा तर त्यांनी नव्या संस्करणाचा भाग मानलाच; परंतु पुस्तकाच्या गाभ्यांत जेथे जेथे शिवछत्रपतींचा भूतकाळीं उल्लेख असेल, तो प्रक्षेप मानावयाचा, असा त्यांनी सोयीस्कर मार्ग अवलंबिला आहे. ते म्हणतात, "आठव्या प्रकरणाच्या प्रारंभीचा महाराजांचें राज्य संपादन आणि औरंगजेबाची स्वारी यासंबंधीचा मजकूर संस्कारकाने घुसविला असावा." पांचव्या प्रकरणांत फ्रेंचांना वखारीला जागा दिल्यासंबंधीचा उल्लेख आहे. या उल्लेखाची अडचण प्रस्तावनेच्या वेळीं संपादकांना कशी वाटली नाही कोण जाणे! परंतु मागाहून मात्र टीपा देतांना त्यांनी त्या अडचणींतून कशीतरी सुटका करून घेण्याचा प्रयत्न केला आहे. 'आज्ञापत्रा'चा प्रा. बनहट्टी-प्रमाणित काळ मार्च ते मे १६६६ असा आहे आणि फ्रेंचांना जागा दिल्याचा काळ १६६७ आहे. हा काय छत्रपतींच्या त्रिकालज्ञतेचा पुरावा मानावयाचा? प्रा. बनहट्टी स्पष्टीकरण देतात: "आज्ञापत्राचा मुख्य मसुदा तयार झाल्यानंतर त्याच्यांत अशा कांही किरकोळ गोष्टींची भर मागाहून घातली असणें यांत असंभवनीय कांही नाही." एकदा शास्त्रचर्चेंत स्वप्नरंजनाचें प्राबल्य सुरू झाल्यावर 'असंभवनीय कांही नाही' हें मलाहि मान्य आहे!

— प्रा. बनहट्टी यांच्यासारख्या विचारकाचा साक्षेप अशा आग्रही आणि स्वप्नरंजित पद्धतीने शबलित व्हावा, याचा खेद वाटतो. एरवीं, त्यांचें काम सर्वच दृष्टींनी 'देखणें' झालें आहे, हें कोणीहि कबूल करील.

**अवचितसुत काशी-कृत द्रौपदी-स्वयंवर:** अवचितसुत काशी या शिवकालीन कवीचें महाकाव्याच्या धर्तीवर रचलेलें चतुर्दशसर्गात्मक श्लोकबद्ध (श्लोकसंख्या १००४) काव्य डॉ. वा. दा. गोखले यांनी अत्यंत साक्षेपाने संपादिलें आहे. हें काव्य एकोणिसाव्या शतकांत शिलामुद्रिताच्या स्वरूपांत प्रसिद्ध झालें होतें. परंतु तें शिलामुद्रितहि हस्तलिखिता-इतकेंच दुर्मिळ झालेलें आहे. संपादकांनी हें शिलामुद्रित आणि चार हस्तलिखितें प्राप्त करून या प्रतीचें संपादन केलें आहे. विवेचक प्रस्तावना, अर्थस्पष्टीकरणात्मक विपुल टीपा, संदर्भ-कथा, वृत्तयोजनेविषयींचें स्पष्टीकरण आणि चित्रबंधांच्या चित्रांचे ठसे–यांमुळे संपादनाला भारदस्त स्वरूप आलें आहे. याच कवीने याच विषयावर एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिलेला आहे. त्या ग्रंथांत कवीने दिलेल्या आत्मचरित्रात्मक माहितीवरून प्रस्तावनेंत कविचरित्रा-

विषयीची चर्चा केली आहे. कवीचें घराणें जेथे नांदत होतें, तें 'गौतम प्रदेशीं भारम ग्राम' गोदातीरावर नेमकें कोठे आहे, याचा शोध घेण्याचा प्रयत्न झाला असता, तर कदाचित् कवीच्या वंशजांचा पत्ता लागण्याचा संभव निर्माण झाला असता. तसेंच—

परिवार राहिला विठ्ठलपुरीं। आम्ही होतों नवरंगनगरीं।
अवचित निमाला देवगिरी। प्रारब्धगति विचित्र॥

या ओवींत, अवचितराव देवगिरीस मृत्यु पावले, असा अर्थ अभिप्रेत आहे, असें दिसतें. संपादकांनी 'देवगिरी' या शब्दाची दखल घेतलेली दिसत नाही. त्यांनी अवचितरावांचें मृत्युस्थळ अगोदरच्या कथाक्रमावर विसंबून दिल्ली हेंच मानलें आहे.

हा कवि विठ्ठलभक्त असून महानुभावीय लोक त्याला आपला कसा मानतात, याचें नीटसें स्पष्टीकरण मिळालेलें नाही. या कवीने 'यक्षदेव-आम्नाय-मंजरी' लिहिली आहे. त्या अर्थी हा महानुभाव पंथाच्या यक्षदेव आम्नायाचा दीक्षित असावा. यक्षदेव आम्नाय मुकुंदराज-परंपरेशीं सौहार्द जोडणारा आहे.

या कवीचें ओवीबद्ध 'द्रौपदी-स्वयंवर' (ओव्या ३५३८) प्रस्तुत श्लोकबद्ध काव्याहून अधिक सुश्लिष्ट आणि रसाळ आहे. तें ओवीबद्ध काव्य छापलें गेलें आहे. संपादकांनी कवि-परिचयाच्या निमित्ताने कवीच्या ओवीबद्ध ग्रंथाचें थोडेंसें रसग्रहण केलें असतें, तर जिज्ञासूंना तें उपकारक ठरलें असतें.

हा झाला अधिक अपेक्षांचा भाग. या अपेक्षा वजा करतां, डॉ. गोखले यांनी प्रस्तुत काव्याचें संपादन करून प्राचीन मराठी पंडितकवींच्या मंडळांत एक दुर्लक्षित क्षत्रिय कवि स्थिर केला आहे आणि विद्यापीठीय विद्यार्थ्यांना एक नवें 'पाठ्य' उपलब्ध करून दिलें आहे, या कार्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

## संशोधनात्मक ग्रंथ

'लोकनाट्याची परंपरा' आणि 'मराठी शाहिरी वाङ्मय' : हे अनुक्रमें वि. कृ. जोशी व म. ना. सहस्रबुद्धे यांनी लिहिलेले दोन ग्रंथ परस्परपूरक आहेत. श्री. वि. कृ. जोशी यांनी लोकनाट्याच्या संशोधनाची प्रेरणा श्री. म. ना. सहस्रबुद्धे यांच्याकडूनच घेतली आहे. श्री. जोशी यांनी शाहिरींतील लोकनाट्याची प्रकृति आणि प्रेरणा स्पष्ट करण्यासाठी, महाराष्ट्रांत पूर्वापार नांदत आलेल्या लोकधर्मी नाट्यपरंपरांचा शोध घेतला आहे, तर श्री. सहस्रबुद्धे यांनी शाहिरींतील वाङ्मयाची प्रकृति आणि प्रेरणा शोधण्यासाठी शाहिरीपूर्व मराठी वाङ्मयाचें आलोडन करून शाहिरी वाङ्मयावर विशेष प्रकाश टाकला आहे. या दोन पुस्तकांच्या प्रकाशनामुळे केवळ मराठी शाहिरी वाङ्मयाच्याच नव्हे, तर लौकिक पातळीवरील संस्कृति-प्रवाहाच्या अध्ययनाला वेगळी दिशा मिळेल, इतकें या दोन ग्रंथांचें एकत्रित महत्त्व आहे.

श्री. सहस्रबुद्धे यांच्या ग्रंथाची मांडणी अधिक नेटकी आहे. त्यांचीं मतें प्रदीर्घ चिंतनानें दृढ बनलेलीं आहेत. त्यांच्या सर्व विवेचनावर अभ्यस्त रसिकतेची छाया सर्वत्र पसरलेली आहे. त्यांची शैलीहि खास मराठी वळणाची आहे. शाहिरीची जातकुळी शोधण्यासाठी त्यांनी किती प्रचंड परिश्रम आणि प्रदीर्घ चिंतन केलें आहे, हें या ग्रंथाच्या पानापानांतून दिसून येत आहे. त्यांच्या परिश्रमांमुळे शाहिरींतील आध्यात्मिक अंग उपेक्षेच्या अंधारांतून

उजेडांत आलें आहे. शाहिरीची उपपत्ति, शाहिरांची भूमिका, मनोविनोदात्मक शाहिरी वाङ्मय (म्हणजे आध्यात्मिक विषयांवरील भेदिक कवनें), मनोरंजक शाहिरी वाङ्मय (शाहिरीचें सर्वपरिचित अंग), शाहिरींतलें कीर्तिकाव्य (पोवाडे), शाहिरीची रंगभूमि अशी श्री. सहस्रबुद्धे यांच्या ग्रंथाची आखणी आहे. 'शाहिरांची भूमिका' स्पष्ट करतांना श्री. सहस्रबुद्धे लिहितात: "लावणी-रचनाकाराचें मूळ पीठ मात्र काही विशिष्ट आध्यात्मिक पातळीचें आहे, असें मानणें भाग पडत आहे. लावणी, पोवाडा यांच्या रचनेविषयी विचार करणारांनी हा दुवा साधला नाही. म्हणून त्यांना शाहिरीचें साकल्याने आकलन झालें नाही आणि त्याचें कारणहि तसेंच सबळ आहे. आध्यात्मिक शाहिरी शाखेची कविता छापून प्रसिद्ध अशी बहुधा झालेली नाही.......त्याचा परिणाम मात्र शाहिरीविषयी गैरसमज नसला तरी अपूर्ण समज पसरण्यांत झाला आहे."

श्री. सहस्रबुद्धे यांनी 'लावणी-रचनाकारांची विशिष्ट आध्यात्मिक पातळी' नाथसंप्रदाय आणि रामानंद संप्रदाय या कांहीशा उन्मुक्त संप्रदायांशीं जोडली आहे आणि शाहिरीचा एक आध्यात्मिक संप्रदाय मानला आहे. शाहिरीला अशी आध्यामिक प्रतिष्ठा दिल्यानुळे श्री. सहस्रबुद्धे यांना शाहिरींतील शृंगाराचें समर्थन भक्तिक्षेत्रांतील रासलीलेच्या समर्थकांच्या पद्धतीने करावें लागलें आहे. किंबहुना श्री. सहस्रबुद्धे यांचा शाहिरीविषयी एक विशेष स्नेहबंध निर्माण झालेला असल्यामुळे शाहिरीच्या मर्यादांचें आणि वैगुण्यांचें भानहि ते ठेवूं शकत नाहीत. नाथ आणि रामानंद यांसारख्या परमार्थ-संप्रदायांशीं शाहिरीचा जो संबंध दिसतो किंवा ज्ञानेश्वर-दासोपंतांच्या कविता-संभारांत शाहिरीसदृश रचनेचीं गमकें आढळतात, याचा अर्थ श्री. सहस्रबुद्धे मानतात तसा शाहिरांच्या आध्यात्मिक संप्रदायाचें अस्तित्व सिद्ध करणारा होत नसून, आध्यात्मिक संप्रदायांनी आणि त्या संप्रदायांतील लोकोद्धारक संतांनी अध्यात्माच्या प्रसारासाठी लौकिक रीतींचा व लौकिक स्तरांतील आविष्कार-पद्धतींचा अवलंब केला, असाच करावयास पाहिजे. शाहिरीच्या प्राचीन अस्तित्वाचा शोध संतवाङ्मयावरून घेतां येईल, हें खरें असलें, तरी त्यामुळे शाहिरीची आणि संतवाङ्मयाची जातकुळी एकच ठरणार नाही. शाहिरी ही शुद्ध लोकरंजक नाट्य व वाङ्मयप्रवाहांतून उत्क्रांत होत आलेली आहे. तिच्यांतील अध्यात्म तिच्या अंतरंग-प्रकृतींतून उद्भवलेलें नसून आध्यात्मिकांनी अध्यात्मप्रसारासाठी शाहिरीला माध्यम बनविल्यामुळे आणि शाहिरीचे उपासक हे आध्यात्मिकांचे पूजक बनल्यामुळे उद्भवलेलें आहे, असें निर्लेप निरीक्षणावरून स्पष्ट होईल.

श्री. सहस्रबुद्धे यांचा दृष्टिकोन असा कांहीसा आग्रही असला, आणि त्यामुळे त्यांचें विवेचन कांहीसें एकदेशीय बनलेलें असलें, तरी लोकस्तरांतील संस्कृति प्रवाहांचा शोध घेण्यासाठी आवश्यक असणारी गंभीर चिकित्सक दृष्टि त्यांचें पुस्तक पुरवूं शकेल, असें प्रांजळपणें कोणीहि कबूल करील.

श्री. वि. कृ. जोशी यांनी लोकनाट्याची परंपरा शोधण्यासाठी काष्ठपांचालिका (कठपुतली), दशावतार, ललित, गोंधळ या लोकरंजक व लोकधर्मी नाट्यपरंपरांचा धांडोळा घेतला आहे आणि या पूर्ववर्ती नाट्यपरंपरांचें ऋण घेऊनच शाहिरीचें लोकनाट्य कसें

स्थिरावलें आणि पेशवाईपासून आजपर्यंत कसकसें उत्क्रान्त होत गेलें, याची विस्तृत चर्चा केली आहे. श्री. जोशी यांचे परिश्रम प्रचंड आहेत, परंतु त्यांच्या परिश्रमांत साक्षेप थिटा पडल्यामुळे त्यांचें संशोधन 'मनसोक्त' आणि मांडणी शिथिल झाली आहे. 'विपुल माहितीचें शिथिल संकलन' असें त्यांच्या ग्रंथाचें स्वरूप बनलें आहे. महाराष्ट्रांतील लोकनाट्यपरंपरा शाहिरींत कशा परिणित झाल्या, हें त्यांचें उद्दिष्ट आहे. परंतु पूर्ववर्ती लोकनाट्यांच्या स्वरूपाचा अनावश्यक तपशील देण्यांतच त्यांनी अनेक पृष्ठें खर्ची टाकलीं आहेत. त्या मानानें त्यांचा शाहिरीशीं अनुबंध जोडण्यावर श्री. जोशी यांनी कमी भर दिला आहे. पूर्ववर्ती लोकनाट्याविषयीची माहिती अन्य संशोधकांच्या ग्रंथांवरूनच बहुशः संकलित केलेली आहे आणि जिथे जिथे प्रस्तुत लेखकाचें स्वतःचें संशोधन आहे, तिथे तिथे केवळ मनसोक्त कल्पनारंजन घडलें आहे. 'खंडोबा'चें मूलरूप स्कंदोबा! स्कंदोबा म्हणजे (स्कंद + बा) स्कंदाचा बाप शिव! खंडोबा हा शिवावतार समजला जातो, त्याचें हें संशोधकीय स्पष्टीकरण! 'गोंधळा'चें मूलरूप गणदल! गणदल (गण + दल) म्हणजे शिवगणांचें दल! गोंधळाचा संबंध शिवाशीं नसून शक्तीशीं (देवीशीं) आहे, ही अडचण दूर करतांना लेखक म्हणतात की, "...... सर्वांनी कुठल्या तरी एकाच दैवताची भक्ति करावयाची तर, ज्या 'शक्ती'विषयी कांही मतभेद नव्हते, ती शक्ति किंवा देवी हीच उपास्यदेवता ठरविण्यांत आली असावी. शिवाय शक्तिपूजक महाराष्ट्राने आपल्या लोकवाङ्मयांत व लोक-गीतांत शक्तिदेवीलाच प्राधान्य द्यावें, हेंहि साहजिकच वाटतें."

गोंधळाची प्राचीनता ठरवितांना गोंधळी लोकांच्या अलंकरणांतील कवडी ही चलनांत अमुक एक काळीं प्रचलित होती, असा पुरावा पुढे केला आहे! कवडीच्या चलनाचा आणि तिच्या गोंधळी वेषांतील समावेशाचा कसा संबंध पोचतो, तें मला तरी समजलें नाही असे विनोदी संशोधनाचे प्रकार श्री. जोशी यांच्या ग्रंथांत जागोजाग आढळतात.

कांही मर्यादा आणि कांही मतभेदाचीं स्थळें असलीं, तरी श्री. सहस्रबुद्धे आणि श्री. जोशी यांचे हे दोन ग्रंथ मराठी लोकधर्माच्या अभ्यासकांनी अवश्य वाचावेत आणि संग्रहीं ठेवावेत, अशी शिफारस करावीशी वाटते.

खंडोबा : या मीं लिहिलेल्या ग्रंथांत देवता वैज्ञानिक संशोधन आहे. माझ्याच ग्रंथाविषयी मी स्वतःच कांही अभिप्राय व्यक्त करणें हें वास्तविक प्रशस्त नाही. परंतु समालोचनाच्या कालकक्षेंत व विषयकक्षेंत त्याचा समावेश होत असल्यामुळे केवळ कर्तव्यबुद्धीने त्याचा अल्पपरिचय घडविणें भाग आहे.

"देवताविज्ञान ही एक इतिहास-शाखा आहे. निदान भारतीय इतिहासाची तर आहेच आहे. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत भारतीय लोकजीवन धर्मप्रधान होतें. लोकांच्या धार्मिक श्रद्धा देवतांच्या रूपाने घनीभूत होत असत. देवतांच्या घडणींत, त्यांच्या उदय–विकासांत आणि ऱ्हासांतहि लोकांच्या वृत्ति-प्रवृत्ति, आशा-आकांक्षा, भाव-भावना, क्रिया–प्रतिक्रिया काम करीत असत. अर्थातच एखाद्या देवतेच्या घडणीचा इतिहास आणि लोकप्रियतेचें रहस्य उकलण्याचा वस्तुनिष्ठ प्रयत्न केला, तर त्या अध्ययनाच्याद्वारां लोकमानसाच्या विविध आंदोलनांचा इतिहास आपल्या हातीं येईल, अशी माझी या विषयाकडे पाहण्याची दृष्टि आहे. हा दृष्टिकोन समोर ठेवून मीं हें खंडोबाविषयक सर्वांगीण अध्ययन वाचकांपुढे ठेवलें आहे." (प्रास्ताविक)

पहिल्या दोन प्रकरणांत मैलार-खंडोबा व माळव्व-म्हाळसा या कानडी देवतांच्या उदय-विकासाचा आणि उन्नयनाचा वेधक इतिहास संशोधनपूर्वक मांडलेला असून, त्यांत रूढ समजुतींहून वेगळीं अशीं अनेक सत्यें उजेडांत आणलीं आहेत. या दोन प्रकरणांच्या वाचनाने देवतांचीं चरित्रें कशीं घडतात, याचा रंजक इतिहास समजून येतो. तिसरें प्रकरण 'खंडोबाची उपासना' असें असून, चौथ्या प्रकरणांत 'खंडोबाच्या लोकप्रियते' चें रहस्य उकलून दाखविलें आहे. या दोन प्रकरणांत खंडोबाच्या उपासना-क्षेत्राचा आणि प्राचीन मराठी वाङ्मयांतील खंडोबाविषयक उल्लेखांचा सूक्ष्म धांडोळा घेतला आहे. उपसंहारांत दक्षिणेंतील विविध भू-भागांचे सांस्कृतिक अनुबंध आणि कांही देवता-वैज्ञानिक तथ्यें यांचा धावता परामर्श घेतला आहे. खंडोबाच्या तीर्थक्षेत्रांची विस्तृत सूचीहि परिशिष्टरूपाने दिलेली आहे.

खंडोबाविषयक पुष्कळ गोष्टी अजून संदिग्ध आणि अनुत्तरित राहिल्या आहेत, याची मला जाणीव आहे. परंतु मीं प्रस्तुत ग्रंथांत आंथरलेली बैठक भावी संशोधकांना विश्रांतपणें काम करण्यास उपयुक्त आहे असें मला नम्रपणें सांगावेंसें वाटतें. या पुस्तकाने मराठींत 'देवता-विज्ञान' ही इतिहास-शाखा वाढीस लागली, तर माझ्या परिश्रमांचें चीज झालें, असें मी समजेन.

मुकुंदराजांची अंबानगरी कोणती ? : हा ग्रंथ मराठवाडयांतील विख्यात संशोधक श्री. वि. अं. कानोले यांनी लिहिलेला आहे. मुकुंदराजांची अंबानगरी (खरें म्हणजे मुकुंदराजांच्या 'विवेकसिंधूत' उल्लेखिलेली हरिनाथांची अंबानगरी) विदर्भांतील अंभोरें कीं, मराठवाड्यांतील आंबेजोगाई—असा या वादांतील सामना आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनी शके १८३५ मध्ये प्रथम अंभोऱ्याला अंबानगरीची प्रतिष्ठा दिली आणि त्यापूर्वी निःशंकपणें परंपरेने आंबेजोगाईचें अंबानगरीशीं मानलें जाणारें ऐकात्म्य हिरावून घेण्यांत आलें. पुढे आंबेजोगाई व अंभोरें या उभय पक्षांतर्फे खंडन-मंडनात्मक चर्चा होत राहिली. सध्या या अंबानगरीविषयक वादांत अंभोरे पक्षाचे अध्वर्यु प्रा. सुरेश डोळके व प्रा. कृ. पां. कुलकर्णी हे असून, आंबेजोगाई पक्षाचे अध्वर्यु श्री. कानोले हे आहेत.

'अंभोर क्षेत्रमहिमा' हें श्री. ढोक यांचें पुस्तक (१९५०) आणि प्रा. डोळके यांचे 'महाराष्ट्रसाहित्य पत्रिके'च्या क्र. १०५, १०६ व १०७ या तीन अंकांतील लेख (१९५४) यांमध्ये अंभोरे पक्षास अनुकूल अशी पुष्कळ चर्चा येऊन गेली आहे. माझें 'श्रीगुरु गोरक्षनाथ : चरित्र व परंपरा' हें पुस्तक १९५९ मध्ये प्रसिद्ध झालें. तें त्या विषयावरील पहिलेंच मराठी पुस्तक असल्यामुळे सर्वच उपांगांविषयी मूलगामी संशोधन करणें मला त्या वेळीं अशक्य होतें. गोरक्षनाथाच्या कार्याचें आणि नाथपंथाच्या उदय-विकासाचें पुष्कळ स्पष्ट चित्र रेखाटतां येईल, असा विश्वास वाटल्यावर मीं नाथसंप्रदायाच्या इतिहासाची मांडणी केली. अर्थातच विषयाचें सामग्र्य वाचकांपुढे ठेवण्यासाठी त्या वेळीं प्रस्तुत विषयाच्या अनेकविध उपांगांवर उपलब्ध असलेली माहिती संकलित करणें हेंहि क्रमप्राप्तच होतें. या दृष्टीने माझ्यापुढे आलेली अंभोरे पक्षाची माहिती प्रमाण मानून मी त्या ग्रंथांत अंभोरे पक्षास मान्यता दिली. अशी मान्यता देतांना "समर्थ-काळापासून मुकुंदराज आणि आंबेजोगाई यांचे दृढ संबंध आढळतात, त्याचें रहस्य अजून उलगडलें नाही" असा आंबेजोगाई पक्षाच्या परंपरासिद्ध प्रतिष्ठेचा उल्लेख करावयासहि मी विसरलों नाही. पुढे १९६० मध्ये श्री. रा. चिं.

बोबडे यांनी संपादिलेल्या 'विवेकसिंधू'च्या प्रस्तावनेंत प्रा. डोळके यांनी अंभोरे पक्षाच्या बाजूने माझी साक्ष काढली आहे, असें त्या प्रस्तावनेच्या 'नवभारत'मधील अवतरणावरून आढळून आलें. मीं कुतूहलाने श्री. बोबडे-संपादित 'विवेकसिंधू'ची आवृत्ति मागवून घेतली आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, त्या आवृत्तींतील संपादकीय निवेदनाने माझा भ्रमनिरास झाला आणि अंभोरे पक्षातर्फे अभ्यासकांपुढे आलेले पुरावे मुद्दाम बनविलेले-बनावट आहेत, याबद्दल त्याच वेळीं माझी खात्री झाली.

श्री. कानोले यांनी अंभोरे पक्षातर्फे पुढे आलेल्या पुराव्यांचें सूक्ष्म विश्लेषण करून, त्यांतील बनावटपणा आणि बुद्धिभेद करण्याची वृत्ति उघडकीस आणली आहे. ध्वनिदृष्ट्या अंबानगरीस अंभोऱ्यापेक्षा आंबे (जोगाई) अधिक जवळचें असून, आंबेजोगाई पूर्वी अंबानगरी या नांवाने ओळखलें जात होतें, याबद्दलचे यादवकालीन कोरीव लेख उपलब्ध आहेत. अंभोरें कधी काळीं अंबानगरी या नांवाने ओळखलें जात असल्याचा पुरावा नाही, ज्या 'कळमेश्वर मठांतील कागदपत्रां'चा पुरावा प्रा. डोळके यांनी पुढे केला होता, त्यांतील हवा श्री. कानोले यांनी सफाईने काढून घेतली आहे. विदर्भात मुकुंदराज-परंपरेंतील मठ असल्याचा दावाहि अंभोरे पक्षातर्फे पुढे केला जातो.' श्री. कानोले यांनी दाखवून दिलें आहे की, हे मठ नांदेडहून विदर्भात गेलेल्या मुकुंद-परंपरेंतील बकाजी रंगनाथाचे आहेत. म्हणजे मुकुंद-परंपरेचा विदर्भांतील प्रसार हा बराच उत्तरकालीन आहे. त्या परंपरांचें विदर्भांतील अस्तित्व अंभोऱ्याला अंबानगरी बनविण्यास उपयोगी पडणार नाही.

श्री. कानोले यांनी केवळ अंभोरे पक्षाचें खंडन करूनच समाधान मानलें नाही तर आंबेजोगाई पक्षाच्या मंडनासाठी त्यांनी शुद्ध संशोधन दृष्टीचा अवलंब करून, भरपूर पुरावे सादर केले आहेत. श्री. कानोले यांचा हा ग्रंथ जिज्ञासूंनी आणि अभ्यासकांनी मुळांतूनच वाचला पाहिजे. या लहानशा समालोचनांत ग्रंथकाराच्या संशोधनक्षमतेचीं वैशिष्ट्यें स्पष्ट करणें अशक्य आहे. अंबानगरी = आंबेजोगाई या सिद्धान्ताच्या दृढीकरणासाठी याहून अधिक निर्णायक पुराव्याची उपलब्धि होणें आवश्यक आहे, अशी अपेक्षा मात्र वाटतच राहते. श्री. कानोले यांच्या विवेचनाने एवढें कार्य मात्र निश्चित केलें आहे कीं, उपलब्ध पुराव्यांच्या परीक्षणांतून अंभोरे पक्षाऐवजी आंबेजोगाई पक्षाचेंच प्राबल्य अधिक राहील. श्री. कानोले यांच्या सूक्ष्मदर्शी संशोधनांतून आणखी नवीं साधनें उपलब्ध होणें शक्य आहे, अशी अपेक्षा करायला हरकत नाही.

## नियतकालिकांतील लेख

(१) 'चोंभा कवीचें उखाहरण' : ज. शा. देशपांडे, (महाराष्ट्रसाहित्य-पत्रिका, जून १९६१; (२) 'कवि अज्ञानसिद्ध' : पंडित आवळीकर (पत्रिकेचा-उपरिनिर्दिष्ट अंक); (३) 'विश्वनाथकृत ब्रह्मांडपुराण' : ज. शा. देशपांडे (पत्रिकेचा उपरिनिर्दिष्ट अंक); (४) 'एक उपेक्षित महाभारतकार-पद्मनाथ ऊर्फ बाळकृष्णनाथ' : व. वि. पारखे (महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, ऑक्टोबर १९६१); (५) 'विष्णुदासनाम्याचें हरिश्चंद्रोपाख्यान' : पंडित आवळीकर ('प्रतिष्ठान', एप्रिल १९६१); (६) 'दासोपंतकृत ललितांचीं पदें' : न. शे. पोहनेरकर ('प्रतिष्ठान', सप्टेंबर व ऑक्टोबर १९६१—केवळ संहिता); (७) 'एक चंद्रहास्याख्यान' : पंडित आवळीकर ('नवभारत', नोव्हेंबर

१९६१ ); (८) भागवताचा एकनाथी दशमस्कंध' : अ. का. प्रियोळकर ('मराठी संशोधन-पत्रिका', जानेवारी १९६१ ); (९) ज्ञानदेवविरचित द्रोणपर्व-संहिता ('मराठी संशोधन-पत्रिका', जानेवारी, एप्रिल व जुलै १९६१ ) एवढें मराठी साहित्य-संशोधनाशीं संबद्ध स्फुट लेखन ( १९६१ मधील) माझ्या पाहण्यांत आलें. सर्वच नियतकालिकें मला पाहावयास मिळालीं नसल्यामुळे प्रस्तुत विषयकक्षेत येणाऱ्या कांही स्फुटांचा निर्देश राहून जाणें शक्य आहे.

श्री. ज. शा. देशपांडे यांनी चोंभाकवीच्या उषाहरणाच्या नवोपलब्ध (!) सहा पृष्ठांची संहिता सादर केली असून, विश्वनाथाच्या ब्रह्मांडपुराणाच्या एका अपूर्ण प्रतीचा परिचय घडविला आहे. श्री. ज. शा. देशपांडे हे 'नवें नवनीत'च्या संपादनामुळे प्रसिद्धि पावले आहेत. त्यामुळे संशोधन-क्षेत्रांत त्यांच्या संबंधी कांही अपेक्षा निर्माण होणें स्वाभाविक होतें. परंतु १९६१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या या दोन्ही स्फुटांत त्यांनी संशोधन-नीतीचा उच्छेद केला आहे !

चोंभाकवीच्या 'उषाहरणा'चीं कांही पृष्ठें श्री. शंकररावजी देवांना दिनकरस्वामी तिसगांवकरांच्या मठांतील गळाठ्यांत आढळलीं. तीं त्यांनी इ. राजवाड्यांच्या स्वाधीन केलीं. इ. राजवाडे यांनी ती भा. इ. सं. मंडळ त्रैमासिकाच्या शके १८३३ च्या इतिवृत्तांत सटिप्पण प्रसिद्ध केलीं. पुढे तोच गळाठा चाळीत असतांना श्री. देवांना आणखी सहा पृष्ठें आढळलीं त्यांनी तीं समर्थ वाग्देवता-मंदिरांत सुरक्षित ठेवलीं आणि 'रामदासी संशोधनां'त (द्वितीय खंड, पृ. १५०, बाडांक ८२३ ) त्यांची विवरणात्मक नोंदहि करून ठेवली. श्री. देशपांडे यांनी प्रसिद्धिलेलीं पृष्ठें हीं समर्थ वाग्देवता-मंदिरांतीलच आहेत, परंतु श्री. देशपांडे मात्र तसा निर्देश न करतां, तीं पृष्ठें आपणांस नव्यानेच उपलब्ध झालीं आहेत, असें भासवितात, याचें आश्चर्य वाटतें. ज्या 'ब्रह्मांडपुराणा'चा श्री. देशपांडे यांनी परिचय दिला आहे, त्याची प्रतहि त्यांनी समर्थ वाग्देवता मंदिरांतच पाहिली आहे, असें मी निश्चयपूर्वक सांगतों. (पाहा : रामदासी संशोधन, द्वितीय खंड, पृ. १६०, बाडांक ८६७ ). श्री. देशपांडे यांनी समर्थ वाग्देवता मंदिरांतील हस्तलिखितांचा निर्देश केला असता, तरी त्यांनी घडविलेल्या परिचयाला आणि संहिता-प्रसिद्धीच्या कार्याला कांहीच बाधा आली नसती; परंतु तरीहि श्री. देशपांडे हे अशा विपरीत नीतीचा अवलंब करतांना पाहिलें की, मला समर्थ वाग्देवता मंदिरांतील हस्तलिखितांच्या सुरक्षिततेबद्दलच दाट शंका वाटूं लागते. तिकडे समर्थ वाग्देवता मंदिरांतील बिचारे व्यवस्थापक मात्र 'रामदास-रामदासी'च्या नव्या वार्षिक प्रकाशनांत हस्तलिखितसंग्रहाचा वापर केल्याबद्दल श्री. देशपांडे यांना धन्यवाद देतात ! ही 'अंदरकी बात' त्यांच्या अजून ध्यानीं आलेली दिसत नाही.

प्रा. पंडित आवळीकर हे अलीकडे मराठी साहित्य-संशोधनाच्या क्षेत्रांत बरेंच काम करूं लागले आहेत. ते नवीं हस्तलिखितें शोधतात, त्यांचा अंतर्बाह्य परिचय घडवितात, परंपरांचे धागे जुळवितात, नवोपलब्ध ग्रंथांच्या कर्त्यांच्या चरित्राची जुळणी करण्यासाठी जरूर ते परिश्रम घेतात. नवोपलब्ध हस्तलिखितांवरील त्यांचे परिचायक लेख हे संशोधकांना नवी सामग्री पुरविणारे ठरतात. प्रा. व. वि. पारखे यांच्या प्रयत्नांची दिशाहि प्रा. आवळीकरां-सारखीच आहे.

श्री. पोहनेरकर यांनी सादर केलेलीं दासोपंतकृत ललिताचीं पदें अभ्यसनीय आहेत. प्रा. प्रियोळकर यांनी कांही काळापूर्वी ज्ञानदेवांच्या शंकास्पद वाङ्मयाची विस्तृत चर्चा करून, अशा शंकास्पद कृतींच्या संहिता प्रकाशित करावयास प्रारंभ केला आहे. त्या उपक्रमाचा भाग म्हणूनच त्यांनी ज्ञानदेवांच्या नांवावर आढळणारें द्रोणपर्व संशोधन-पत्रिकेच्या तीन अंकांत क्रमाने छापून प्रसिद्ध केलें. 'भागवताचा एकनाथी दशम स्कंध' या लेखांत प्रा. प्रियोळकरांनी नाथांच्या नांवावर आढळलेल्या (व्राड-पाटांगण) दशमस्कंधाचें परीक्षण करून, असें मत व्यक्त केलें आहे की, हा ग्रंथ नाथांचा नसून, नाथांच्या नांवावर घुसडलेला आहे. याच ग्रंथाची एक प्रत श्री. चांदोरकर यांना उपलब्ध झाली होती आणि त्यांनी भा. इ. सं. मंडळाच्या इतिवृत्तांत 'एकनाथांच्या नांवाची चोरी' या लेखांत त्याचें समग्र परीक्षण करून असाच निर्णय दिलेला आहे. प्रा. प्रियोळकरांच्या दृष्टींतून हा लेख निसटलेला दिसतो. या निमित्ताने प्रा. प्रियोळकरांनी नाथांच्या शंकास्पद वाङ्मयाचा सामग्र्याने परामर्श घेतल्यास, नाथवाङ्मयाच्या अभ्यासाला तें कार्य उपयुक्त ठरेल.

हें १९६१ मधील संशोधनविषयक लेखनाचें स्थूल समालोचन आहे. हें समालोचन करतांना मला संशोधन-सहकाराची आवश्यकता राहून राहून जाणवूं लागली आहे. संशोधनांत आत्मनिष्ठेऐवजी ज्ञाननिष्ठेचें मूल्य निग्रहाने पाळलें जावयाचें असेल, तर मुक्त सहकार निर्माण झाला पाहिजे. अशा सहकाराने संशोधनांतील अपप्रवृत्ति नष्ट करतां येतील; श्रमांची, वेळेची व द्रव्याची हानि टाळतां येईल आणि प्रत्येक संशोधनविषयाला सामग्र्य प्राप्त होईल.

* * *

## ना. ग. जोशी

# चरित्रें-आत्मचरित्रें-१९६१

गेल्या कांही वर्षांत जीं चरित्रें-आत्मचरित्रें निर्माण झालीं त्यांत विषयव्याप्ति, दृष्टिबिंदु, लेखनशैली यांच्या बाबतींत प्रगति झालेली आढळते. त्यापूर्वी चरित्रनायकाचें खंडन किंवा मंडन करून त्याचें महत्त्व कमी लेखण्याकडे किंवा जास्ती फुगवण्याकडे लेखक सर्व लक्ष पुरवीत. चरित्रविषय व्यक्तीचें सर्वांगीण व्यक्तिरेखन बहुधा केलेलें नसेच. चरित्रांतल्या ढोबळ गोष्टींची यादी करण्याकडे कल विशेष असे. व्यक्तिमत्त्वाच्या सूक्ष्म छटा उलगडून दाखवीत. समोवतालच्या परिस्थितीच्या विशाल पार्श्वभूमिवर तें व्यक्तिचित्र कसें उठून दिसतें तें दाखविणें सोपें नसतें. गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या या तऱ्हेच्या पुस्तकांत केलेले व्यक्तिचित्रणाचे प्रयोग बरेच यशस्वी झालेले आढळतात. म. फुले यांचें व्यक्तित्व व कार्य, लो. टिळकांचें विभूतिमत्त्व, ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, दलितोद्धाराची चळवळ, सत्याग्रहाच्या चळवळी, शिक्षणांतले प्रयोग या सर्वांकडे, पूर्वग्रह टाळून शक्यतों ऐतिहासिक घटनांच्या दृष्टीने पाहण्याची शक्ति अनेक ग्रंथांत प्रकट होते. जातीय दृष्टीपेक्षाहि राष्ट्रीय दृष्टीला अधिक पोषक अशी मनोवृत्ति त्यांत जागोजाग आढळते. जें लिहावयाचें तें प्रांजळ, प्रामाणिकपणाने लिहावयाचें ही दृष्टिहि जास्त आढळते. स्वतःचे दोषहि योग्य संदर्भात नमूद करण्याचा सचेपणा अनेक आत्मचरित्रांत आहे. कांही मोजक्या ग्रंथांत तर भावनेचा ओलावा जाऊं न देतां परिस्थितीचें किंवा व्यक्तित्वाचें विश्लेषण समतोलपणें करून दाखविण्याचें कठीण कार्यहि साधल्याचा दाखला आहे. मात्र अजूनहि मनोगाहनात्मक आत्मविश्लेषणाचें धाडशी पण अगत्याचें काम चरित्रकार किंवा आत्मचरित्रकार फार मोठ्या प्रमाणावर करतांना आढळत नाही. रूढ नीतिकल्पनांच्या व व्यावहारिक औचित्याच्या कोंडींतून व्यक्तिचित्रण अजून बाहेर पडलेलें नाही. तो निधडेपणा, ती बेटरकारवृत्ति अजून आढळत नाही. मात्र एकंदरीने साचेबंद चरित्र-आत्मचरित्रांची प्रथा जी गेल्या कांही वर्षांत मागे पडूं लागली, ती आता फारच जुनवाणी वाटूं लागण्याइतकें वेगळें शैलीदार व्यक्तिरेखनात्मक साहित्य गतवर्षी निर्माण झालें. कांही मोजक्या ग्रंथांचें समालोचन यापुढे केलेलें आहे तें या दृष्टीनेच होय.

× × ×

श्री हिं श्री. पाटील यांनी "महाराष्ट्राचे कर्मवीर" मध्ये विठ्ठल रामजी शिंदे, भाऊराव पाटील, ज्योतिबा फुले, गाडगे महाराज, बाबासाहेब आंबेडकर, अण्णासाहेब कर्वे या कर्मवीरांच्या कार्यांचा थोडक्यांत परिचय दिला आहे. तरुण पिढीने वाचण्यासारखा हा सुबोध परिचय आहे. कार्यक्षेत्राची व्याप्तिहि दर्शविलेली आहे. पण पा. ८ वर कर्मवीर शिंदे यांचा परिचय देतांना पुढे परिचय करून दिलेल्या कर्मवीर कर्वे यांच्याविषयी, शाळकरी म्हणीच्या साहाय्याने, जे उद्‌गार आले आहेत ते टाळणें बरें झालें असतें. "विदर्भाचे मानकरी" हा परिचयात्मक लेखांचा संग्रह प्रा. अ. ना. देशपांडे यांनी संपादित केला असून त्यांत आठ विदर्भी महापुरुषांना मानाचा मुजरा केलेला आहे. लक्षांत राहण्यासारखें शब्दचित्र प्रा. सुरेश डोळके यांनीं लिहिलेलें कै. डॉ. भाऊजी दप्तरी यांचें, प्रा. चोरघडे यांनी

रेखाटलेलें नरकेसरी अभ्यंकर यांचें, प्रा. मधुकर केचे यांच्या लेखणींतून उतरलेलें वीर वामनराव जोशी यांचें व विशेषतः ना. रा. शेंडे यांनी लिहिलेलें, कै. किसन फागुजी बनसोडे या दलितोद्धारक कर्मवीरांचें हीं होत. विदर्भाच्या या मानकऱ्यांना समग्र महाराष्ट्राने लवून मुजरा करण्याच्या योग्यतेचे ते कसे आहेत तें भावमंथर शैलींत वर्णन केलें आहे.

म. म. दत्तो वामन पोतदार यांनी "ओळख" करून दिलेल्या व्यक्ति बहुतेक महनीय महाराष्ट्रीय आहेत. सर जदुनाथ सरकार यांचा संबंध महाराष्ट्राशीं व मराठी इतिहासाशीं फार गाढ आल्यामुळे तेहि यांतच आले. (स्वतः महामहोपाध्याय पोतदारांची ओळख श्री. अ. इ. लिमये, प्रकाशक, यांनी 'महाराष्ट्राचे पुण्य पुरुष' या शीर्षकाच्या मार्मिक शब्दचित्राने करून दिलेली आहे.) म. म. पोतदार यांनी प्रसंगपरत्वें कै. तात्यासाहेब केळकर, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, नाट्यछटाकार दिवाकर, आचार्य अत्रे, गोपाळराव देशपांडे, स्वतःचे वडील कै. वा. मो. पोतदार, श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, पितापुत्र चिपळोणकर, डॉ. भांडारकर, कोशकार कर्वे, इतिहासाचार्य राजवाडे व सर जदुनाथ सरकार यांचीं मार्मिक शब्दचित्रें रेखाटलीं आहेत. त्यांत वेचक व उचित शब्दांत प्रत्येकाच्या कार्याचीं व स्वभावाचीं वैशिष्ट्यें नमूद केलेलीं आहेत. सर्वत्र पातळी सारखीच नाही. कै. केळकर, बाबासाहेब घोरपडे, दिवाकर वगैरेंच्या 'ओळख' रीतींत तटस्थपणा आहे, तर अत्रे, चिपळोणकर पितापुत्र, भांडारकर व विशेषतः राजवाडे यांचीं स्वभावदर्शनें रंगून रेखाटलेलीं आहेत. सर जदुनाथ सरकार यांचें शब्दचित्र विशेष महत्त्वाचें आहे. विरोधी मताच्या श्रेष्ठ पुरुषाचें योग्य महत्त्व इतक्या चांगल्या समतोल पद्धतीने विशद केलेलें क्वचितच वाचावयास मिळतें. सर्वोत्तम शब्दचित्र अर्थातच राजवाडे यांचें. यांत निष्ठावान 'राजवाडेभक्ता'ने अत्यंत संयत भावनेने पण पूर्ण श्रद्धेने इतिहासाचार्य राजवाडे यांचें महनीयत्व प्रकट केलें आहे. ही "ओळख" पाहून सर्वच मराठी वाचक पुढील "स्नेहाचे पाझर" केव्हा एकत्र प्रकाशित होतात याची उत्सुकतेने वाट पाहत राहतील.

श्री. श्री. रा. टिकेकर यांचें "जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई" हें तुलनात्मक व्यक्तिदर्शन म्हणजे गेल्या वर्षीच्या या तऱ्हेच्या पुस्तकांतील फार मोठ्या योग्यतेचें पुस्तक आहे. त्रिखंडकीर्तीचे भारतीय इतिहासकार स्व. सर जदुनाथ सरकार व त्यांचे परमस्नेही सुप्रसिद्ध मराठी इतिहासकार सरदेसाई यांची दीर्घकालीन मैत्री म्हणजे बंगाल–महाराष्ट्राच्या इतिहासक्षेत्रांतील कर्तबगारीची शुभ युति होती. या दोघांचें इतकें आधिकृत, मार्मिक आणि समतोल स्वभावदर्शन मराठींत प्रथमच उपलब्ध होत आहे. सरकारांचा सरदेसायांविषयीचा अकृत्रिम स्नेह केवळ अपूर्व होता. त्यामानाने स्नेहदिग्दर्शनाच्या बाबतींत सरदेसायांची बाजू जरा लंगडीच पडायची, पण हा उभयतांच्या स्वभावधर्मांतील फरक होता म्हणून त्याचें समर्थन करतां येईल. सर जदुनाथांना महाराष्ट्र व शिवाजीमहाराज यांच्याबद्दल अतिशय गाढ आदर होता. त्यांना मराठी वाचतां व लिहितां येत होतें. पेशवे दप्तरांतील असंख्य कागदपत्रें सरदेसायांनी संपादित करून मराठी इतिहासाला महत्त्वाची साधनसामग्री मिळवून दिली, पण त्यामागील सूत्रें सर जदुनाथ यांनी हलविलीं व मगच तें कार्य शक्य झालें. आपापल्या गुणक्षेत्रांसह ही मित्रांची जोडी आपल्या पुढे या तुलनेच्या निमित्ताने प्रत्यक्ष वावरतेंच आहे असें वाटण्याइतक्या कल्पनाबळाने श्री. टिकेकर यांनी आपलें वैशिष्ट्यपूर्ण तौलनिक स्वभावरेखाटनाचें तंत्र हाताळलें आहे.

एकेकटीं स्वभावचित्रें-चरित्रें अनेक प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत श्री. चंद्रा किर्लोस्कर यांचें " नव क्रांतीचे अग्रदूत जयप्रकाश नारायण " हें चांगलें आहे. चरित्रविषयाचें दैवीकरण जरी यांत नसलें तरी भावाकुल संदर्शन नक्कीच आहे. जयप्रकाशांचें जाहीर चरित्र यांत आलेलें आहे. श्री. मा. ज. कानेटकर यांचें " यशवंतराव चव्हाण—एक दर्शन " याच प्रकारचें आहे. महाराष्ट्राच्या मनांत श्री. यशवंतरावांनी एक खोल ठसा उमटविलेला आहे. काँग्रेस पक्षातर्फे प्रकट झालेल्या या पुस्तिकेंत त्यांच्या समर्थ व्यक्तित्वाचें पुसट दिग्दर्शन मात्र आहे; सर्व पैलूंचें सुबद्ध दर्शन घडविणारा यशवंत-चरित-ग्रंथ अजून लिहिला जावयाचा आहे. आमचे शिक्षणमंत्री " बाळासाहेब देसाई " हें श्री. एम्. एम्. चौगुले यांचें पुस्तक याहून अधिक महत्त्वाकांक्षी आहे. नामदार बाळासाहेबांच्या आयुष्याचा वास्तव चित्रपट यांत दिलेला आहे. लेखकाच्या कल्पनेइतका " कलापूर्ण आणि सुंदर " झालेला नसला तरी त्यांत आदर आपुलकी आहे, भावुकताहि आहे. श्री. सुमन्त दयानंद करंदीकर यांनी "श्री. देवदत्त नारायण टिळक" ही अभिनंदनपर व्यक्तिदर्शनपर पुस्तिका श्री. टिळकांच्या सत्तराव्या वाढदिवसानिमित्त लिहिली आहे. श्री. देवदत्तराव टिळक यांनी तेजस्विनी पंडिता रमाबाईंचें चरित्र लिहून आपलें स्थान मराठी भाषेंत निश्चितपणें नुकतेंच प्रस्थापित केलें आहे. अशा समर्थ मराठी लेखकाचें व्यक्तित्व फार संयत व मार्मिक रीतीनें या पुस्तिकेंत व्यक्त झालें आहे. शेवटीं जोडलेल्या इतरांच्या आठवणीहि श्री. टिळकांचा मार्मिक प्रेमळ गमत्या स्वभाव दर्शवितात. याच प्रकारच्या एकेकट्या व्यक्तीच्या जीवनांतील आठवणींचा मार्मिक संग्रह ज्या आणखी दोन पुस्तकांत आला आहे, त्यांचा विचार कांहीसा विस्तारानेच करावयास पाहिजे.

श्री. शंकरराव खरात यांनी " बाबासाहेब आंबेडकरांच्या सहवासांत " हा आपल्या आठवणींचा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे. या आठवणींच्या प्रकाशांत, डॉ. बाबासाहेबांच्या जाहीर जीवनाप्रमाणेच त्यांच्या खासगी जीवनाचा अर्थ लावण्याचा प्रयत्नहि यांत आहे. एखाद्या महान् कर्तृत्वशाली पुरुषाच्या चरित्राविषयी त्याच्या निष्ठावंत अनुयायांत जो उत्साह दिसूं लागतो, तो या पुस्तकांतहि आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दलितवर्गांत जी प्रचंड जागृति केली ती त्यांच्या क्रांतिकारक कार्यशक्तीमुळे खरीच, पण त्यांनी घटनानिर्मिति व हिंदु कोड बिल वगैरे बाबतींत जी अविस्मरणीय, महनीय कामगिरी केली ती आपल्या बुद्धिबलानें. प्रस्तुत आठवणींत त्यांच्या या कार्यशक्तीचा ठसा त्यांच्या अनुयायांवर किती खोलवर उमटला गेला आहे तें दिसून येतें. गरीब अस्पृश्य बंडखोर बौद्ध कसे बनले याचें रोमांचकारी चित्र यांत आहे. लेखकाच्या मनांत श्रद्धा आहे, बंडखोरीचा आवेश रोमरोमांत आहे, पण त्यामुळेच तो एकपक्षीय ठरण्याइतका अतिरिक्त व एकांगी झाला आहे. शैलींत भक्तिभावाचें दिग्दर्शन आहे. 'अस्पृश्यतेचें दर्शन' व समाधीवरील अश्रु' हे पहिले दोन परिच्छेद या दृष्टीनें लक्षांत राहण्यासारखे आहेत. या तऱ्हेच्या रम्याद्भुत, कल्पनातरंगी लेखनशैलीचा दोषहि पुढच्या 'महाडचा सत्याग्रह' या परिच्छेदांत प्रत्ययाला येतो.

" उमटलेलीं पावलें " म्हणजे कै. आपटे गुरुजींच्या जीवनाचा, त्यांच्या पत्नी श्रीमती राधाबाई आपटे यांनी काढलेला आलेख. आपटे गुरुजी एक थोर व संपन्न व्यक्तित्व असलेले शिक्षणप्रेमी, निष्ठावंत समाजसेवक होते. श्री. विठ्ठलराव घाटे यांच्या " हिरवीं मनें...... " मधील आबा गुरुजी ते हेच. अखेरपर्यंत तें मन हिरवें राहिलें! श्री. राधाबाई त्यांच्याच कार्यक्षम जोडीदार—संसारांत साथीदार, समाजकार्यांत सांगाती. फारच हळव्या व नाजूक हातांनी श्री. राधाबाईनी आपल्या जीवनांत उमटलेल्या या पवित्र पावलांची रेखाटणी

केली आहे. येथे एक मन मोकळें, अनलंकृत, साधें सरळ व्यक्तित्व, दुसऱ्या तेवढ्याच साध्या-सुध्या, धीरगंभीर, समतोल व्यक्तित्वाचा आविष्कार, घरगुती पण नीटनेटक्या शैलींत घडवीत आहे. श्री. रमाबाई रानड्यांच्या आठवणी किंवा श्री. लक्ष्मीबाई टिळक यांचीं 'स्मृतिचित्रें' यांच्याशीं या पुस्तकाची तुलना करण्याचा मोह साहजिक होतो, पण तसें करणें अन्यायाचें होईल. एवढें मात्र नक्की की, या पुस्तकांतील सुरुवातीचीं प्रकरणें व शेवटचीं प्रकरणें अतिशय चांगलीं वठलीं आहेत.

'श्री शारदामाता" हें श्री. रा. चिं. ढेरे यांनी लिहिलेलें चरित्र भावपूर्ण व रसाळ आहे, आध्यात्मिक मार्गीयांना मनःशांति देणारें आहे. श्री. रामकृष्ण परमहंसांच्या पत्नीचें चरित्र अशा थाटांत लिहिलें जावें हें आपण स्वाभाविकच मानूं. पण डॉ. वि. रा. भूसरथ यांनी "श्री. भवानीभक्त युगकर्ता शिवाजी" हें चरित्रहि तशाच भक्तिविवश मनाने लिहावें हें नवलाचें वाटतें. शिवाजीच्या आयुष्यांतील ठळक प्रसंग यांत आलेले आहेत. पण त्यांत मुख्य सूत्र परमेश्वरी-प्रसादाचें आहे. आपला समाज अगोदरच भोळाभाबडा आहे. त्यांत शिवाजी-सारख्या राष्ट्रपुरुषांचीं चरित्रेंहि अशीं लिहिलीं जाऊं लागलीं म्हणजे इतिहासाभ्यासकांनी चूपच बसावयास हवें. श्री. बाळशास्त्री हरदास यांनी प्रचंड मेहनत घेऊन शिवाजीचें विशिष्ट हिंदुत्वनिष्ठ दृष्टीने लिहिलेलें चरित्र उपलब्ध करून दिलें आहे. "पुण्यश्लोक छत्रपति शिवाजी" या चरित्रात्मक महाग्रंथाचा तिसरा भाग गत वर्षी प्रकट झाला. प्रकांड विद्वत्ता, प्रभावी वक्तृत्वपूर्ण शैली, दृष्टीपुढे ठेवलेला निश्चित लेखनहेतु यामुळे हा चरित्रग्रंथ प्रक्षोभक पण वाचनीय झाला आहे. परंतु लेखकाच्या संस्कृतनिष्ठ अवघड भाषेमुळे, मर्यादातीत आवेशामुळे आणि अवतरणांच्या रांगांमुळे ही वाचनीयताहि अवघडली आहे. श्री. सय्यद अमीन यांनी "सम्राट् अकबर" हें विस्तृत चरित्रात्मक पुस्तक लिहिलें आहे. सम्राट् अकबर हा केवळ मुस्लीम लढवैय्या नव्हता, भारताचा एक महान् शिल्पकार होता. त्यानें ज्या गोष्टी त्या वेळीं अंमलांत आणण्याचा प्रयत्न केला त्या अलीकडच्या काळांत कुठे कायद्याने प्रस्थापित केल्या जात आहेत. सतीची चाल बंद करणें, विवाहाचें वय बारा वर्षांचें ठरविणें, द्विभार्याप्रतिबंध, हिंदु–मुस्लीमांच्या एकच शाळा स्थापणें, जिझिया कर व यात्रेकरूंवरील कर ठरविणें, वेश्याव्यवसायावर बंदी घालणें वगैरे गोष्टी अकबराच्या महत्तेला और तजेला आणतात. या पुस्तकांत पराक्रमी हिंदु विरोधकांचें वर्णनहि यथायोग्य केलेलें आहे. पुस्तक वाचनीय झालें असून अकबरहि इतर (हिंदु) सम्राटांप्रमाणेच भारताचा एक राष्ट्रपिता होता हें ऐतिहासिक सत्य पुराव्यानिशीं शाबित झालें आहे.

गेल्या वर्षी रवीन्द्रनाथ ठाकुरांच्या जन्मशताब्दीचा समारंभ सबंध देशांतच साजरा होत होता. त्यानिमित्ताने रवीन्द्रविषयक कांही ग्रंथ प्रसिद्ध झाले, त्यांतील तीन ग्रंथ चरित्रा-त्मक आहेत. श्री. वि. स. सुखटणकर यांचें छोटें "रवीन्द्रदर्शन" हें पुस्तक सुबोध व सरळ वर्णनपर आहे. श्री. गोपीनाथ तळवलकर यांचें "शान्तिनिकेतन" अधिक भावपूर्ण व काव्यात्म आहे. रवींद्रनाथांच्या व्यक्तित्वावर व साहित्यावर त्यांची निष्ठा आहे. चालू काळांतील अभद्र साहित्यप्रवाहांना आळा घालण्यासाटी हें 'भद्र' साहित्यच उपयोगी पडेल असा त्यांचा दृढ विश्वास आहे. 'शांतीचें निकेतन' जे रवीन्द्रनाथ त्यांच्या जीवितकार्याचा हा परिचय त्यांनी या हेतूनेच फार जिव्हाळ्याने करून दिला आहे. तिसरा ग्रंथ म्हणजे श्री. गं. दे. खानोलकर यांनी लिहिलेलें रवीन्द्रनाथांचें बृहत् चरित्र. 'रवींद्रजीवन ही एक रम्य, रंगदार, प्रतिभेच्या

दिव्य प्रभेनें झळाळणारी अश्रुतपूर्व अशी सुंदर अन् प्रदीर्घ स्वरलहरी आहे.' या स्वरलहरीचें लयस्वरूप उकलून दाखविण्यासाठी या चरित्र-ग्रंथाची निर्मिति झाली. रवीन्द्रांना जवळून न्याहाळण्याचा अपूर्व योग लेखकाला, विश्वभारतीचा विद्यार्थी म्हणून आला. त्यांच्याच स्फूर्तीमुळे लेखकाने साहित्याला सर्वस्वी वाहून घेण्याचें ठरविलें. गुरुदेव व शांतिनिकेतन ह्यांच्याशीं असा जिव्हाळ्याचा संबंध आल्यामुळे लेखकाची मनोभूमिका ग्रंथरचनेला अनुरूप होतीच. रवीन्द्रनाथांच्या विषयींचें जवळ-जवळ सर्व लिखाण लेखकाने अभ्यासिलेलें आहे. रवीन्द्रांचें बहिर्जीवन आणि भावजीवन त्यांच्या काव्यादिकांच्या साह्याने रेखाटण्याचें अवघड कार्य लेखक खूपच यशस्वीपणें पार पाडूं शकला याचें कारण हेंच आहे. रवीन्द्रांचें व्यक्तित्व महत् आहे, बृहत् आहे, भास्वत् आहे. त्यांतील जवळ जवळ सर्व दालनें या ग्रंथांत खुलीं झालेलीं आहेत. स्वरलहरींतील अंतर्गत-बहिर्गत लय पकडायला जातां-जातां त्या लहरीवरच लेखकाचें मन वाहून गेल्यागत मात्र झालें आहे. बंगाली शैलीचा पगडाहि लेखकाच्या मनावर प्रमाणाधिक बसलेला आहे. बंगाली अवतरणांचें मराठीकरण मोठ्या प्रमाणांत असल्यामुळे अनुवादांतला अनिवार्य बोजडपणा ग्रंथाच्या मुख्य रहस्योद्घाटनाच्या आड येतो. स्वतंत्र भागांतहि शैली भारावलेली आहे. माधव जूलियनांचें चरित्र लिहितांना ज्या एका विशिष्ट कथनपद्धतीचा उपयोग या लेखकाने करून पाहिला ती लेखनरीति यांत वापरली असली, तरी त्यांत लेखकाला वरील सर्व कारणांमुळे संपूर्ण यश आलेलें नाही. पण म्हणून कांही ग्रंथांचें आहे तें यश कमी होत नाही. (लेखकाने अन्ना तर्खड व रविबाबू यांच्या भेटीचा तपशील बंगाली साधनांवरूनच घेतला असल्यामुळे त्यांतील कांही विवाद्य भाग यांत नमूद झालेला नाही. अन्नाचें लग्न एका स्कॉट माणसाशीं झालें होतें, तिने घटस्फोट घेतला होता, तिची समाधि मुंबईत आहे वगैरे तपशील आता विवाद्य ठरला आहे. ती जवळ-जवळ सहा वर्षांनी—दोन नव्हे—मोठी होती, हिंदुस्तानांतच एका मिशनरी गृहस्थाशीं तिचा विवाह झाला होता, तिचा पतीबरोबरचा फोटो उपलब्ध झालेला आहे व तिची समाधि परदेशांत आहे अशी माहिती नव्यानेच उजेडांत आली आहे.)

आत्मचरित्रपर ग्रंथांत बहुतेक सर्व विसाव्या शतकांतील व्यक्तींचीं -आत्मचरित्रें आहेत. एकच आत्मचरित्र गेल्या शतकांतील कर्तबगार व्यक्तीचें आहे. कै. रावसाहेब केशवराव भवाळकर यांचें हें "आत्मवृत्त" अनेक दृष्टींनी महत्त्वाचें आहे. तें प्रसिद्ध करून त्यांचे पणतू श्री. ग. नी. भवाळकर, संपादक श्री. भ. श्री. पंडित व प्रकाशक विदर्भ-संशोधन मंडळ, नागपूर, यांनी फार मोठें कार्य केलें आहे. गेल्या शतकांतली मराठींत लिहिलेलीं दोन-तीन आत्मवृत्तेंच प्रसिद्ध झालीं आहेत.—एक दादोबा पांडुरंगांचें, दुसरें बाबा पद्मनजींचें व तिसरें विष्णुदास भाव्यांचें. त्यांत आता ह्या चौथ्या आत्मवृत्ताची भर पडली आहे. कै. भवाळकर एक नाणावलेले शिक्षक व सरकारी अधिकारी होऊन गेले. कै. बाळशास्त्री जांभेकर व कै. दादोबा पांडुरंग त्यांचे गुरु होते, महात्मा फुले यांची त्यांना ग्रामण्य प्रकरणांत मदत झाली होती व दादाभाई नवरोजींकडून शिक्षणाचीं साधनें त्यांना मिळत गेलीं वगैरे गोष्टींमुळे या आत्मवृत्ताला फार महत्त्व आलें आहे. यांतील आत्मकथन प्रांजळ, सरळ, अनलंकृत पद्धतीनें लिहिलेलें आहे हें याचें खरें वैशिष्ट्य. त्या काळीं शिक्षण घेणें किती कठीण होतें, आणि पुढे पंतोजी होणें किती कष्टाचें होतें हें यांतील इतिवृत्तावरून चांगलें कळतें. "आत्मवृत्ता"चा शेवट-शेवटचा भाग बराच प्रवाही होत होता, पण तेवढ्यांत लेखन थांबलें व हें आत्मवृत्त अपुरेंच राहिलें. या "आत्मवृत्ता"चे लेखक दादोबांचे विद्यार्थी

असूनहि त्यांचें लेखन व्याकरणहीन, त्रुटित स्वरूपाचें झालें आहे. संपादकांनी जागोजाग आवश्यक शब्द कंसांत वाढवून अर्थ जुळवला आहे. पण अनेक ठिकाणीं असे शब्द वाढवले नसते व अध्याहृत ठेवले असते तर मूळ शैलीचें वैशिष्टय चटकन् ध्यानीं आलें असतें. एके ठिकाणीं 'नावरस' हा शब्द बदलून 'नावराशि' असें संपादकांनीं केलें आहे. पण 'नावरस' असें रूप मावळांत-कोंकणांत रूढ आहे.

"उलटलेलीं पानें" हें कै. माधव दामोदर अळतेकर यांचें, त्यांचे चिरंजीव डॉ. मनोहर मा. अळतेकर यांनी संपादिलेलें आत्मचरित्र कै. मा. दा. अळतेकर एके काळचे धुरंधर वाक्पटु, सुधारक आणि मराठीचे प्राध्यापक जहाल-मवाळ राजकारणांत हिरीरीने भाग घेतलेले. त्यामुळे त्या काळची पार्श्वभूमि या आत्मचरित्रांत सांपडते. पण त्यांच्या लेखणीचा मातबर दरारा जसा या ग्रंथांत गवसत नाही, तसा खोचक उपहासहि नाही. शरीराच्या व मनाच्या विकल अवस्थेंत हें आत्मवृत्त लिहिलें गेलें आहे.

डॉ. मनोहर मा. अळतेकर यांनी ग्रंथाला अनेक पानी 'शेवटचें पान' जोडलें आहे. त्यांत वडिलांच्या व्यक्तित्वाचें श्रेष्ठत्व आत्मीयतेने दर्शविलेलें आहे. परंतु या लेखाच्या शेवटीं आत्मीयता औचित्याची 'लक्ष्मणरेषा' कांही वेळां ओलांडून गेल्यासारखी दिसते.

"जीवनस्मरणी" या नांवाने "रक्षाबंधन" कर्ते प्रा. वि. गो. शेट्ये यांनी आपल्या जीवनांतल्या अविस्मरणीय घटनांची-स्मृतीची माळ' गुंफिली आहे. श्री. शेट्ये यांनी आपल्या सत्तर वर्षांच्या जीवनांत, रत्नागिरी व मुंबई येथे वैश्य-समाजाची सेवा, राष्ट्रीय शिक्षण, सार्वजनिक कार्ये व साहित्यनिर्मिति केली. त्यांतील कांही प्रसंग लक्षांत राहण्या-सारखे आहेत. कोंकणस्थ वैश्यपरिषदेचें पहिलें अधिवेशन, रत्नागिरीचें साहित्यसंमेलन आणि नाटक-कंपन्यांच्या मालकांच्या नाटककारांना नागविण्याच्या तऱ्हा यांवर चांगला प्रकाश या आत्मचरित्रामुळे पडतो. ज्ञातिसेवक बनूनहि ज्ञातिनिष्ठ न होण्याची कठीण गोष्ट त्यांनी साधली. ह्या सर्व गोष्टी त्यांनी टाचणवजा, सरळ-धोपटमार्गी पद्धतीने सांगितल्या आहेत. त्यांतील व्यावहारिक सावधानता व स्पष्टपणा जाणवणारा आहे. पण रचनेपासून मुद्रणा-पर्यंत कुठेच सुबकपणा आढळत नाही. तत्कालीन सामाजिक-राष्ट्रीय घडामोडींची यांत कांही चांगली माहिती मिळते व एक मध्यमवर्गातील सद्वृत्त समाजहितदक्ष व्यक्तीचा परिचय स्थूलपणें होतो एवढें याचें श्रेय.

"कृष्णाकांठची माती" हें प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांचें आत्मचरित्र. त्यांत त्यांनी स्वतःच्या चरित्राबरोबरच संबद्ध अशा व्यक्तींचीं शब्दचित्रेंहि दिलेलीं आहेत. ते मराठीचे प्राध्यापक झाले, संशोधन मंडळाचे संचालक झाले, साहित्यसंमेलनाचे अध्यक्षहि झाले. त्यांच्या जीवनप्रवाहांत त्यांची ज्या ज्या व्यक्तींशीं विशेष घसट झाली त्यांचीं शब्दचित्रें या आत्म-चरित्रांत आहेतच, परंतु ज्यांचा केवळ प्रासंगिक संबंध आला त्यांचींहि शब्दचित्रें यांत आहेत! पण हीं शब्दचित्रें स्थूल व वर्णनपर झालेलीं आहेत. त्यांच्या जीवनांतील सुखदुःखाचे प्रसंग त्यांनी तन्मयतेने वर्णिले असले तरी परिणामकारकतेपेक्षा माहितीपूर्णतेकडेच कल झुकलेला आहे. त्यामुळे आटोपशीरपणा न येतां अखेरी-अखेरीस तर संयतपणाहि गेल्यामुळे स्वतःच्या लेखनांतले दोष दाखविणाऱ्यांबद्दल अनुदार उद्गारहि दुर्दैवानें लेखनांत आले आहेत. व्यक्तित्वा-आड दडून बसलेले अप्रयोजक पूर्वग्रह घेळीं प्रसंगीं असें डोकें वर करतात व त्यामुळे त्या व्यक्तित्वाबद्दल निर्माण होणारी सौम्य "कृष्णाकांठची माती" अशी थोडीशी लांछित व्हावी याचें वाईट वाटतें.

" जाग्रतिकार पाळेकर " हें बडोद्याच्या ' जागृति 'कार भ. व. पाळेकरांचें आत्मचरित्र आपणांला वेगळयाच वातावरणांत नेतें. मध्यमवर्गाच्या सुसंस्कृत पोशाखीपणांतून दणकट मराठमोळया वातावरणांत आपण जातों. श्री. पाळेकर हे खानदेश बाजूला शेतकरी कुटुंबांत जन्मले. बडोद्यास गरिबींत दिवस काढीत जेमतेम सहा इयत्तांपर्यंत शिक्षण त्यांनी मिळविलें. पण पुस्तकी संस्कार कमी झाले तरी त्यांच्या मनावर बडोद्याच्या प्रगतिपर वातावरणाचा खोल परिणाम घडला. वाचनाच्या द्वारें ज्ञान मिळवतां मिळवतां ज्योतिबा फुले यांच्या कार्याची मोहिनी पडली. रानडे-गोखले-आगरकर यांच्या विचारांनी मनःकोष समृद्ध होत चालला. समाजांत जागृति निर्माण करण्यासाठी एक वृत्तपत्र चालविण्याचा खटाटोप त्यांच्याकडून त्यामुळेच होऊं शकला. तेंच " जागृति " साप्ताहिक होय. मनांतल्या निष्ठेला जागून, पण व्यवहारांत जरूर तेव्हा चातुर्याने वागून त्यांनी रोखठोक बोल सर्व समाजाला ऐकविले. मराठा समाजाच्या थराथरांतील विषमताहि त्यांनी उघड केली. त्यांनी स्वतःला समाजोद्धाराच्या चळवळीला वाहून घेतलें होतें. ज्योतिबांच्याकडून घेतलेल्या स्फूर्तीनें त्यांना ऐकांतिक जातिनिष्ठ होऊं दिलें नाहीच, पण ते ऐकांतिक पक्षनिष्ठहि राहिले असें नाही. श्री. पाळेकरांनी बऱ्याच गोष्टी आत्मवृत्तांत अध्याहृत ठेविल्या आहेत. सगळीं गुपितें उघडीं केलीं नाहीत. तरी सरळ मनाला भिडणारें प्रांजळपण त्यांत आहे. शेवटीं " जागृतीं "तील निवडक लेख दिले आहेत, ते व्यक्तित्वावर झगझगीत प्रकाश टाकतात.

राहतां राहिलीं दोन आत्मचरित्रें—मनाला रिझवणारीं व डोलवणारीं. एकांत कलात्मक सामर्थ्याला व्यावहारिक शहाणपणाची जोड मिळाल्यामुळे यशस्वी झालेलें एका कलावंताचें व्यक्तित्व बहरलेलें दिसतें; दुसऱ्यांत एका लोभनीय अस्मितेच्या संदर्भात चित्रविचित्र प्रसंगांचा नि व्यक्तिदर्शनांचा सुंदर गोफ विणला जातांना दिसतो. पहिलें आहे श्री. बाबूराव पेंढारकरांचें " चित्र आणि चरित्र ". हें आत्मवृत्त आणि दुसरें आहे श्री. विठ्ठलराव घाट्यांचे " दिवस असे होते...... " हें आत्मचरित्र.

नाटकांत व चित्रपटांत काम करणाऱ्या नटांच्या आयुष्यक्रमाबद्दल लोकांना स्वाभाविकपणेंच कुतूहल असतें. श्री. बाबुराव पेंढारकर तर अभिमानाच्या क्षेत्रांतील महर्षि आहेत. त्यांच्या आयुष्यांत नटाच्या आयुष्यांत येणारे सर्व भलेबुरे प्रसंग आले आहेत. पतनाचे मोहाचे प्रसंगहि तसेच आले आहेत, त्यांनी केवळ एकदा—दोनदा सूचक शब्दांनी ते दर्शविले आहेत. श्री. बाबुराव पेंटर, मास्टर विनायक यांसारख्या अव्वल दर्जाच्या कलावंताच्या स्वभावाच्या कांही छटा त्यांनी सरळपणें स्पष्ट केल्या आहेत. लोकमान्यांचा आशीर्वाद, महात्मा फुले वगैरे प्रकरणें छान आहेत. त्यांतून निर्माण झालेला या चित्र—चरित्राचा ओघ बिंदूबिंदूतून एका केंद्राकडे हळूहळू सरकत आहे. ' सैरंध्री ', ' अयोध्येचा राजा ' वगैरे घटनाहि असेच अर्थपूर्ण क्षणबिंदु आहेत. पुढे ' शिवसंभव ', आणि शेवटीं महाराष्ट्र राज्यस्थापनेच्या शुभमुहूर्ती ' शिवनेरीवर ', ' शिवसंभव ' ! नुसती कल्पना केली तरी रोमांच उभे करणारा अपूर्व योगायोग ! जीवनांतील धन्यतेचा अमर क्षण. " कलावंत लौकिक मिळवितो......पैसा मिळवितो. पैसा गमावतो......लौकिक गमावतो......पण पन्हाळगडापासून शिवनेरीपर्यंतच्या माझ्या आयुष्याचें सिंहावलोकन केलें म्हणजे मात्र मला वाटतें की, कलावंताने जगावें तर अशाच एका अमर क्षणासाठी. बाबुरावांना तो क्षण लाभला, व तो कसा लाभला याचें सहजसुंदर दर्शन येथे घडल्याने चोखंदळ पण संवेदनशील वाचकालाहि असाच एक आनंदाचा क्षण लाभतो ! या आत्मचरित्राचें यांतच सार्थक आहे.

"दिवस असे होते..." ही जीवनकहाणी आहे. त्यांत कांही 'निवडक मोजक्या' स्नेहबंधनांचें दिग्दर्शन आहे. अनिल-कुसुमावतींच्या प्रणय-परिणयाचें कलमाच्या मोजक्या फटकाऱ्यांनीं काढलेलें तलस्पर्शी भावचित्र, माधवराव पटवर्धनांच्या विषयीचें अनुपम भावच्छटांचें प्रकरण, इंदूरच्या वास्तव्याचें प्रभावी शब्दचित्र, बडोद्यांतील जीवनाचा भावपूर्ण आलेख, प्रथम पत्नी व आई'नानी' यांच्या संदर्भातील भावविह्वल मनोमंथन—अशीं हीं त्या स्नेहबंधनांचीं नाजूक शब्दचित्रें. अशा या मनाला 'पॅशन्' केव्हांतरी भिडलेला आहे, निराशा नडलेली आहे, जळमटें-कोळिष्टकेंमुद्धा त्यांत मधून मधून आलेलींच आहेत. पण त्यांचें दिग्दर्शन मात्र आत्मकथनांत विशेषसें होत नाही. क्षोभ, तुटकपणा, स्व-अभिमान यांचें अस्तित्वहि त्यांत प्रसंगपरत्वें असावें असें सहज अनुमान निघतें. या आत्मवृत्तांत चर्चात्मक अशीं चार—पांच प्रकरणें आहेत. त्या चर्चेंतहि उमाळा आहे, पोटतिडिक आहे, व्यापक दृष्टीहि आहे! इंदूर-ग्वाल्हेरच्या मराठा समाजाविषयीची पार्श्वभूमि आणि ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादासंबंधीची २३ व २४ हीं प्रकरणें म्हणजे भावनापूर्ण पण समतोल विवेचनाचा उत्तम बोधपाठच आहे. विठ्ठलराव गतीचे भोक्ते आहेत. मराठा—ब्राह्मणेतर—समाजाची गति अवरुद्ध झाली होती, तेथे प्रगतीला वाव मिळवून देणें कर्तव्यच होतें. विठ्ठलरावांनी तें कार्य हिरीरीने केलें. या संदर्भातच कर्मवीर भाऊराव पाटील यांचें मार्मिक स्वभावचित्र आलेलें आहे. मात्र आता ज्ञातिनिष्ठ शिक्षणसंस्थांची गरज नाही असें पटतांच त्यांनी शिक्षणसंस्थांचीं दारें सर्वांस उघडीं करावींत असें स्पष्ट लिहिलें आहे.

विठ्ठलरावांच्या मनांतला इरॅस्मस (प्रकरण १२) चोखंदळ व प्रामाणिक आहे. हें आत्मकथन वाचीत असतांना वाचकाचा स्वतःचा इरॅस्मस जागा होतो. त्याला वाटतें—या पुस्तकांतल्या अनेक आठवणी स्नेहाचे झरे आहेत खरे, पण यांत दिलेले आहेत तेवढेच प्रसंग कथनकर्त्याच्या समग्र व्यक्तित्वाचे निदर्शक आहेत का? त्यांत हिरवें मन दिसतें, शोधक मन दिसतें, विचारवंत मन दिसतें. पण......या मनाला कांही कोपरे-कंगोरे नसतीलच! ते होते असें लेखकच सांगतो—कांही प्रसंगांवरूनहि तें पटतें. पण याहून अधिक प्रांजळ गोष्टी सांगून टाकणारें मनाचें निधडें अंग छापून बसल्यागत येथे कां वाटावें! लेखनाचा एक 'मूड' असतो, एक आकृतिबंध असतो. त्यांत न बसणारें जें जें असतें तें तें आपोआपच वगळलें जातें. तसेंच कांहीसें या आत्मकहाणींत झालें असावें.

तसेंच ब्राह्मण-ब्राह्मणेत्तर वाद, मूलोद्योगी शिक्षणयोजना, यांसारख्या चर्चात्मक प्रकरणामुळे आत्मवृत्ताच्या बांधेसूदपणाला धक्का लागला आहे असें वाटतें. कांहीं निर्णयांबद्दलहि मतभेद होतात. टिळक हे समाजसुधारणेच्या बाबतींत उदासीन होते हें त्यांचें मन (पा. १३०) कोणाहि विचारवंताला पटावें. पण ते प्रतिगामी होतें हें पुढचें अर्धें विधान नाशाबित करण्याइतका पुरावा असल्यामुळे आपल्याहि मनांतला इरॅस्मस त्याबाबत शंकित होतो. पण त्यांचें हें विवाद्य मतहि प्रमाणांवर आधारलेलें आहे, पूर्वग्रहांवर नव्हे. अशा प्रकारें ज्वलंत तळमळीमुळे ज्यानें मनांतला गोडवा शैलींत आणला, प्रांजळ, उदार, स्नेहाळ वातावरण आत्मकथेंत निर्माण केलें; तें मन चोखंदळ असेल, पण तुटक व तुसडें असूंच शकणार नाही. मनाचे सगळेच पडदे या ग्रंथांत खुले झाले नसतील, पण तें सागरासारखें अथांग आहे, क्षितिजासारखें विशाल आहे. यांत सर्व आलें.

• • •

# मराठी—ग्रंथसूचि ( १९६१ )

म. श्री. दीक्षित

## कथा

१. अग्निहोत्री अं. शं. — रंजना, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २, ११३; ३ रु.
२. आपटे ना. ह. — पाणी आणि शेवाळ, आपटे आणि मंडळी, कोरेगांव ( सातारा ); १५८, ३=५०
३. आवळसकर शां. वि. — ऐतिहासिक कथा, यशवंत प्रकाशन, ६८९-२४ सदाशिव, पुणें २ १०४, २; रु.
४. ओक र. पां.—इमान, यशवंत प्रकाशन, ६९८-२४ सदाशिव पुणें २; १३६, ३=५०
५. कर्नाड हिरा—पिवळं पातळ हिरवी चोळी, चंद्रकान्त शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर; ११४, ३ रु.
६. कंटक सां. घ.—जाईचीं फुलें, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १२६, ३ रु.
७. कानिटकर माधव— कथामाधवी, अनुपम प्रकाशन, १६९१ सदाशिव, पुणें२; १३५, ३=५० रु.
८. किर्लोस्कर शांता—डाकऱ्याची साडी, कैलास प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; १०९, ३ रु.
९. कुलकर्णी म. वि.—पतंगप्रीत, नागविदर्भ प्रकाशन, अमरवती; १०४, ४ रु.
१०. खरात शंकरराव—तडीपार, साधना प्रकाशन, ४३०-३१ शनिवार, पुणें२; १४८, ३=५०
११. खापर्डे बा. ग.— राजकन्या अनंगरागा, यशवंत प्रकाशन, पुणें २; १०२, २ रु.
१२. खांडेकर वि. स.—पाषाणपूजा, काँटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता; पुणें २, २६७, ५ रु.
१३. खांबेटे द. पां—पोटिमा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; १४३, ३ रु.
१४. गाडगीळ गंगाधर—पाळणा, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणें २; १५४, ४ रु.
१५. गाडगीळ बाळ—आकार आणि रेषा, सुविचार प्रकाशन मंडळ, ४६१—१० सदाशिव, पुणें २. १४०, ३=५०
१६. गोखले अरविंद—कातरवेळ; पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; २५९, ६ रु.
१७. गोखले अरविंद—चाहूल, काँटिनेंटल प्रकाशन पुणें २; १५०, ३=५०
१८. गोखले अरविंद—मराठी कथा १९५९ ( संयोजन ), काँटिनेंटल प्रकाशन, पुणें २ १८४, ३ = ५०
१९. गोखले अरविंद—मराठी कथा १९६० ( संयोजन ), काँटिनेंटल् प्रकाशन, पुणें २ १६१, ३=५०
२०. जोशी आशा—अरेबियन नाईट्स, मराठी साहित्य प्रकाशन, १००५ सदाशिव, पुणें २; ४३२, ५ रु.
२१. जोशी ए. वि.—कृष्णाकांठचे देव, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ११२, ६ रु.

अनुक्रमणिका

२२. जोशी चिं. वि.-हास्यचिंतामणी कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३११, ५ रु.
२३. जोशी दि. वि.-मृत्तिका, नागपूर प्रकाशन, नागपूर१; ८५, २ रु.
२४. जोशी य. गो-चंद्रप्रकाशाचें दूध, यशवंत प्रकाशन, पुणें २, १७५, ४ रु.
२५. जोशी य. गो.-लक्षांत राहिलेलीं माणसं, व्हीनस प्रकाशन, पुणें २; १७५ २=७५
२६. जोशी वि. वा.-नागपुरी नळ आणि इतर कथा, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ९२, २ रु.
२७. ठावरे पद्माकर.-हिसका, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १४३, ५ रु.
२८. तामणे प्रभाकर.-घडीभराची वसती, ठोकळ प्रकाशन, लक्ष्मी रोड, पुणें २; २१५, ४=५०.
२९. दलवाई हमीद.-लाट; साधना प्रकाशन, ४३०-३१ शनिवार, पुणें २; १५१, ३=५०
३०. दळवी जयवंत.-जळांतील मासा, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; १२७, ४=५०.
३१. दौंडकर खं. सा.-मोत्यांची कुडी, देशमुख आणि कंपनी, पुणें २; २०७, ५ रु.
३२. नवरे शं. ना.-कोंवळी वर्षं, चिंतामणि प्रकाशन, खार, मुंबई ५२; १४४, ३=५०.
३३. नवरे शं. ना.-जत्रा,भगवानदास हिरजी, कांदेवाडी, मुंबई ४; १६०, ३=७५.
३४. धनवटे सुमतिदेवी.-बोलतं थडगं, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १०२, ४ रु.
३५. नागपुरे पं. ख.-निखारा, शाम प्रकाशन, तपोवन, अमरावती; १००, २ रु.
३६. नारखेडे के.-खानदेशची माती, ठोकळ प्रकाशन, पुणें २; १४८, ३=५०.
३७. पटवर्धन वसुंधरा.-आदिपुरुष, ज्ञानराज प्रकाशन, ४२१, शनिवार, पुणें २. १५६, ३=५०.
३८. पटवर्धन वसुंधरा.-पिपाणी, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; १२०, ३ रु.
३९. पटवर्धन दया.-सेमिनार, कुलकर्णी ग्रंथागार, १८६, शनिवार, पुणें २; १४३, ३ रु.
४०. पाटील दिनकर.-शंभर रुपये, कुलकर्णी ग्रंथागार, पुणें २; १२२, ३ रु.
४१. पाटील य. शा.-माणसाला पंख नसतात, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर कोल्हापूर १; ११३, ३ रु.
४२. पाटील शंकर.-आभाळ, कॉंटिनेंन्टल बुक सर्व्हिस, पुणें २; १४५, ४ रु.
४३. पुनर्वसु शशिकान्त.-गुलमोहोर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १४९, ५ रु.
४४. फडके कमला.-मातीचा हत्ती, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १८४, ५ रु.
४५. बोकील वि. वि.-तऱ्हेवाईक बायको आणि इतर कथा, कुलकर्णी ग्रंथागार, पुणें २; १३१, ३ रु.
४६. मडकईकर भालचंद्र.-सुकेरिया, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; ११९, ३ रु.
४७. मंत्री रमेश.-वाटाण्याच्या अक्षता, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १, १६०, ४ रु.
४८. माने वसंत.-आकुळी, चिंतामणि प्रकाशन, खार, मुंबई ५२; १३४, ३=५०.
४९. मिरासदार द. मा.-चकाट्या, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १४४, ५ रु.

५०. मिरासदार द. मा.-चुटक्याच्या गोष्टी, चंद्रकान्त शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; १५६, ४ रु.
५१. मोघे य. ना.-कांहीं त्यांचें कांहीं माझें, सौ. इंदिरा मोघे, बिर्लानगर (ग्वाल्हेर); ८४, २ रु.
५२. मोहोड बाबा.-शेवंती, वंदन प्रकाशन, माधान, अमरावती; ८७, २=५०
५३. रामतनय-अघटित घटना, ग. रा. बाळिंबे, ४६४ नारायण पेठ, पुणें २; ९२, २=५०
५४. रांजणकर यशवंत-खानदान, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४, १६८, ४ रु.
५५. रुईकर प्रभाकर-अपराधी, प्रभाकर ग्रंथ प्रकाशन, कराड, १२८, २=५०
५६. शहाणे मनोहर-शहाण्यांच्या गोष्टी, चंद्रकांत शेट्ये प्रका. मंदिर, कोल्हापूर १; ११२, ३ रु.
५७. शिरवाडकर वि. वा.-कांहीं वृद्ध : कांहीं तरुण; महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १७०, ४ रु.
५८. सातोस्कर बा. द.-प्रीतीची रीत, सागर साहित्य प्रकाशन, मुंबई ४; १७०, ३ रु.
५९. सिन्हा शरच्चंद्र-अर्चना, यशवंत प्रकाशन, नातुबाग, पुणें २; १५८, ५ रु.

## कादंबरी

१. अमरेंद्र-वटपत्र, गोकुळ, मासिक प्रकाशन, ११९४ सदाशिव, पुणें २; ९७, ३ रु.
२. काकोडकर चंद्रकांत-अनुराग, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १९८, ५ रु.
३. काकोडकर चंद्रकांत-खोड झिजे चंदनाचें, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १३१, ३ रु.
४. काकोडकर चंद्रकांत-प्रियदर्शन, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; १९५, ५ रु.
५. काकोडकर चंद्रकांत-सुजाता, प्रताप रेळे, आंबेवाडी, मुंबई ४; २०७, ५ रु.
६. कानिटकर माधव-अधर्म, मेनका प्रकाशन, ४३८ अ सदाशिव, पुणें २; २५६, ६ रु.
७. कानिटकर माधव-अनोळखी, मेनका प्रकाशन, बोरभाट लेन, मुंबई ४; १३७, ४ रु.
८. कानिटकर माधव-इंद्रधनूचा सेतू, मेनका प्रकाशन, सदाशिव, पुणें २; ९७, २=५०
९. कानिटकर वि. ग.-खोला धांवे पाणी, इनामदार बंधु प्रकाशन, ९९१ सदाशिव, पुणें २; ९९, २=५०
१०. कुलकर्णी दत्ताजी-माणुसकीचें मोल, पॅरेमाऊंट पब्लि. सि. प्रा. लि. ४२८ शनिवार, पुणें २; १२६, २=५०
११. कुलकर्णी रंगनाथ-सुरईतला राक्षस, जयहिंद प्रकाशन, मुंबई २; ३७९, ५=५०
१२. गोरे भा. म.-मनोऱ्यावर दोघे, आयडियल बुक सर्व्हिस, ८८५ सदाशिव पुणें २; २६८, ४ रु.
१३. जोशी बा. वि.-रावसाहेब खंडेराव, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर मुंबई ४; २००, ६ रु.
१४. जोशी श्री. ज.-पाप, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; २१८, ५ रु.
१५. कोठारी डी. एम्.-आपला हात जगन्नाथ, चंद्रकांत शेट्ये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; १२७, २ रु.

१६. दिवेकर कृ. ज.–उषास्वप्न, लाखाणी बुक डेपो, मुंबई ४; १९६, ३=७
१७. देसाई स. शं.–अब्बासअल्ली, सह्याद्रि प्रकाशन, पुणें २; १९६, ५ रु.
१८. धर्माधिकारी भाऊ–बारा व्वसा, सुलभ रा. ग्रंथमाला, शनिवार, पुणें २; १४३, ३ रु.
१९. पाटील बा. भ.–कामभूल, मेनका प्रकाशन, सदाशिव पुणें २; १०४, २=५०
२०. पाध्ये भाऊ–करंटा, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; १००, २=५०
२१. फडके ना. सी.–कठपुतळी, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २४६, ६ रु
२२. फडके ना. सी –कुहू ! कुहू ! ग पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २८८, ८ रु.
२३. फडके ना. सी.–निर्माल्य, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २७१, ६ रु.
२४. फडके ना. सी.–वेडं वारं, व्हीनस प्रकाशन, पुणें. २; २२४, ६ रु.
२५. बेहेरे ग. वा.–चकोरी, अस्मित प्रकाशन, पुणें, ४६१/१ सदाशिव, पुणें २; ९१, २=५०
२६. भागवत भा. रा.–आनंदी आनंद गडे, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; २८०, ३ रु.
२७. भागवत भा. रा.–एक होते सरोवर, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; २६४, ३ रु.
२८. भिंगारे ल. म.–लवणाची मासोळी, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; २००, ४=५०
२९. मोकाशी दि. बा.–देव चालले, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; १०७, ३ रु.
३०. शास्त्री शं. बा.–योगायोग, साहित्य अकादेमी, नवी दिल्ली; २६६, ७ रु.
३१. सप्रे रा. व.–पंढरीचा प्रसाद, सुंदर साहित्य प्रकाशन, १००७ सदाशिव, पुणें २; २१५, ५ रु.
३२. सावकार इंद्रायणी–ओळख, मनोहर ग्रंथमाला, १६०९ सदाशिव, पुणें २; १६९, ४ रु.
३३. हडप वि. वा.–नवा संदेश, वैजयंति हडप, शनिवार, सातारा; २१२, ५ रु.

## काव्य

१. कालेलकर काकासाहेब–रवींद्रवीणा, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; १४०, ४ रु.
२. कुलकर्णी सरोजिनी–मराठी साहित्य दर्शन, पुष्प १०, वें संजीवनी मराठे (संपादन) अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १२८, २=५०
३. गद्रे रा. ना.–भर्तृहरि विरचित नीतिशतक, आयडियल बुक सर्व्हिस, पुणें २; १५२ २=५०
४. गोखले वा. दा.–श्री खंडोबाचीं पदें (संपादन), वा. दा. गोखले, चिमणबाग, टिळक रोड, पुणें २; ४०, ००=५०
५. चौधरी-उहाके-वनकर–नवकलिका (संपादन), भावगंध प्रकाशन, चांदा; ३२, १ रु.
६. जोशी-अयाचित–भर्तृहरीकृत नीतिशतक, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १००, २=५०.
७. ठोकळ-खरात-पाटील–दगडूबाचा साळी (लावण्या व वग), मराठी तमाशा परिषद्, पुणें २; १२५, ३ रु.
८. ढवळे-शिरवाडकर–सुवर्ण नौका, देशमुख आणि कंपनी, पुणें २; १४४, ३ रु.

९. ढेरे रा. चिं.–हरिवरदा, खंड ७ वा, द. र. कोपर्डेकर, १२५७ सदाशिव पेठ, पुणें २; २५०, ७ रु.
१०. तळवाडकर वा. ना.–भारत काव्यसंग्रह (संपादन): भारत प्रकाशन मंदिर, रावळगांव; २०९, ३ रु.
११. देशपांडे गुणाकर–जिव्हाळी, संजय देशपांडे, धरमपेठ, नागपूर १; ६३, २=५०
१२. पाटणकर वा. वा.–मराठी शायरी, वा. वा. पाटणकर, यवतमाळ; ५५, २ रु.
१३. पाटील ग. ह.–लिंबोळ्या, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; १३३, ३ रु.
१४. पायगावकर सुमति–गीतकलिका, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; ६६, १=२५
१५. भंडारी रतनलाल–मैफल, सह्याद्रि प्रकाशन, १२० नारायण, पुणें २; ४८, १=५०
१६. माळी गजमल–गंधवेणा, मराठवाडा साहित्य परिषद्, औरंगाबाद; ६४, १=५०
१७. मोहोडबाबा–अस्मिता (संपादन), वंदन प्रकाशन, माधान, अमरावती; ९५, २=५०.
१८. मोहोडबाबा–घागर, वंदन प्रकाशन, माधान, अमरावती; ९१, २=५०
१९. यशवन्त–मुठे! लोकमाते! य. दि. पेंढरकर, १९६।३४ सदाशिव, पुणें २; ४५, १ रु.
२०. यावलीकर राजा–आस्वाद, जगताप कारले प्रकाशन, पुणें २; ६४, २ रु.
२१. विद्वांस शं. रा.–योगी अगस्ति, शं. रा. विद्वांस, अकोले (अहमदनगर); २२, ००=७५.
२२. वैद्य वसंत–साद, वसंत वैद्य, नौपाडा, ठाणें; १२०, ४ रु.
२३. शरश्चंद्र–व्हराड्माती, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ५०, १=५०

## नाटकें

१. आचरेकर आबासाहेब–गाऊं त्यांना आरती, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; ८७, २ रु.
२. आळंदकर शशिकला–एकदांच गाऊं दे, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७१, २ रु.
३. कानेटकर वसंत–प्रेमा तुझा रंग कसा?, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ११४, २=५०
४. कालेलकर मधुसूदन–संगमरवरी स्वप्न, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७८, २ रु.
५. चव्हाण पां. व्ही.–हेहि दिवस जातील, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; ५१, १=५०.
६. चव्हाण शं. ब.–स्त्रीजात तेवढी?, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; ८४, १=७५.
७. जाधव वसंत–जीवनसाथी, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ७८, २ रु.
८. दाते प्रभा–दिवस सोनियाचा, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ७६, २ रु.
९. दारव्हेकर पुरुषोत्तम–चंद्र नभींचा ढळला, ग. का. रायकर, झावबाची वाडी, मुंबई २; १११, २ रु.
१०. देशपांडे अशोक–नवऱ्याला हवीय पोटगी, के. वा. जोशी, २५ बुधवार, पुणें २; ६९, २ रु.

११. देशपांडे श्रीधर–आव्हान, मनोहर ग्रंथमाला, सदाशिव, पुणें २; ८२, २ रु.
१२. पटवर्धन वसुंधरा–हिरकणी, परचुरे प्रका० मंदिर, मुंबई ४; ७५, २ रु.
१३. प्रफुल्लदत्त–दया–तिचें नांव, योजना प्रकाशन, अलिबाग; ६७, १ = ५०
१४. पाटील विनायक–चोरांची आळंदी, केशव डी. वायटला, आंबेडकर रोड, मुंबई १२; ११२, २ रु.
१५. पेंडसे श्री. ना.–महापूर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ९१, २ = ५०
१६. फणसळकर ह. गं.–विठ्ठल विठ्ठल गजरी, राज प्रकाशन, लक्ष्मीपुरी, कोल्हापूर; ४९, १ = ७५
१७. बढे राजा–अशी गंमत आहे, रामकृष्ण बुक डेपो मुंबई ४; ९९, २ =५०
१८. बेडेकर विश्राम–नरो वा कुंजरो वा, देशमुख आणि कंपनी, पुणें २; ९२, २=५०
१९. भट गो. के.–मात तुला काय हवंय ?, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ८२, २=५०
२०. भट गो. के.–मालविकाग्नि मित्र, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; ७८, २=५०
२१. भिडे गोविंद–कळावें लोभ असावा, के. वा. जोशी, २५ बुधवार, पुणें २; ८२, २ रु.
२२. मुंढे बा. ब.–स्वार्थाचे बळी, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; ७६, २ रु.
२३. मोरे ना. ल.–धाकटी जाऊ, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ८४, २ रु.
२४. रांगणेकर कुमुदिनी–दारींच्या चिमण्या उडुनी जाती, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ५९, १ = ५०
२५. रांगणेकर-सवनीस-माडगूळकर–हेहि दिवस जातील, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७९, २ रु.
२६. लिमये बाबा–अगा जें घडलेची नाहीं, सिद्धार्थ साहित्य, मुंबई; १०१, २ रु.
२७. वराडकर शरद–दोन घडीचा डाव, चंद्रकांत शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; ८१, १ = ७५
२८. व्ही. चंद्रशेखर–लाखांचा धनी, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ५५, २ रु.
२९. शिरवाडकर वि. वा.–ऑथेल्लो, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १०९, ५ रु.
३०. शिवलकर मु. गो.–हें विश्वचि माझें घर, बलवंत पुस्तक भांडार, मुंबई ४; ६५, १ = ५०
३१. सवनीस वसंत–अदपाव सुतार, पावशेर न्हावी, सव्वाशेर शिंपी ( वग ); मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; ९०, २ रु.
३२. साठे मो. स.–भुजंग, वि. स. साठे, ७५४ शुक्रवार, पुणें २; ११८, २=५०.
३३. साठे शं. गो.–ससा आणि कासव, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १०७, २=५०.
३४. सामंत रघुवीर.–वेणीसंहार, सौ. नीळा जोशी, अलिबाग; ६१, १=५०
३५. सावंत आत्माराम.–तेथे पाहिजे जातीचे, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ७९, २ रु.
३६. सोनसुरकर ना. के.–वैभव, जगन्नाथ गायकवाड, बी. डी. डी. चाळ, मुंबई १८; ७६, १=५०.

अनुक्रमणिका






## एकांकिका-नाटिका

१. काणेकर अनंत.-सांवर आणि इतर एकांकिका, देशमुख आणि कंपनी, पुणें २; २९२, ६=५०.
२. कारेकर वासुदेवसुत.-वंडाचा झेंडा, चंद्रकान्त शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; २४, ००=५०.
३. कारेकर वासुदेवसुत.-शिवप्रतिज्ञा, चंद्रकान्त शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; २२, ००=५०.
४ गाडगीळ गंगाधर.-वंडू नाटक करतो आणि इतर एकांकिका, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ७०, १=५०.
५. जाधव आर. एस-.आनंदाश्रमांत संभाजी, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; २४, ००=७५.
६. जोशी चिं. वि.-मेषपात्रें, कुलकर्णी ग्रंथागार, शनिवार, पुणें २; १३५, ३ रु.
७. देशपांडे पु. ल.-विठ्ठल तो आला, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १०१, २ रु.
८. धोंड मा. ना.-झपाटलेलं घर, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; २८, ००=७५.
९ नागपुरे वसंत.-जेव्हा सारे जमतात, इनामदार बंधु प्रकाशन, सदाशिव, पुणें २; २१, ००=७५.
१०. नेमाडे वि. भा.-धुक्याचा पडदा, पन्नालाल देवडिया प्रकाशन, वर्धा; ५१, १ रु.
११. मतकरी रत्नाकर.-काळवेळ, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २४, ००=७५.
१२. मतकरी रत्नाकर.-घन तमीं शुक्र, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २४, ००=७५.
१३. मतकरी रत्नाकर.-चोर, शिरजोर, आणि, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; १९, ००=६०.
१४. मतकरी रत्नाकर.-बारा पस्तीस, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २७, ००=७५.
१५. मतकरी रत्नाकर.-लाट फुटली, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; २३, ००=७५.
१६. मतकरी रत्नाकर.-सात एकांकिका, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; १५५, ४ रु.
१७. वरेरकर भा. वि.-वरेरकरांच्या एकांकिका, भाग १, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; ७८, २ रु.
१८. वरेरकर भा. वि.-वरेरकरांच्या एकांकिका, भाग २, पॉप्युलर बुकडेपो मुंबई ७; १११, २=५०.

## चरित्र-आत्मचरित्र

१. अर्नाळकर बाबूराव-भगवान श्रीनित्यानंद, बाबूराव अर्नाळकर, स्लेटर रोड, मुंबई ७; १२८, ३ रु.
२. अळतेकर मा. दा.-उमटलेलीं पानें, मॉडर्न बुक डेपो, पुणें २, २१२, ५ रु.
३. अमीन सय्यद-सम्राट, अकबर, सय्यद, अमीन, सांगली; २२७, ४ रु.
४. आपटे राधाबाई-उमटलेलीं पावलें, राधाबाई आपटे, पुणें ४; २८३, ५ रु.
५. करंदीकर सु. द.-दे. ना. टिळक, सौ. कमल करंदीकर, डोंबिवली (ठाणें); ८४, १ रु.
६. कानेटकर मा. ज.-यशवंतराव चव्हाण एक दर्शन, य. चव्हाण वर्षगांठ सत्कार समिति, रांका भुवन, नागपूर २; ३६, ००=५०

७. फिर्लोस्कर चंद्रा–जय प्रकाश नारायण, साधना प्रकाशन, शनिवार, पुणें २, ६०, ०० = ८०
८. किंजवडेकर श्रीपादशास्त्री–श्रीवासुदेवानंद सरस्वति महाराज यांचें चरित्र आणि कार्य, प्रसाद प्रकाशन, पुणें २; ३५१, ७ = ५०
९. कुलकर्णी कृ. पां.–कृष्णाकाठची माती, भारती प्रकाशन, वाभुळी निवास, मुंबई १६; २९९, ७ = ५०
१०. खरात शंकरराव–डॉ. आंबेडकरांच्या सहवासांत, ठोकळ प्रकाशन, पुणें २; २९१, ४ = ५
११. खानोलकर गं. दे.–रवींद्रनाथ जीवनकथा, व्हीनस प्रकाशन, पुणें २; ६२६, २० रु.
१२. खेर ग. द.–श्री भटजी महाराज नाशिककर व इतर संत; वोरा अँड कंपनी पाटील प्रा. लि. मुंबई २; ८४, १ = २५
१३. गवाणकर वि. स.–भारताचीं भूषणें, व्हीनस प्रकाशन, पुणें २; ११८, २ रु.
१४. गाडगीळ वा. य.–हिरव्या चादरीवर, नवीन किताबखाना, बुधवार, पुणें २; १५२, ३ रु.
१५. घाटे विठ्ठलराव–दिवस असे होते, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४९९, १५ रु.
१६. चौगुले एस. एस.–आमचे शिक्षणमंत्री ना. बाळासाहेब देसाई, ए. एस. चौगुले अंबराईजवळ, सांगली; १४६, ३ रु.
१७. टिकेकर श्री. रा.–जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई, पॉप्युलर बुक डेपो मुंबई ७; १५६, ५ रु.
१८. ढेरे रा. चिं.–श्रीशारदामाता, श्री विवेकानंद सोसायटी, १३४ रास्ता, पुणें २; २०१, ३ = ५०
१९. तळवलकर गोपिनाथ–शांतिनिकेतन, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; १२६, २ रु.
२०. दांडेकर वि. पां.–सयाजीराव गायकवाड, ठोकळ प्रकाशन, पुणें २; १०६, १ = ५०
२१. देशपांडे अ. ना.–विदर्भाचे मानकरी ( संपादन ), विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, १३२० शुक्रवार, पुणें २; ९५, २ रु.
२२. देशपांडे भा. गं.–मानवेंद्र सावरकर, भा. गं. देशपांडे, जालना; ४१, १ रु.
२३. पंडित भ. श्री.–रा. सा. भवाळकर यांचें आत्मवृत्त ( संपादन ), विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर १; १२७, २ रु.
२४. पाटील हिं. ज्ञा.–महाराष्ट्राचे कर्मवीर, वारणखोरा प्रकाशन, भादोले (कोल्हापूर) ६४, १ = ७५
२५. पाळेकर भ. ब.–‘ जागृति ’ कार पाळेकर, अ. भ. पाळेकर, रावपुरा, बडोदें; ३५२, १० रु.
२६. पेंढारकर बाबूराव–चित्र आणि चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणें २; २८९, १० रु.
२७. पोतदार द. वा.–ओळख–( व्यक्तिचित्रें ), व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; १०७, ३ रु.
२८. बेडेकर वा. वि.–बेडेकर जीवनवृत्तान्त, श्यामला प्रकाशन, गिरगाव रोड, मुंबई ७, १७०. ४ रु.

२९. भूसरथ वि. रा.–युगकर्ता शिवाजी, विश्वनाथ वाबळे, घोडपदेव मुंबई; ११९; ४ रु.
३०. भोसले, शं. द.–विचारवंतांची चरित्रें, शं. द. भोसले, २२९० डी वॉर्ड, कोल्हापूर; ४८, १·५०
३१. शास्त्री य. वा.–जगजीवनराम व्यक्ति आणि व्यक्तित्व, युगांतर शिक्षण संस्था, सिव्हिल लाइन, नागपूर; १४३, ५ रु.
३२. शेटये वि. गो.–जीवन स्मरणी, ना. ह. हेळेकर, रेळेवाडी, मुंबई ४; १७२, ३ रु.
३३. सार्दळ शं. धों.–रासपुतीन, महाराष्ट्र ग्रंथ प्रकाशन, कोल्हापूर; ९२, २ रु.
३४. सुखठणकर वि. स.–रवींद्रदर्शन, ह. पां. चौधरी, निर्णयसागर प्रेस, मुंबई २; १०४, १·५०
३५. हरदास बाळशास्त्री–पुण्यश्लोक छ. शिवाजी भाग ३ रा, शं. रा. दाते, १८३५ सदाशिव, पुणें २; ३९२, ८ रु.

## टीकात्मक

१. अत्रे प्रभाकर–कुसुमाग्रज, मॉडर्न बुक डेपो, पुणें २; ८०, १–५०
२. अत्रे प्र. के.–संत आणि साहित्य, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १४८, ३ रु.
३. काळे के. नारायण–नाट्यविमर्श, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १६०, ५ रु.
४. खांडेकर वि. स.–रंग आणि गंध, देशमुख आणि कंपनी, पुणें २; १९६, ६ रु.
५. खांडेकर वि. स.–रेपा आणि रंग, देशमुख आणि कंपनी, पुणें २; २८२, ८ रु.
६. गोगटे श्रीकांत–रवींद्रकाव्यदर्शन, सरस्वती प्रकाशन, ४१४ सदाशिव, पुणें २; १०२, २=५०
७. घाटे ब. गि.–एकनाथ दर्शन खंड २ रा ( संपादन ) एकनाथ सं. मंदिर, औरंगाबाद; २६८, ६ रु.
८. जावडेकर मु. म.–पराभवांची रहस्यें, मु. म. जावडेकर, ४९९ शनिवार, पुणें २; ९९, २=५०
९. जोशी रा. भि.–साहित्यसंवाद, इनामदार बंधू प्रकाशन, पुणें २; १५८, ५ रु.
१०. जोशी वि. कृ.–लोकनाट्याची परंपरा, ठोकळ प्रकाशन, पुणें २; २५८, ८ रु.
११. तुळपुळे ग. वि.–संतांच्या सहवासांत, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, पुणें २; २०५, ५ रु.
१२. दाभाडे बाळकृष्ण–कलासाधना, ठोकळ प्रकाशन, पुणें २; १६० रु. ३ रु.
१३. दांडेकर मालतीबाई–अष्टनायिका, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; २७१, ७=५०
१४. देशपांडे मा. का.–साहित्य साधना, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ५६०, १५ रु.
१५. पगडी सेतुमाधवराव–मणिकांचन, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणें २; २२८, ५ रु.
१६. पंडित भ. श्री.–केशवसुतः पांच चिंतनिका, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; १४४, ६ रु.
१७. पंडित भ. श्री.–संतसमागम, नागविदर्भ प्रकाशन, पुणें २; ११५, ३=५०
१८. पेंडसे शं. दा.–मराठी संत काव्य आणि कर्मयोग, व्हीनस प्रकाशन, पुणें २; १८२, ४ रु.
१९. बहिरट भा. पं.–नाथांचा प्रसाद, भा. पं. बहिरट, पंढरपूर; १४८, ३ रु.

२०. बागुल देविदास-बाल वाङ्मय, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, पुणें २; ८९, ३ रु.
२१. बाबर सरोजिनी-वनिता सारस्वत, समाज शिक्षण प्रकाशन, पुणें २; ३७४, १० रु.
२२. भागवत अ. के-टागोर साहित्य-कला-विचार, (संपादन), डायमंड बुक स्टॉल, सांगली; २५०, ४=५०
२३. वरखेडकर वसंत-गडकऱ्यांची नाट्यप्रकृति व नाट्यसृष्टि, विदर्भ साहित्य संघ, नागपूर १; ४०, ००=६०
२४. वाटवे के. ना.-रसविमर्श, (सुधारून वाढविलेली आवृत्ती), एन. के. पब्लि. हाऊस पुणें २; ४७४, १५ रु.
२५. सहस्रबुद्धे म. ना.-मराठी शाहिरी वाङ्मय, टोकळ प्रकाशन, पुणें २; २५२, ६ रु
२६. क्षीरसागर श्री. के.-उमरखय्यामची फिर्याद, पॉप्युलर बुक डेपो मुंबई ७; १४३, ४ रु.
२७. क्षीरसागर श्री. के.-साहित्याच्या दरबारांत, सुविचार प्रकाशन मंडळ पुणें २; १४९, ४ रु.
२८. अभिरूप न्यायसभा, (आचार्य अत्रे व के. दाते यांच्यावरील अभिरूप खटल्याचा वृत्तान्त), मराठी नाट्यपरिषद्, बेळगांव, ५६, २ रु.

## प्रवास व स्थल वर्णनें

१. अत्रे प्र. के.-केल्याने देशपर्यटन, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४, २२७, ६ रु.
२. आनंदयात्री-श्री. चैतन्य लीलाधाम नवद्वीप, वोरा अँड कंपनी पब्लि. प्रा. लि, मुंबई २; ३२, ००=८०.
३. आनंदयात्री-त्रिभुवनेश्वर लिंगराज, वोरा अँड कंपनी प्रा. लि, मुंबई २; २७, ००=८०.
४. आनंदयात्री-भगवान कोणादित्य, वोरा अँड कंपनी प्रा. लि. मुंबई २, ३०, ००=८०.
५. कालेलकर काका.-भारतदर्शन, भाग १ व २, वोरा अँड कंपनी, पब्लि. प्रा. लि, मुंबई २; ९१ व १००, १=५० प्रत्येकी.
६. जोशी रा. भि.-मजल दरमजल, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १४८, ५ रु.
७. देशपांडे बाळशंकर-'परल्यां वैद्यनाथ' च, वोरा अँड कंपनी पब्लि.-प्रा. लि., मुंबई २; १९, ००=६५.
८. पाध्ये प्रभाकर-तोकोनोमा, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; २१०, ८ रु.
९. मांडवकर भाऊ-दक्षिणदर्शन, सेवा प्रकाशन, अमरावती; १६१, ४ रु.
१०. श्रीधरस्वामी महाराज-मोक्षसंदेश, समर्थ सेवामंडळ, सातारा; १०४, १=५०.

## ललित गद्य

१. अत्रे प्र. के.-वस्त्रहरण, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १७२, ५ रु.
२. आचवल माधव-किमया, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; १२८, ५ रु.
३. काळे श्री. वा.-कौटुंबिक हितगुज, किर्लोस्कर प्रेस, पुणें २; ११९, ३ रु.
४. काळे श्री. वा.-दाणे आणि खडे, व्हीनस प्रकाशन, पुणें २; ११२, २=५०.
५. कुलकर्णी भीमराव-मराठी साहित्य दर्शन पुष्प ९ वें. अच्युत बळवंत कोल्हटकर, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १२०, २=५०.

६. केळकर म. म.–मराठी साहित्य दर्शन पुष्प ८ वें–ग. दि. माडगूळकर, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १२०, २ रु.
७. खांडेकर वि. स.–ते दिवस तीं माणसें, देशमुख आणि कंपनी पुणें २; १८१, ५ रु.
८. खांडेकर वि. स.–रिमझिम, देशमुख आणि कंपनी, पुणें २; १७९, ५ रु.
९. गाडगीळ न. वि.–माझा येळकोट, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; १७९, ५ रु.
१०. घारे पां. श्री.–मराठी साहित्य दर्शन पुष्प ७ वें–अनंत काणेकर, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १२०, २ रु.
११. जोशी वि. वा.–आदर्श विद्यार्थी, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, ५१, १ रु.
१२. जोशी स. कृ.– अमृताची पाउलवाट, यशवन्त प्रकाशन, पुणें २; १८७, ३=५०
१३. तळवलकर-लिमये–शिवनेरीच्या नौबती, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; १२१, ४=५.
१४. थत्ते यदुनाथ–आपला मान आपला अभिमान, ठोकळ प्रकाशन, पुणें २; १२४, २=५.
१५. दळवी जयंत–फजीतवाडा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १२७, ४ रु.
१६. बावर सरोजिनी–खुणेचीं पानें, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणें २; १५२, ४ रु.
१७. बुवा वि. आ.–चौदावें रत्न, जे विनायक प्रकाशन, मुंबई २८; १२४, ३ रु.
१८. भावे पु. भा.–वाघनखें, देशमुख आणि कंपनी, पुणें २; १७८, ५ रु.
१९. भावे पु. भा.–वायव्हार, सौ. लक्ष्मीबाई टेकाडे, स्लेटर रोड, मुंबई ७; १३०, ३=७५.
२०. भावे गोपालकृष्ण–चतुरंगरेखा, कैलास प्रकाशन, मुंबई २; १२०, ३=५०
२१. मंगळवेढेकर राजा–हरवलेलं आभाळ, सह्याद्रि प्रकाशन, ३९४ नारायण, पुणें २; ९४, २ रु.
२२. मंत्री रमेश–कोल्ह्याचीं द्राक्षें, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; १०१, ३ रु.
२३. रानडे भाऊ-शलाका, राष्ट्रसेवादल, पटेल रोड, मुंबई ४; १०८, २ रु.
२४. सगदेव रा. पु.–हवेंतील वेढीं, स्वस्तिक मंडळ, जेल रोड, नागपूर १; १०८, ३ रु.
२५. सबनीस वसंत–भारूड, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; १४२, ४ रु.
२६. सामंत बाळ-गोंधळ, चिं. र. देसाई, १५ वा रस्ता, खार; ११०, ३ = ५०
२७. सुभेदार वि. श्री.–चंदेरी कुजबूज, वि. श्री. सुभेदार, सेलू (परभणी); ५०; १ रु.

## इतिहास आणि संशोधन

१. कानोले वि. अं.–मुकुंद राजाची अंबानगरी कोणती ?, गोदातीर इतिहास संशोधन मंडळ, नांदेड; ८६, १ = ५०
२. कुंटे भ. ग.–पानिपतची मोहिम अथवा काशी राजाचा वृत्तान्त, मुरली प्रकाशन, पुणें २; २९३, ३ रु.

३. जोशी. शं. ना.–भाऊसाहेबांची बखर पुरवणी, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें १; २९३, ३ रु.
४. ढेरे रा. चिं.–खंडोबा, देशमुख आणि कंपनी, पुणें २; १६४, ५ रु.
५. ढेरे-खेर–महाराष्ट्र इतिहास दर्शन, वोरा अँड कं. पब्लि. प्रा. लि. मुंबई १; ९१, २ रु.
६. देवळे शं. रा.–पानिपतचा रणसंग्राम, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; ११४, २=५०
७. देसाई स. शं.–पहिलें जागतिक महायुद्ध, वोरा अँड कंपनी पब्लि. प्रा. लि., मुंबई २; १४०, २ रु.
८. प्रभु सुधाकर–पुण्यपथ पानिपत, वोरा अँड कंपनी पब्लि. प्रा. लि., पुणें २; ११०, २ रु.
९. फाटक-पगडी–पानिपतचा संग्राम भाग पहिला, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २; १८८, ५ रु.
१०. बनहट्टी श्री. ना.–आज्ञापत्र अर्थात् शिवाजी राजांची राजनीति, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणें २; १४८, ४=५०
११. वरवे-कानडे–मराठी नाट्य परिषद : इतिहास व कार्य, व्हिनस बुक स्टॉल, पुणें २; ३१४, ८ रु.
१२. बेंद्रे वा. सी.–शेख महंदमबाबा श्रीगोंदेकर यांचा कविता संग्रह, पी. पी. बुक स्टॉल, मुंबई ४; १४६, ५ रु.
१३. लांडगे-सगदेव-डोळके–विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६०, वि. संशोधन मंडळ, नागपूर १; १८०, ४ रु.
१४. लिमये पी. एम्.–पानिपतचा रणसंग्राम (नाना फडणीस यांचे शब्दांत), जी. जे. कुंटे, सांगली; ३०, मूल्य ?
१५. शेजवलकर त्र्यं. शं.–कोंकणच्या इतिहासाची पार्श्वभूमि, दत्तोपंत आपटे स्मारक मंडळ, सदाशिव, पुणें २; ४०, १ रु.
१६. शेजवलकर त्र्यं. शं.–पानिपत १७६१, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणें २; २६८, १० रु.

**संकीर्ण** (ज्ञान, विज्ञान, धर्म, कला, क्रीडा, कोश, संदर्भ इत्यादि)

१. अकोलकर ग. वि.–शैक्षणिक मनोविज्ञान, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; ३०७, ४=५०
२. अज्ञातवासी–माझी अभ्यासिका, डी. जी. खिवसरा, रविवार, पुणें २; १३६, १ रु.
३. आठवले द. त्रिं.–अन्नचर्चा, व्हीनस प्रकाशन, पुणें २; ३२१, ८ रु.
४. आपटे वा. वि.–सरगम, इनामदार बंधु प्रकाशन, पुणें २; ९४, २ रु.
५. आपटे वि. गो.–भारत भक्ति स्तोत्र, गोकुळ मासिक प्रकाशन, पुणें २; १५५, ४ रु.
६. आनंदकर पिरोज–इंद्रधनूचा पूल, किर्लोस्कर प्रेस, पुणें २; १२७, ४ रु.





७ आमडेकर उ. चिं.-आमडेकर लघुलेखन पद्धतीची गुरुकिल्ली, आमडेकर प्रकाशन, मुंबई ४; ५५, ३ रु.

८. कर्वे चिं. श्री.-चला चंद्राकडे, सुशीला गो. पाटणकर, अप्पा बळवंत चौक, पुणें २; १०३, २=८०

९. कुलकर्णी ग. मा.-कॅन्सरचें आलोकन, मुंबई विश्वविद्यालय, मुंबई; १४७, २=५०

१०. कुलकर्णी शं. अ.-प्राप्तिपत्रक मार्गदर्शिका, शं. अ. कुलकर्णी, माडीवाले कॉलनी, पुणें २; १५१, २=५०

११. केशव न.-जोशी राष्ट्रीय ग्रंथसूचि मराठी विभाग १९५८-१९५९, महाराष्ट्र सरकार, मुंबई; ५११, ६=२५

१२. केळकर ना. वा.-तुम्ही ज्योतिषी व्हा भाग ३, मनोहर ग्रंथमाला, पुणें २; १७४, ४ रु.

१३. कोगेकर ना. वा.-अणुयुगाची पहाट, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ८०, ४ रु.

१४. खरात शंकरराव-अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम, मे. जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणें २; २२६, ४ रु.

१५. खरात शंकरराव-डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचीं पत्रें, ठोकळ प्रकाशन, पुणें २; ३५६, ८ रु.

१६. खरे श्री. वा-सुबोध मार्केटिंग, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १३७, ३ रु.

१७. गद्रे उषा-काव्यक्रीडा, विद्याग्रंथ प्रकाशन, नागपूर १; १०८, १=५०

१८. गर्दे र. कृ.-स्वास्थ्यरक्षण, यशवंत प्रकाशन, पुणें २; १२०, ३=५०

१९. गाडगीळ पां. वा.-समाजवादाची वाटचाल, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; ८०, ००=५०

२०. गोखले पु. पां.-काँग्रेसपक्ष, मे. जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणें २; १००, ३ रु.

२१. गोखले शरच्चंद्र-अन्नासाठीं दाही दिशा, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १५४, ४ रु.

२२. जोशी का. अ-धार्मिक नित्यपाठ आणि सण व्रतें, आवटे ग्रंथ प्रकाशन मंदिर, पुणें २; ८०, १ रु.

२३. जोशी महादेवशास्त्री-कर्नाटक, ज्ञानराज प्रकाशन, शनिवार पुणें २, १३६, २ रु.

२४. जोशी रमाबाई-मराठी तामिळ लघु शब्दकोश, सौ. रमाबाई जोशी, ८ गोवर्धन-सिंग स्ट्रीट, मद्रास १४; १२४, ३ रु.

२५. जोशी-गोखले- दाते-शुद्धलेखन शुद्धमुद्रण शब्दकोश, दि पूना प्रेस ओनर्स असो. लि. पुणें २; २९७, १० रु.

२६. जोशी श्रीपाद-रवींद्रनाथ आणि महाराष्ट्र, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणें २; १७६, ४ रु.

२७. जोशी स. म.-सद्‌गुरुप्रसाद अर्थात जीवनरहस्य दर्शन, स. म. जोशी फलटण; ११६, २ रु.

२८. डे. एस. के.-समाजविकासाचें आंदोलन, श्रीमौनी विद्यापीठ, गारगोटी; १७७, ३=५०








२९. ढवळे रा. स.-शेती व ग्रामीण जीवनविषयक कायदे, पुणें विद्यापीठ, पुणें ७; १८३, १ रु.
३०. दलाल आर्ट स्टुडिओ-चित्रांजलि, दलाल आर्ट स्टुडिओ, मुंबई ४; १०७, ७=५०
३१. दाते शं. ग.-मराठी ग्रंथ सूचि १९३८-५०, शं. ग. दाते, ११०-८-१ सदाशिव पुणें २; ६५८, ६० रु.
३२. देव द. ग.-अष्टग्रहींचा आसूड, के. बा. जोशी, बुधवार पुणें २; ११२, २=५०
३३. देवकुळे ज. ग.-आपला व्यवसाय आपळे ग्राहक, स्मृति प्रकाशन, मुंबई २२; ११४. ३ रु.
३४. देशपांडे पु. य.-अनामिकाची चिंतनिका, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ११२, ४ रु.
३५. देशपांडे वा. ह.-घरंदाज गायकी, सु. वा. देशपांडे, मुंबई ६; १३३, ५ रु.
३६. नारगोळकर वसंत-समाज क्रांतीची प्रयोगभूमि इस्राएल, आदिवासी ग्रामसेवा संघ, कैनाड, डहाणूरोड ( ठाणें ); ६९; १=५०
३७. नित्सुरे य. गो,-कुमारांचा नवा सोबती, व्हीनस प्रकाशन, पुणें २; १६७. ३ रु.
३८. पवार-कुलकर्णी-प्रापंचिक स्मरण वही, संजय प्रकाशन, हडपसर ( पुणें ); ५२, ००=९५
३९. पशुधन-प्रसिद्धि विभाग, महाराष्ट्र सरकार, मुंबई; ५२. ००=२५
४०. पाटील-शाम-सत्तेच्या उंबरठ्यावर, सदाशिवराव बर्वे, बी. डी. किल्लेदार, महाराष्ट्र लॉज, पुणें ४४४; ००=२५
४१. पानसे र. दा.-पराश्राव्य अर्थात ऐकू न येणारे गूढध्वनि, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; २०, ००=४०
४२. वनहट्टी गो. श्री. भर्तृहरीकृत नीतिशतक, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर १, १७४, ३ रु.
४३. बर्वे स. गो.-काँग्रेसच्या उंबरठयावर, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; ४२, ००=५०
४४. बावर सरोजिनी-महाराष्ट्र लोकसाहित्य माला पुष्प ५ वें, जिल्हा शिक्षणाधिकारी पुणें १; २९६, ४ रु.
४५. वेडेकर के. ग.-श्रीमद्भर्तृहरिकृत नीतिशतक, मॉडर्न बुक डेपो, पुणें २; ५२, १=२५
४६. भागवत भा. रा.-अंतराळांत अग्निबाण, मॅजेस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४, १५०, २=५०
४७. मराठे अ. वा-श्रीदत्त भक्तिदर्शन, अ. वा. मराठे, खाडिलकर रोड, मुंबई ४, २८, ००=५०
४८. महाराष्ट्राचे जिल्हे : पुणें-प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र सरकार मुंबई; १२४, ००=४०
४९. मंत्री-पोरेडी-क्रिकेट कसे खेळावे ? रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; ८१ २ रु.
५०. मोहनी उषा-अपंगत्वार विजय, समाज प्रबोधन संस्था, पुणें २; ११६, २=६०
५१. रणपिसे वि. रा -पानशेतचें फुटलें धरण-ओढवलें पुण्याचें मरण, वि. रा. रणपिसे १८५/१ बुधवार पुणें २; ७६, ००=८०
५२. रत्नपारखी मु. गो.-श्री. तुकाराम महाराज यांनीं सांगितलेलें ब्रह्मज्ञान, मु. गो. रत्नपारखी, नांदगाव ( नाशिक ), ३२, ००=००

५३. राजकीय पक्षाची आचारसंहिता-समाज प्रबोधन संस्था, पुणें २; ९५, २ रु.

५४. रानडे भा. ल.-वेदव्याख्यानमाला प्रथम पुष्प ( संपादन ), जी. जी. वामनाचार्य, शाहुपुरी, कोल्हापूर; २२, =५०

५५ रेगे श. रा.-अष्टग्रही परिणांम व उपाय, रा. शं. जोशी, १०५ सदाशिव, पुणें २; ६२, १ रु.

५६. लाखांसाठीं दूध-प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्रसरकार, मुंबई ४८, ००=२५

५७. लेले आनंद माधव-उद्योग भारत, आनंदकार्यालय, पुणें २. १३८ २=५

५८. लोकशाही विकेंद्रीकरण समितीचा अहवाल-महाराष्ट्र सरकार, मुंबई १ ३५६, ००=००

५९. वष्ट व. ल.-तरुण दिसा खूप जगा, मॅजेस्टिक बुकस्टॉल मुंबई ४; १०३, २ रु.

६०. वष्ट व. ल.-सतरा ते सत्तावीस, -निरामय प्रकाशन, मुंबई ५७; ८६, २ रु.

६१. विवेकानंद स्वामी-राजयोग, श्रीरामकृष्ण आश्रम, नागपूर, २८२, ३ रु.

६२. शिरधनकर भानु-सागरसंग्राम, अभिनव प्रकाशन, मुंबई, १२; १०८ २=५०

६३. शेजवलकर प्र. चिं.-महाराष्ट्राचा आर्थिक विकास, व्हीनस बुकस्टॉल, पुणें २; ६०, १=१५

६४. सप्रे-कोकजे-बुद्धिबळे कशी खेळावी ?-रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ७१, २ रु.

६५. सहस्रबुद्धे व. द.-मॉडेलिंग, व्हीनस प्रकाशन, पुणें २; ४०, ४ रु.

( वरील सूचींत बालवाङ्मय वगळण्यांत आलें आहे. शालेय क्रमिक पुस्तकें व पुनर्मुद्रणेंहि वगळण्यांत आलीं आहेत. )

---

# महाराष्ट्र सरकारच्या भाषा-सल्लागार मंडळाचे कार्यवाह

## श्री. वा. ना. पंडित यांना मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष म. म. पोतदार यांचें पत्र

महोदय,

( १ ) आपलें दिनांक १८ जानेवारी १९६२ चें पत्र पावल्याची पोच आपणाला २०-१-६२ ला दिलेली आहे.

( २ ) १८-१-६२ च्या आपल्या पत्राची प्रत आपण मराठी साहित्य महामंडळाचे कार्यवाह मुंबई यांच्याकडे पाठविल्याचें लिहिलें आहे. त्यांना उचित कारवाई करण्याचा आदेश मीं दिला आहे.

( ३ ) तथापि आपणांकडे कार्यवाहाकडून आपण मागितलेला खुलासा अद्याप झालेला नसावा. तसा तो कार्यवाहाकडून आपणांकडे गेल्याचें मला कळलेलें नाही. आणि मी आता प्रथम मद्रास आणि नंतर तिरुपती येथे सर्व विद्यापीठ महामंडळाच्या बैठकीस ( इंटर युनिव्हर्सिटी बोर्ड ) जात आहे. तेथून ता. २०-२-६२ च्या सुमारास परत येईन. त्यापूर्वी मला करतां येण्याजोगा खुलासा आपणांकडे केलेला असावा म्हणून या पत्राने सर्व करीत आहे.

( ४ ) आपल्या पत्रांत आपण श्री. वाडेकर, श्री. जांभेकर प्रभृतींनी तात्त्विक व घटनात्मक जे आक्षेप घेतले आहेत त्याबद्दल साहित्य महामंडळाची भूमिका आपणांस अपेक्षित आहे, कारण त्यामुळे शासनास आपले निर्णय घेणें सुकर होईल असें आपलें म्हणणें आहे.

( ५ ) महामंडळाने जी नियमावलि शासनाकडे पोचविली आहे ती महाराष्ट्राच्या सर्व घटक विभागांतील साहित्य-संस्थांच्या प्रतिनिधींनी एकमताने स्वीकारली, अतएव प्रातिनिधिक म्हणून समजणें योग्य होईल हा आपला अभिप्राय योग्य आहे.

( ६ ) व्याकरणासारख्या विषयावर विद्वानांमध्ये मतभेद आणि चर्चा या नेहमीच चालू असतात आणि पुढेहि चालू राहतील. द्वैत आणि अद्वैत यांचीदेखील चर्चा आज शेकडो वर्षे चालू आहे. आणि या चर्चा मोटमोठ्या दिग्गज विद्वानांनी चालविल्या आहेत. त्याचप्रमाणे शिष्ट–अशिष्ट, श्लील–अश्लील अशा औचित्य विचारचर्चाहि साहित्य पंडित पूर्वी करीत होते, आजहि करीत आहेत आणि पुढेहि करीत राहतील. विद्वानांचें तें एक मुख्य लक्षण आहे. अशा चर्चांनी विद्वत्ता नेहमी जिवंत राहते. कधी कधी गुणदोष–दर्शनाने विचाराला सूक्ष्मता येते. आणि पूर्व मतांचा त्याग करून त्यांमध्ये अंशतः परिवर्तन करण्यासहि पुष्कळ विद्वान सिद्ध होतात. असा हा विद्या–विचारप्रवाह सतत वाहता राहणें हें केव्हाहि इष्टच समजलें पाहिजे.

( ७ ) परंतु जेव्हा शुद्ध-लेखनासाठी विषय नियमित करून शासनांना अंमलात आणावे लागतात त्या वेळेला सारासार विचार करून विद्वान मंडळांतील अनुकूलतेचा

झोक पाहून शासनाने असे निर्णय करावयाचे असतात. कारण यच्चयावत् सर्व विद्वानांचें सर्व बाबतींत एकमत होण्यासाठी थांबण्याचें ठरविल्यास तशी सुसंधी कधीहि लाभणार नाही.

( ८ ) एवढें सामान्य दिग्दर्शन केल्यानंतर श्री. जांभेकर प्रभृतींनी केसरी पत्रांत जे घटनात्मक आक्षेप घेतले असें आपणांस दिसून आलें आहे त्याबद्दल स्पष्टीकरण करतों—

( ९ ) महाराष्ट्र साहित्य परिषद् हीच महाराष्ट्रांत एकमेव आणि सर्वमान्य अशी साहित्य संस्था होती. तें कसें त्याचा इतिहास साहित्य परिषदेचा जो इतिहास मीं लिहिलेला परिषदेने छापला आहे तो पाहिला असतां कळून येईल. या साहित्य परिषदेचा विदर्भ, मराठवाडा, मुंबई–इतकेंच काय परंतु इंदूर, ग्वाल्हेर, हैदराबाद वगैरे दूरदूरच्या मराठी साहित्यप्रेमी मंडळींचा मनःपूर्वक पाठिंबा होता. अशीं बरींच वर्षे गेल्यानंतर विदर्भ साहित्य संघ वगैरे प्रादेशिक संघ उत्पन्न झाले. आणि त्यांनी प्रायः आपल्या प्रादेशिक विभागांत साहित्यविषयक कार्य आस्थापूर्वक आणि जोमाने वाढीस लावलें. विदर्भ, मराठवाडा, मुंबई हे मराठी विभाग शासनदृष्ट्या भिन्न शासनांखाली होते. आणि शासनें देशी भाषांना अधिकाधिक अनुकूलता दाखवूं लागल्यावर आणि ब्रिटिश सत्ता हळूहळू अस्तंगत होऊन लोकशाहीचें विकसन सुरू झाल्यावर प्रादेशिक अस्मिता वाढीस लागली. त्यामुळे साहित्य परिषदेच्या घटनेंत परिवर्तन करण्याच्या दृष्टीने मागण्या होऊं लागल्या. होतां होतां विदर्भादि प्रादेशिक साहित्य मंडळें अधिकाधिक समर्थ होत चालली. तेव्हा कांही तरी नवी योजना करून विदर्भ, मराठवाडा, मुंबई येथील वर सांगितलेल्या साहित्य संस्था आणि महाराष्ट्र साहित्य परिषद् या सर्वांना प्रादेशिक समजून सर्व मराठी लोकांचे म्हणून जेवढे साहित्यविषय असतील तेवढ्यांबद्दल विचार करून व्यवहार करणारी एक प्रातिनिधिक सोय करावी असा विचार पुढे येऊन अनेक वर्षे अनेक योजनांवर त्यांची चर्चा होऊन अखेर मिरज संमेलनांत वरील सर्व संस्थांच्या प्रातिनिधिक मंडळींनी "मराठी साहित्य महामंडळ" स्थापन करण्याची शिफारस केली आणि त्यासाठी आराखडा आखून दिला. वर सांगितलेल्या सर्व प्रादेशिक साहित्य संस्थांच्या साधारण सभांनी, पुष्कळ चर्चा करून वरील आराखड्याला आणि मराठी साहित्य महामंडळाच्या योजनेला आपली अनुमति दिली. येणेंप्रमाणे मराठी साहित्य मंडळ सर्व घटक संस्थांच्या संमतीने अस्तित्वांत आलें. यासंबंधाने जीं विवेचनें झालीं त्यामध्ये हें स्पष्ट केलें गेलें आहे की, साहित्य महामंडळ हें आपल्या कक्षेपुरतें सर्वाधिकारी आहे. त्याच्या निर्णयास घटक संस्थांच्या पुनर्मान्यतेची आवश्यकता नाही. म्हणून साहित्य महामंडळाचे एकमताने झालेले निर्णय, ते बदलले नाहीत तोंवर सर्व घटक संस्थांवर बंधनकारक राहतात. असेंहि ठरलें आहे की, साहित्य महामंडळाची स्थापना झाल्यानंतर अर्थातच वरील प्रादेशिक साहित्य संस्थांच्या पूर्वीच्या घटनांत महामंडळाच्या घटनेचा समावेश करून तदनुकूल असें परिवर्तन त्या त्या संस्थांनी करावें. त्या त्या प्रादेशिक संस्थांची स्वायत्तता कायम ठेवण्याचा निर्णयहि झालेला आहे. महामंडळाकडे फक्त अखिल महाराष्ट्राला लागू असलेल्या अशा विषयांचें क्षेत्र सोपविलेलें आहे. म्हणून महामंडळाने प्रस्तुत शुद्धलेखन प्रकरणीं केलेली नवी नियमावलि ही सर्व मराठी भाषिकांचा विषय असल्याने आणि म्हणून ती साहित्य महामंडळाच्या कक्षेंतच येणारी असल्याने महामंडळाला ती करण्याचा आणि तिचा अंमल करण्याचा आदेश

देण्याचा पूर्ण अधिकार आहे. महामंडळ ही कांही कायदे-संस्था नाही हें उघड आहे. शासनाचें स्वरूप अर्थात् भिन्न आहे. व्यवहारतः पाहतां प्रादेशिक साहित्य संस्थांचें बळ महामंडळाच्या मागे निरंतर उभें राहिलें तरच महामंडळाच्या निर्णयांना कार्यकारित्व येईल. एरवी नाही; पण महामंडळावर अनधिकारत्वाचा घटनात्मक आक्षेप घेतां येणार नाही. श्री. जांभेकरप्रभृति जीं मतें प्रकट करतात तीं गैरसमजूत व 'अज्ञान' या दोनहि दोषांनीं लिप्त आहेत. महामंडळ आर्थिकदृष्ट्या सांप्रत घटक संस्थांवरच अवलंबून आहे. त्याच्या कार्यास नुकताच प्रारंभ झाला आहे आणि त्याने प्रथमच हा शुद्धलेखनाचा सर्वव्यापी विषय हातीं घेतला आहे. महामंडळाचे आजचे सदस्य त्या त्या घटक संस्थांचे प्रतिनिधि म्हणून निवडून पाठविलेले आहेत. हे प्रतिनिधि त्या त्या घटक संस्थांनी कसे निवडावे हें त्या त्या संस्थांच्या अधीन आहे. आज जे निवडलेले आहेत ते संपूर्णपणें कायदेशीर प्रतिनिधि आहेत. तेव्हा जांभेकरप्रभृतींचे आक्षेप माह्य करतां येणार नाहीत आणि महामंडळहि ते कधींहि माह्य करणार नाही. हें महामंडळाचा अध्यक्ष म्हणून मी आपणाकडे निःशंकपणें कळवूं शकतों.

(१०) तात्त्विक आक्षेपांबद्दल आपणाला निश्चित काय विचारावयाचें तें लक्षांत आलें नाही. आपला अभिप्राय असा असावा की, महामंडळाने केलेले शुद्धलेखनविषयक नियम ज्या तत्त्वांचा विचार करून तयार केले आहेत त्या तत्त्वांबद्दलचे आक्षेप, म्हणजेच तात्त्विक आक्षेप. म्हणून श्री. जांभेकरप्रभृति सहीकार यांनीं ३० जानेवारी १९६२ आणि २ फेब्रुवारी १९६२ च्या केसरीच्या अंकातून जें प्रकटन केलें आहे त्याबद्दल कांही विचार येथे सादर करतों. ते माझे वैयक्तिक विचार आहेत असें आपण समजावें.

( अ ) हें जांभेकरी पत्रक मला तरी अत्यंत तर्कदुष्ट वाटतें आणि यावरील सहीकार यांनी बहुधा अबुद्धपणेंच यावर सह्या केल्या असाव्या. एवढें मान्य करतां येईल की, साहित्य महामंडळाची शुद्धलेखनाची नियमावलि स्थूलमानाने सहीकारांना पसंत नाही. एवढ्याच अर्थाने ते सहीकार होण्याला प्रवृत्त झाले असावेत.

( आ ) जांभेकरी निवेदनाचा असाहि रोख दिसतो की, अल्पाक्षर बहुजन समाजाच्या सोयीसाठी महामंडळाने घाईने आपली नियमावलि बनविली. तर जांभेकरांच्याच निवेदनांत जे निर्देश आले आहेत त्यांचा विचार केला असतां या आक्षेपाचें समर्थन होणार नाही. कारण "शुद्धलेखन महामंडळ" या नांवाने जी एक विद्वानांची प्रातिनिधिक सभा दिनांक २–११–१९५८ रोजीं साहित्य परिषदेच्या जागेत माझ्या अध्यक्षतेखाली भरली होती, तेथेच त्यापूर्वी म. साहित्य परिषदेने तयार केलेली व जी जांभेकरांच्या शब्दांत "विद्वन्मान्य" व "रूढ होण्याच्या मार्गास" लागली होती त्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शुद्धलेखन नियमावलींत परिवर्तन करावें म्हणून परिवर्तनवादी मंडळीनी जो आराखडा छापून सभेपुढे मांडला होता त्याचा विचार व्हावयाचा होता. तीं सर्व पत्रकें व तो सर्व इतिहास महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अंकातून पाहावयास मिळेल. परिवर्तनवादी मंडळींच्या पत्रकांत अपेक्षिलेले बदल हे आज साहित्य महामंडळाने केलेल्या नियमावलीच्या दिशेनेच उचललेलें पाऊल होतें. मुद्दा इतकाच की, आज साहित्य महामंडळाने एकाएकी परिवर्तनाचा विषय हातीं घेतला असें नाही, तर त्या दिशेने परिवर्तन व्हावें असे प्रयत्न महामंडळ स्थापन होण्याच्या पूर्वीपासून चालू होते.

(इ) केसरी पत्रकांत शुद्धलेखन (९-११-५८) महामंडळाच्या बैठकींत १९३० चे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे शुद्धलेखन नियम " ⅔ बहुमताने पुन्हः कायम केले" असें केलेलें विधान सपशेल चूक आहे. वस्तुस्थिति अशी आहे आणि ती त्या सभेचा अध्यक्ष म्हणून मी सांगूं शकतों कीं, परिवर्तनवादी मंडळीच्या पत्रकांतील सूचनांना ⅔ बहुमत मिळालें तरच बदल मान्य करावा. असा ठराव त्या सभेंत प्रथम झाला आणि हें बहुमत परिवर्तनवादि पत्रकाला लाभलें नाहीं. अर्थात् अध्यक्ष म्हणून मीं असें लिहून दिलें कीं, १९३० चे नियम अपेक्षित बहुमताने बदलले नाहींत तोंवर ते कायम समजणें अपरिहार्य आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, १९३० चे नियम पुन्हा ⅔ बहुमताने कायम झाले. जांभेकरप्रभृति सहीकारांनी यथार्थ कथन केलें नाहीं. परिवर्तनवादी मंडळाचे प्रयत्न पूर्वीपासूनच चालू होते. मराठी भाषेवर संकटें ओढवून उलथापालथ आणि भयंकर बदल घडवून आणण्याची इच्छा ९-११-५८ नंतरच्या दोन वर्षांतच उद्भवली असें नाहीं. सहीकारांचें पत्रक तसा आभास निर्माण करीत आहे तो असत्य आहे.

(उ) शासनाने भाषा सल्लागार मंडळाची स्थापना केली. या मंडळाने शुद्धलेखनाचे नियम बनविले आणि याच सुमारास सहीकारांनी म्हटल्याप्रमाणे मराठी साहित्य महामंडळाचे प्रतिनिधि नियुक्त होऊन तें महामंडळ स्थापन झालें. त्याच्या पुढील कार्याची मांडणी सुरू होती. मराठी शुद्धलेखनाचा प्रश्न हाच प्रथम महामंडळाला हातीं घ्यावा लागणार हें महामंडळाच्या सदस्यांना कळून चुकलें होतें. इतक्यांत शासकीय भाषा-सल्लागार मंडळाच्या शुद्धलेखन नियमावलीचा विचार करण्याचा प्रसंग उद्भवला. या कामीं अर्थातच महामंडळाला विचारासाठी मुदतीची सवड आवश्यक होती. तेव्हा कांही प्रसंगाने मुख्य मंत्र्यांची आणि माझी भेट झाली असतां मुदतीची विनंती मीं मुख्य मंत्र्यांच्या कानीं घातली; आणि चार महिन्यांची मुदत शासनाने संमत केली. त्यास अनुसरून २ ऑक्टोबर १९६१ च्या महामंडळाच्या बैठकींत जी नियमावलि एकमताने संमत करण्यांत आली ती महामंडळाने शासनाकडे पाठविली. मी मुख्य मंत्र्यांना "चार घटक संस्थांच्या वतीने शासनांत इष्ट असलेले नियम सिद्ध करून देण्याचें पत्करलें" असें केसरी सहीकार म्हणतात. त्यांतील शासनांत या शब्दाला विशेष अर्थबोधकता नाही. "चार घटक संस्थांच्या वतीने" हे शब्द माझे नाहीत. मीं मुख्य मंत्र्यांसमोर उच्चारलेले नाहीत. मीं फक्त महामंडळाला वेळ मिळावा एवढाच उल्लेख केला. कारण महामंडळच या कामीं अधिकृत असल्याने घटक संस्थांचा पृथक् उल्लेख करण्याचें मला कांहीच प्रयोजन नव्हतें. घटक संस्थांच्या सभासदांची "रीतसर संमति" महामंडळाने घेतली नाही असा आक्षेप सहीकारांच्या पत्रकांत पुढे आहे. तेव्हा त्या आक्षेपाला एक काल्पनिक बैठक उपस्थित करण्यासाठी "चार घटक संस्थांच्या वतीने" अशी फसवी शब्दयोजना सहीकार पत्रकांत पत्रक-लेखकाने घातलेली आहे. साहित्य महामंडळ हें चार संस्थांच्या वतीनेच काम करतें, आणि करणार. तेव्हा त्यांचा पृथक् निर्देश करण्याचें मला प्रयोजन नव्हतें. तशी आवश्यकताहि नव्हती. घटक संस्थांच्या वतीने जर महामंडळ बोलण्यास अधिकारी होतें तर घटक संस्थांच्या पुनःसंमतीकरिता विषय ठेवण्याची आवश्यकता उपस्थित होत नाही आणि चार घटक संस्थांची संमति, शुद्धलेखन नियमावली-सारख्या जटिल प्रश्नावर चार महिन्यांत किंवा थोडया मुदतींत सिद्ध करून देण्याचें बंधन पत्करण्याइतका मी या कामांत अनभिज्ञ नव्हतों.

( ऋ ) साहित्य महामंडळ हें यद्यपि सर्वाधिकारी आहे, तरी त्याला कोणा इतरांच्या सल्ल्याची कधीच अपेक्षा किंवा गरज पडणार नाही आणि तसें साहाय्य महामंडळ घेणार नाही असें समजणें चूक आहे. आणि याच कारणासाठी महामंडळाला सर्वसंमत झालेली नियमावलि शासनाकडे पक्की करून धाडण्यापूर्वी कांही तज्ज्ञांचा सल्ला घेण्याचा निर्णय २ सप्टेंबर १९६१ च्या औरंगाबादच्या बैठकींत महामंडळाने घेतला, हें उघड आहे. आणि हा सल्ला मिळाल्यावर एकवार सर्वसंमत केलेली आपली नियमावलि २ ऑक्टोबर १९६१ च्या बैठकींत अधिक विचार करून व परिपूर्णता आणून एकमताने संमत केली आणि मग शासनाला सादर केली.

( ऌ ) महामंडळ संमत करील त्या नियमावलीला पुढील आशयाची टीप जोडावी अशी लेखी सूचना मीं औरंगाबादेस पाठविली होती. टीप अशी :—" शास्त्रपूत मराठी लेखन दंडाई मानूं नये. " ही टीप सुचविण्याचीं अनेक कारणें होतीं. उदाहरणार्थ, स्पर्धा, परीक्षा, पारितोषिक वगैरेंचा विचार करतांना केवळ महामंडळाच्या नवीन स्वीकृत नियमां-प्रमाणे लेखन नाही एवढ्या मुद्द्यावर होणारा अन्याय होऊं नये. पुढे २ ऑक्टोबर १९६१ च्या सभेंत मी जातीने हजर होतों. त्या वेळीं ती टीप जोडण्याचा माझा मुद्दा पुन्हा मी सदस्यांपुढे ठेवला. त्यावर बरीच चर्चा झाली. विदर्भ साहित्य संघाच्या विचारांतहि अशा प्रकारची सोय असल्याचें डॉ. पेंडसे यांच्या लेखांतील विधान हेंहि मीं सभेच्या नजरेस आणून दिलें. टीप जोडावी किंवा न जोडावी किंवा एखाद्या प्रास्ताविक निवेदनांत त्याचा निष्कर्ष नमूद करावा इत्यादि दृष्टिकोन सभासदांच्या चर्चेत पुढे आले. " शास्त्रपूत " शब्दाविषयीहि कांहीं भवति न भवति झाली. एका सभासदाने आपल्या नियमावलीला ही टीप कदाचित् बाध आणील अशीहि शंका प्रदर्शित केली. अखेर या टीपेंतील मुद्द्याला कोठे तरी योग्य स्थान द्यावें अशा प्रकारचा कल सभेंत दिसून आला. ही टीप मताला घालून अधिकृत निर्णय मीं मागितला नाही आणि सभेनेहि केला नाही; एवढ्याच अर्थाने तिला अनधिकृत म्हणतां येईल. आणि तेवढ्याच अर्थाने एका मुलाखतींत आमचे कार्यवाह श्री. नवरे यांनी तसा शब्दप्रयोग केला असावा. पण टीपेंतील अभिप्रायाला कोठे तरी स्थान मिळावें असा महामंडळांतील सदस्यांचा सूर निघाला एवढें मला म्हणतां येईल. एवढ्या अर्थाने अधिकृत किंवा अनधिकृत असें पूर्णतया ठरवितां येणार नाही. या बाबीचा प्रपंच एरवीं करण्याचें कांही कारण नव्हतें. कारण ही टीप सुचविण्याची गोष्ट नियमावलीचें स्पष्टी-करण पत्रकार परिषदेंत अध्यक्ष म्हणून करतांना घडली. कांही पत्रकारांनी नियम प्रसिद्ध करतांना ही टीपहि प्रसिद्ध केली. म्हणून त्यावर पुढील प्रपंच झाले. बाकी कांहीं नाही.

( ए ) केसरी पत्रकांतील तर्कदुष्टता पुढील विधानांचा मेळ घालूं गेले असतां आपोआपच चिकित्सक वाचकांना कळून येईल.

( १ ) महाराष्ट्र साहित्य परिषद् प्रणीत शुद्धलेखन ( १९३० सालचें महाराष्ट्र साहित्य परिषद् प्रणीत शुद्धलेखन ) तेव्हां " विद्वान् मान्य " व बऱ्याच " रूढ होण्याच्या मार्गास लागले होते " या सहीकारांच्या विधानापुढे पुढील विधान वाचावें.

( २ ) " बहुजन समाज रूढीप्रिय असतो याचें ठळक उदाहरण म्हणजे परिषद् प्रणीत शुद्धलेखनांतून बरेच जुने रूढ अनुस्वार कमी केले असले तरी अद्याप बहुसंख्य लेखक, वृत्तपत्रें, नियतकालिकें व छापखाने २५ वर्षांनंतरहि जुन्या दादोकृत शुद्धलेखनाच

प्राय: चिकटून आहेत. " यावर प्रश्न असा की ३० सालीं जे नियम केले ते सहीकार विद्वानांना मान्य आणि तरीहि दादोकृत शुद्धता बहुजन समाजाला मान्य! अन्यत्र या बहुजन समाजाला अल्पाक्षर इत्यादि ढेलापागोटें सहीकार पत्रकांत आहे. म्हणजे बहुजन समाज दादोकृत शुद्धतेला चिकटून राहतो आणि याच बहुजन-समाजाच्या प्रेमासाठी, महामंडळ दादोकृत आणि ३० सालचें शुद्धलेखन उखडून टाकण्याला आणि उलथापालथीला प्रवृत्त झाले आहेत अशी तक्रार सहीकार करतात.

अधिक प्रपंच या पत्रांत मीं करीत नाही. सहीकार पत्रकांतील असंतोषाचा भाग वगळला तर इतर आक्षेपांना किती मातवरी प्राप्त होते तें शासनाला समजून येईल अशी मला आशा आहे.

कळावे लो. अ. हे वि.
११–२–१९६२

आपला
—— द. वा. पोतदार

महाराष्ट्र साहित्य परिषद्

# घटना-दुरुस्ती मसुदा

[ टीप—मराठी साहित्य महामंडळाची स्थापना झाल्यानंतर महाराष्ट्र साहित्य परिषद् ही त्या महामंडळाची एक घटक संस्था झाली आहे. त्या अनुरोधाने म. सा. परिषदेच्या घटनेंत दुरुस्त्या करणें क्रमप्राप्त झालें आहे. म. सा. परिषदेच्या कार्यकारी-मंडळाने दि. ८–१–१९६१ रोजीं (१) म. म. द. वा. पोतदार (२) श्री. श्री. शं. नवरे, (३) श्री. वि. त्र्यं. शेटे व (४) श्री. चंद्रकुमार डांगे यांची एक समिति नेमून त्यांनी यासंबंधीं विचार करून दुरुस्त्या सुचवाव्यात असा ठराव केला. त्याप्रमाणे या समितीने घटनेस दुरुस्त्या सुचविल्या. त्या नियामक मंडळाच्या सभासदांकडे विचारार्थ पाठविल्या व त्यांच्याकडून याबाबत ३१ मार्च १९६२ पर्यंत सूचना मागविल्या होत्या. आलेल्या सूचनांचा विचार करून कार्यकारी मंडळाने दि. १५–४–१९६२ रोजीं भरलेल्या आपल्या सभेंत म. सा. परिषदेच्या सध्याच्या घटनेंत पुढीलप्रमाणे दुरुस्त्या सुचविल्या आहेत. म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा दि. १० जून १९६२ रोजीं भरणार आहे. त्या वेळीं खाली नमूद केलेल्या घटना-दुरुस्त्या मंजुरीकरता मांडण्यांत येणार आहेत. तरी ज्या कोणा सभासदास याबाबत आपल्या कांही सूचना करावयाच्या असतील त्या त्याने म. सा. परिषदेच्या कार्यालयांत पुणें येथे दि. ३१ मे १९६२ पर्यंत पोचतील अशा बेताने पाठवाव्यात.

सध्या अंमलांत असलेल्या घटनेच्या ज्या नियमांत दुरुस्त्या सुचविल्या आहेत तेवढ्याच नियमांचा उल्लेख खाली केला आहे. दुरुस्त्या अवतरणांकित वाक्याने निर्दिष्ट केल्या आहेत. मुख्य दुरुस्त्या नियामक मंडळावर निवडावयाच्या सभासदांच्या प्रादेशिक गटासंबंधी व वर्गणी वाढीसंबंधी आहेत. बाकीचे नियम पूर्वीप्रमाणेच राहणार आहेत.

— वि. त्र्यं. शेटे, चिटणीस म. सा. प. ]

(३) साधनें :—

(अ) "परिषदेच्या क्षेत्रसीमेंत मराठी साहित्य संमेलनें आवश्यकतेप्रमाणे भरविणें व भरविण्यास प्रोत्साहन देणें"

(आ) "ठिकठिकाणीं परिषदेच्या शाखासभांची योजना करणें व पृथक्पणें साहित्य-कार्य करणाऱ्या साहित्य संस्था संलग्न करणें" 'व सहकारी म्हणून जोडून घेणें' हे शब्द गाळावेत.

(उ) "ज्ञानाचीं सर्व साधनें मराठी वाचकांना सुलभ करून देण्याकरिता वर्गा, उत्सव व प्रदर्शन आदि प्रसंग घडवून आणणें, मासिकें व नियतकालिकें चालविणें; ग्रंथालय चालविणें, संशोधनाचीं कामें चालविणें व अन्यत्र चाललेल्या संशोधनकार्यास प्रोत्साहन देणें व साहाय्य करणें."

( ए ) " प्राचीन व अर्वाचीन मराठींतील तसेंच अन्य भाषांतील नामवंत ग्रंथकार यांचीं चरित्रें छापून प्रसिद्ध करणें व त्यांच्या साहित्याची माहिती मराठी वाचकांस उपलब्ध करून देणें "

( ऐ ) " मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी जरूर ती उपाययोजना करणें." सदरील 'ऐ' नियमांतील दुसरें वाक्य गाळून टाकणें. त्याऐवजी पुढील वाक्य घालावें " खेडोपाडीच्या समाजांत मराठी साहित्याविषयी अधिक प्रीति, आस्था व जागृति उत्पन्न करणें."

( ओ ) " मराठी साहित्य महामंडळाने केलेले ठराव अंमलांत आणणें. "

( ५ ) कार्यालय :—

या नियमांतील 'कचेरी' शब्द गाळून तेथे 'कार्यालय' हा शब्द घालावा. तसेंच " परिषदेचें चालू काम व चालतें दप्तर......" येथपासून तों " चालू कचेरीचें स्थलांतर होणार नाही " येथपर्यंतचें वाक्य गाळावें.

( ६ ) सभासदवर्ग :—

( ५ ) तहहयात सभासद —" परिषदेस रु. ७५ किंवा अधिक देणारे "

( ६ ) साधारण सभासद—"वार्षिक वर्गणी रु. ४ किंवा अधिक रुपये देणारे"

( ९ ) सध्याच्या नियमापुढे पुढील वाक्य अधिक घालणें " ज्या सभासदाकडे एक वर्षाची वर्गणी बाकी थकली असेल त्यास परिषदेची पत्रिका मिळणार नाही. मात्र त्याने सदरील बाकी दिल्यास त्यास मागील सालचे अंक शिल्लक असल्यास मिळतील."

(११) नियामक मंडळ :—

(आ) प्रादेशिक सभासद—प्रादेशिक ऐवजी 'निर्वाचित' असा शब्द घालावा. जिल्ह्यांची व गटांची रचना पुढीलप्रमाणे राहील.

( १ ) पुणें, ( २ ) सातारा, ( ३ ) सांगली, ( ४ ) कोल्हापूर, ( ५ ) सोलापूर, ( ६ ) अहमदनगर, ( ७ ) धुळें, ( ८ ) जळगाव, ( ९ ) कुलाबा, (१०) रत्नागिरी, (११) नाशिक, (१२) ठाणें, (१३) बेळगाव-कारवार, (१४) गोवें, (१५) उर्वरित भागांतील आजीव सभासद गट.

कार्यकारी मंडळाची रचना :—

( ई ) " परंतु पदाधिकारी व नियामक मंडळाचा सभासद या दोन जागांस उभे राहण्यास हरकत नाही. " याऐवजी " तसेंच पदाधिकारी व नियामक मंडळाचा सभासद या दोन जागांसहि उभें राहतां येणार नाही " असे शब्द घालावेत.

(१५) 'संपादक मंडळ' असा मथळा या नियमाच्या प्रारंभीं द्यावा. " परिषदेच्या चिटणीसांपैकी एक चिटणीस संपादक मंडळाचा पदसिद्ध सभासद राहील " अशी दुरुस्ती सध्याच्या नियमांत करावी.

(२०) ( आ ) " परिषदेच्या धोरणासंबंधी वा घटनादुरुस्तीसंबंधी कोणास काही ठराव वार्षिक सभेपुढे मांडण्यासाठी म्हणून पाठवावयाचे असल्यास ते त्याने ३१ मार्चपूर्वी कार्यालयांत लेखी पाठवावेत."

(२१) सभेची सूचना— " परिषदेच्या वार्षिक सभेची सूचना सभासदांकडे निदान पंधरा दिवस आधी चिटणसांनी पाठवावी."

(२९) कार्यकारी मंडळाचीं कामें—पूर्वींचीं सर्व कायम ठेवून पुढील अधिक कामें समाविष्ट करावींत— " ग्रंथालय चालविणें, चिटणिसांची निवड करणें, स्वीकृत सभासद करून घेणें, महामंडळाचे ठराव अंमलांत आणणें, महामंडळाच्या घटनेंत दुरुस्ती सुचविणें व महामंडळाने स्वतःच्या घटनेंत सुचविलेल्या दुरुस्त्यांना मान्यता देणें, महामंडळावर तीन प्रतिनिधि निवडून पाठविणें, निरनिराळ्या साहित्यिक व सांस्कृतिक परिषदांतून प्रतिनिधित्व करणें."

( ३७ ) कायम निधीची व्यवस्था :—पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणे कायम निधीची गुंतवणूक विश्वस्तांनी करावी. चालू खर्चासाठीचें द्रव्य चांगल्या सुस्थित अशा शेडयूल्ड बँकेंत ठेवावें. " हे शब्द अधिक घालावे.

(३८) विश्वस्त रद्द करणें— " परिषदेने अविश्वासदर्शक ठराव पास केल्यास " याऐवजीं " म. सा. परिषदेच्या साधारणसभेच्या कार्यक्रमपत्रिकेवर एतद्विषयक ठराव मांडून व त्यासंबंधीचें विश्वस्तांचें म्हणणें त्यांना आगाऊ पूर्व सूचना देऊन तें ऐकून घेऊन उपस्थित सभासदांच्या $\frac{2}{3}$ मताधिक्याने अविश्वासदर्शक ठराव पास झाल्यास" असे शब्द घालावेत.

(३९) ठराव बंधन :— पूर्वींच्या शब्दांत "पब्लिक ट्रस्ट ॲक्ट" असे आणखी शब्द घालावेत.

( ४१ ) बँक खातें व हिशेब—" चांगल्या शेडयूल्ड बँकेंत असे शब्द घालावेत.

( ४४ ) संलग्न व सहकारी संस्थांना मान्यता—यांतील 'सहकारी संस्था' हे शब्द गाळावेत.

( ५१ ) घटनादुरुस्ती— या नियमांत 'घटनादुरुस्ती कार्यकारी मंडळ व नियामक मंडळ यांच्यापुढे प्रथम विचारार्थ घेऊन मग ती वार्षिक साधारण सभेपुढे यावी' असे शब्द घालावेत.

( ५५ ) सभासदत्व रद्द करणें—पूर्वींचा कायम ठेवून फक्त 'त्या त्या समितीने तो रद्द केल्यावर मग त्याचें सभासदत्व रद्द होईल' असे शब्द घालावेत.

---

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य-परिषद्, पुणें

# १९६१-६२ चें इतिवृत्त

**सभासद-संख्या**—वर्षअखेर सभासदसंख्या एकूण १४८१ आहे. त्यांपैकी साधारण ९७०, तहहयात ४७३, हितचिंतक २३, सहायक ८, आश्रयदाते ५ व उपकर्ते २ अशी वर्गवारी आहे. गतवर्षी साधारण ८०५, तहहयात ४५६, हितचिंतक २३, सहायक ९, आश्रतदाते ५ व उपकर्ते २ अशी एकूण १३०० संख्या होती. समाधानाची गोष्ट अशी की, चालू वर्षी साधारण १६५ व तहहयात १६ अशी एकूण १८१ नी सभासदसंख्या वाढली आहे. चालू वर्षी ६७ सभासदांची दोन वर्षांची व ६४ सभासदांची एक वर्षाची वर्गणी येणें आहे. वर्गणी पाठविण्यासंबंधी 'पत्रिकें'तून विनंती केली होती व स्वतंत्ररीत्या स्मरणपत्रेंहि पाठविलीं होतीं.

**आर्थिक स्थिति**—सोबत जमाखर्च व ताळेबंदपत्रकें आहेत. त्यावरून परिषदेच्या आर्थिक स्थितीची सभासदांना कल्पना येईल.

**कै. केतकर स्मृतिदिन व स्मारक**—ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनीं ( १० एप्रिल १९६१ ) सकाळीं कै. केतकर यांच्या मुठा नदीवरील समाधीला पुष्पांजलि वाहण्यांत आली व सायंकाळीं प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे यांचें ' डॉ. केतकर आणि सामाजिक सुधारणा ' या विषयावर कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झालें.

दि. १२ जुलै १९६२ च्या महापुरामुळे कै. केतकर यांची समाधि जवळ जवळ वाहून जाण्याच्या स्थितींत आली होती. त्यामुळे दि. १ ऑगस्टला पुणें महानगरपालिकेच्या परवानगीने प्रा. दि. के. बेडेकर प्रभृतींनी समाधीचें उत्खनन करवून कै. केतकरांच्या अस्थि म. सा. परिषदेच्या इमारतींत आणून सुरक्षित ठेवल्या. श्री. शीलवतीबाई केतकर यांनी या कार्याबद्दल पत्र लिहून समाधान व्यक्त केलें. सांप्रत या अस्थि एका लाकडी सुबक पेटींत परिषदेंत ठेवलेल्या आहेत. कै. केतकरांच्या स्मारकाची संभाजी पुलानजीकची कुंपण घातलेली जागा शीलवतीबाईंना नापसंत होती. १२ जुलैच्या पुरांत या जागेचें लोखंडी कुंपणहि वाहून नष्ट झालें. अशा स्थितींत परिषदेने महापालिकेकडे डॉ. केतकरांच्या स्मारकासाठी नवी सोईस्कर जागा मागितली. आनंदाची गोष्ट म्हणजे लवकरच कमला नेहरू पार्कमध्ये नवी जागा मिळून कै. केतकरांच्या स्मारकाची कल्पना मूर्त स्वरूपांत येईल असें वाटतें.

**स्मृतिदिन**—माजी संमेलनाध्यक्ष व परिषदेचे एक आश्रयदाते आणि परिषदेच्या इमारतीखालील वास्तु नाममात्र भाड्याने देणारे कै. भवानराव तथा बाळासाहेब पंतप्रतिनिधि ( औंध संस्थानचे अधिपति ) यांची पुण्यतिथि १३ एप्रिल १९६१ रोजीं साजरी करण्यांत आली. या प्रसंगीं डॉ. के. ना. वाटवे यांच्या हस्तें औंधकरांच्या छायाचित्राला पुष्पहार अर्पण करण्यांत येऊन उपस्थितांच्या समवेत त्यांचें स्मरण करण्यांत आलें.

दि. २९ नोव्हेंबरला कै. माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त श्री. गुणवंत हनुमंत देशपांडे यांचें व्याख्यान योजिलें होतें. पण दुर्दैवाने प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ते येऊं न शकल्याने, प्रा. रा. श्री. जोग यांचें व्याख्यान झालें. रात्रीं १० वाजतां स्थानिक व परस्थ कवींचें मुशाहिरा स्वरूपाचें काव्यगायन झालें. या कार्यक्रमांत यवतमाळचे वकील श्री. वा. वा. पाटणकर व पुण्याचे श्री. सिद्दीकी व सौ. फरहत सिद्दीकी या कविदंपतीने भाग घेतला. श्री. पाटणकर यांच्या 'मराठी शायरी' या पुस्तकाचें प्रकाशनहि प्रा. क्षीरसागर यांच्या हस्तें या वेळीं करण्यांत आलें.

कै. राम गणेश गडकरी यांच्या स्मृतिदिनानिमित्त २५ जानेवारीला फर्ग्युसन कॉलेज-मधील मराठीचे प्रध्यापक श्री. मधुकर सातारकर यांचें 'गडकरी नाटयवाङ्मयांतील वादस्थळें' या विषयावर व्याख्यान झालें.

**ख्रिस्तवासी टिळक यांची जन्मशताब्दी**—ख्रिस्तवासी कविवर्य रेव्हरंड ना. वा. टिळक यांची जन्मशताब्दी परिषदेतर्फे दि. ९ डिसेंबरला साजरी करण्यांत आली. श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सभेंत प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. रत्नाकर हरि केळकर, श्री. वसंत लोखंडे, श्री. मनमोहन नातू यांनी भाषणें करून रेव्हरंड टिळकांना आदरांजलि वाहिली. श्री. बबनराव नावडीकर, सौ. उषा शेजवलकर व कवि मायदेव यांनी टिळकांच्या निवडक कविता गाऊन दाखविल्या. या दिवशीं सकाळीं रे. टिळकांचे चिरंजीव श्री. दे. ना. टिळक यांनी परिषदेस भेट दिली.

**सौ. कुसुमावती देशपांडे–दुखवटा सभा**–ग्वाल्हेर येथे ऑक्टोबरमध्ये भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्ष सौ. कुसुमावती देशपांडे यांचा सत्कार ३० सप्टेंबरला म. म. प्रा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली करण्यांत आला होता, व या प्रसंगीं प्रा. क्षीरसागर, प्रा. जोग व सौ. शांताबाई किर्लोस्कर यांनी भाषणें करून त्यांचा यथार्थ गौरव केला होता. ऑक्टोबर अखेरीस संमेलन आटोपलें आणि त्यानंतर १७ नोव्हेंबरला सौ. कुसुमावतींच्या अकल्पित निधनाची दुःखद वार्ता सर्वांना ऐकावी लागली. परिषदेच्या कार्यकर्त्यांना या घटनेमुळे अतिशय दुःख होणें स्वाभाविक होतें. त्यांच्या निधनामुळे परिषदेचें कार्यालय एक दिवस बंद ठेवण्यांत आलें होतें. दि. २५ नोव्हेंबरला श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षते-खाली दुखवटासभा भरली होती. या वेळीं प्रा. रा. श्री. जोग, प्रा. श्री. के. क्षीरसागर, डॉ. सौ. उषा पोतदार, श्री. चं. प. भिशीकर, प्रा. भ. श्री. पंडित, श्री. इनामदार यांनी भाषणें करून सौ. कुसुमावतींना श्रद्धांजलि वाहिली. सभेने संमत केलेला दुखवटा-ठराव श्री. आ. रा. देशपांडे (अनिल) यांच्याकडे पाठविण्यांत आला.

**कै. गोविंदराव टेंबे स्मारक व्याख्यानें**–कै. गोविंदराव टेंबे यांच्या स्मरणार्थ त्यांच्या चिरंजीवांनी परिषदेला प्रतिवर्षी देऊं केलेल्या देणगींतून गतवर्षीपासून 'कै. गोविंदराव टेंबे स्मारक व्याख्यानमाला' सुरू करण्यांत आली आहे. यंदा ही माला प्रा. ना. सी. फडके यांनी १७ जून ते १९ जूनपर्यंत तीन दिवस गुंफली. प्रा. फडके यांच्या व्याख्यानांचे विषय असे होते : १. मला समजलेले गोविंदराव टेंबे, २. चार नाटककार–चार शक्ति : एक तुलनात्मक अभ्यास, ३. नाट्य आणि संगीत. तिन्ही व्याख्यानांना पुण्यांतील रसिक व विद्वान् श्रोत्यांची गर्दी लोटली होती. चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांनी शेवटच्या दिवशीं आभार मानले (प्रस्तुत व्याख्यानांतील महत्त्वाचा भाग 'पत्रिका' अंक १३७ मध्ये प्रसिद्ध करण्यांत आला आहे.)

**मुख्य मंत्र्यांची भेट व 'मराठी ग्रंथसूची 'चें प्रकाशन**—महाराष्ट्र राज्याचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी सोमवार दि. ३ जुलैला परिषदेस भेट दिली. या भेटीच्या निमित्ताने श्री. शं. ग. दाते यांच्या 'मराठी ग्रंथसूचि' ( १९३७ ते १९५० ) या ग्रंथाचें प्रकाशनहि श्री. चव्हाण यांच्या हस्तें करण्यांत आलें. कार्याध्यक्ष प्रा. क्षीरसागर व अध्यक्ष प्रा. जोग यांनी आरंभीं मुख्य मंत्र्यांचें स्वागत केलें. कुलगुरु म. म. पोतदार व प्रा. गं. बा. सरदार यांनी भाषणें करून श्री. दाते यांच्या सूचिकार्याचा गौरव केला. सूचीचें प्रकाशन व श्री. दाते यांचें भाषण झाल्यावर चिटणीस श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी आभार मानले व समारंभ संपला.

**सत्कार**—प्रा. ना. सी. फडके यांना भारतसरकारतर्फे पद्मभूषण ही पदवी मिळाल्याबद्दल परिषदेतर्फे दि. ३० जानेवारीला त्यांचा प्रकट सत्कार करण्यांत आला. या प्रसंगीं प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. मा. का. देशपांडे, प्रा. चंद्रकुमार डांगे, प्रा. सरोजिनी कुळकर्णी व श्री. मो. रा. वाळंबे यांचीं भाषणें झालीं.

नागपूर येथे भरलेल्या मराठी नाट्य-परिषदेच्या संमेलनाचे अध्यक्ष श्री. शंकर नीळकंठ तथा नानासाहेब चाफेकर यांचा १५ मार्चला परिषदेने सत्कार केला. या वेळीं श्री. वि. द. घाटे व श्री. तळवलकर यांनी श्री. चाफेकरांच्या कार्याचा गौरव केला.

**भेटीगांठी**--चालू वर्षी पुढील व्यक्तींच्या भेटीचा परिषदेस लाभ झाला. सांगलीचे कवि काव्यविहारी, वि. सा. संघाचे माजी अध्यक्ष व दै. 'महाराष्ट्र' चे संपादक श्री. पु. दि. दवळे ( २-८-१९६१ ) वंग साहित्याचे एक अभ्यासक प्रो. शिवनारायण रे, मुंबई ( ९-९-६१ ), पुणें आकाशवाणीचे उपसंचालक श्री. कृ. द. दीक्षित ( १५-९-६१ ), श्री. आ. रा. देशपांडे ऊर्फ कवि अनिल ( १८–९–६१ ) या सर्वांच्या भेटीच्या प्रसंगीं परिषदेचे पदाधिकारी व इतर कांही निमंत्रित मंडळी उपस्थित होती. परिषदेतर्फे पाहुण्यांचा सत्कारहि करण्यांत आला.

**संशोधन व प्रकाशनें**--परिषदेतर्फे यंदा दोन श्रेष्ठ प्रतीचीं पुस्तकें प्रकाशित करण्यांत आलीं आहेत. परिषदेच्या संशोधन विभागातर्फे प्रा. डॉ. वा. दा. गोखले हे गेलीं दोन वर्षे अपरिचितसुत काशीकृत 'द्रौपदीस्वयंवरा' वर अभ्यास करीत होते. त्यांनी संपादित केलेलें हें काव्य सन १६६१ मध्ये लिहिलेलें आहे. निरनिराळ्या वृत्तांत रचलेलें हें काव्य अभ्यसनीय आहे. 'द्रौपदीस्वयंवर' नुकतेंच प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. डॉ. गोखले यांचें अनुभवामृतावर संशोधन चालू आहे. १९५० सालीं परिषदेने प्रा. गं. बा. सरदार यांचें 'संतवाङ्मयाची फलश्रुति' हें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. गेलीं तीनचार वर्षे हें पुस्तक दुर्मिळ झालें होतें. परिषदेने या पुस्तकाची द्वितीयावृत्ति फेब्रुवारी १९६२ मध्ये प्रसिद्ध केली आहे. या आवृत्तींत 'जैन आणि महानुभाव' आणि 'भक्तिपंथ व महाराष्ट्र संस्कृति' या दोन नव्या लेखांची भर घालण्यांत आली आहे.

**परिभाषा मंडळ**—डायरेक्टर ऑफ ॲनिमल हस्बंड्री यांच्या विनंतीपत्रानुसार परिषदेच्या परिभाषा मंडळाने दि. १६, २०, २७ व २८ सप्टेंबर रोजीं सभा भरवून 'प्राणीसंगोपन राज्यशाखेंतील अधिपदांचीं अभिधानें' सिद्ध करून खात्याकडे पाठविलीं. डॉ. म. वि. आपटे, डॉ. त्र्यं. र. खळदकर व प्रा. ज. नी कर्वे यांनी या कामीं सर्वतोपरी साहाय्य केलें. पहिल्या सभेला प्रा. सखारामपंत आपटे व असिस्टंट डायरेक्टर डॉ. लेले हे उपस्थित होते,

प्रतिनिधित्व—मुंबई येथे दि. १७–१८ व १९ नोव्हेंबरला भरलेल्या ऑल इंडिया रायटर्स कॉन्फरन्सला कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर परिषदेचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. त्यांनी Realism as a Literary Value' या विषयावर निबंध वाचला. कार्यकारी मंडळाचे सभासद प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. श्री. शं. नवरे व श्री. वा. रा. ढवळे हे स्वतंत्रपणें परिषदेला गेले होते. अलाहाबाद येथील 'सरस्वति' मासिकाच्या रौप्यमहोत्सवानिमित्त भरलेल्या हिंदी परिसंवादासाठी परिषदेतर्फे सौ. ज्योत्स्ना देवधर या उपस्थित राहिल्या होत्या.

इतर—दि. १ मे १९६१ रोजीं महाराष्ट्र राज्य वर्धापन दिन पाळण्यांत आला. याच दिवशीं दिल्ली येथे भरलेल्या मराठी नाट्य-संमेलनाची हकीकत पुणेकर रसिकांना कळावी म्हणून एक सभा झाली. श्री. वसंत शांताराम देसाई व प्रा. ग. प्र. प्रधान यांनी संमेलनाची हकीकत कथन केली. ६ मे १९६१ रोजीं यवतमाळचे शायर श्री. वा. वा. पाटणकर यांचें महाराष्ट्रकवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेखाली शायरी स्वरूपाचें काव्यगायन झालें. श्रोत्यांच्या आग्रहाखातर श्री. यशवन्त व कवि मनमोहन यांनीहि एकेक कविता म्हटली. दिल्ली येथील 'महाराष्ट्र परिचय' केंद्राचे संचालक श्री. भा. कृ. केळकर यांनी परिषदेला दि. १९ मे रोजीं भेट देऊन उपस्थित-साहित्यिक-पत्रकारांना केंद्राविषयी माहिती दिली.

ग्वाल्हेर संमेलन—मराठी साहित्य-संमेलनाचें ४३ वें अधिवेशन लष्कर ग्वाल्हेर येथे दि. २६ ऑक्टोबर ते २९ ऑक्टोबर १९६१ या अवधींत कै. प्रा. कुसुमावती देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली श्री जयाजी मराठा बोर्डिंग हाऊसच्या पटांगणांत उभारलेल्या राजकवि तांबे सभामंडपांत भरलें होतें. संमेलनाचें उद्घाटन मध्यप्रदेशाचे राज्यपाल श्री. ह. वि. पाटसकर यांनी केलें. दि. २७ व २८ रोजीं 'आजच्या मराठी नाट्यवाङ्मयाचें स्वरूप व भवितव्य' व 'ग्रांथिक भाषा व प्रादेशिक बोली यांचे परस्परसंबंध' या दोन विषयांवर (अध्यक्ष डॉ. वि. म. कुलकर्णी व प्रा. श्री. के. क्षीरसागर) परिसंवाद झाले. प्रा. चंद्रकुमार डांगे व प्रि. डॉ. मा. गो. देशमुख यांनी वरील विषयांवर छापील निबंध आधी वाचून दाखविले व नंतर निरनिराळ्या वक्त्यांनीं परिसंवादांत भाग घेतला. डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. भगवन्त देशमुख, प्रा. ना. ल. वैद्य, प्रा. गो. मो. रानडे, डॉ. ना. गो. कालेलकर, डॉ. न. का. घारपुरे इत्यादींनी परिसंवादांत भाग घेतला होता. २८ च्या परिसंवादाच्या आधी आंतरभारतीचा कार्यक्रम झाला. त्यांचें उद्घाटन मध्यप्रदेशाचे शिक्षणमंत्री डॉ. शंकरदयाळ शर्मा यांनी केलें. दि. २८ ला सायंकाळीं श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली हिंदी-मराठी कवींच्या काव्यगायनाचा झालेला कार्यक्रम फारच रंगला होता. याशिवाय स्थानिक कलावंतांचें गायन, काव्यगायन, नाट्यप्रयोग इत्यादि कार्यक्रमांनी संमेलनाच्या रंजकतेंत भर घातली. संमेलनाला पंजाबचे राज्यपाल श्री. न. वि. गाडगीळ, माजी संमेलनाध्यक्ष म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. आ. रा. देशपांडे, श्री. अ. का. प्रियोळकर, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. श्री. के. क्षीरसागर, तसेंच प्रा. कृ. व. निकुंब, प्रा. म. ना. अदवंत, श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. श्री. शं. नवरे, श्री. वा. रा. ढवळे, श्री. रा. पु. सगदेव, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. गं. बा. सरदार, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी, प्रा. भ. श्री. पंडित, सौ. कमलाबाई किबे, सौ. आनंदीबाई शिर्के इत्यादि नामवंत मंडळी उपस्थित होती. स्वागताध्यक्ष श्री. देवराव जाधव, कार्याध्यक्ष प्रा. अ. म. जोशी, कार्यवाह श्री. रमेशचंद्र

खांडेकर, कोषाध्यक्ष सौ. सुशीला खांडेकर इत्यादि कार्यकर्त्यांनी, तसेंच स्वयंसेवक-स्वयंसेवि-कांनी संमेलन यशस्वी करण्यासाठी फार मेहनत घेतली हें नमूद करावेंसें वाटतें. संमेलनांत संमत झालेले ठराव संबंधित संस्थांकडे व मध्यप्रदेश सरकारकडे अंमलबजावणीसाठी पाठविण्यांत आले. ( ठराव अंक १३९ पाहा )

म. सा. संमेलनाचें आगामी ४४ वें अधिवेशन सातारा येथे नगरवाचनालय या संस्थे-तर्फे दिवाळीच्या सुमारास भरणार आहे.

शाखा सभावृत्तान्त—सातारा, सांगली, सोलापूर, अहमदनगर, कोल्हापूर, पनवेल ( कुलाबा ) व नागपूर या ठिकाणीं परिषदेच्या शाखासभा अस्तित्वांत असून त्यांचें कार्य समाधानकारक आहे. चालू वर्षी जळगांव व धुळें येथे नव्यानेच शाखासभा स्थापन झाल्या आहेत.

परिषदेचे एक चिटणीस प्रा. म. ना. अदवन्त यांनी जळगाव येथील शाखासभा स्थापण्यांत पुढाकार घेतला. त्यांच्या प्रयत्नाने या जिल्ह्यांत यंदा सुमारें ५० सदस्य वाढले. शाखेचे पदाधिकारी पुढीलप्रमाणे आहेत. अध्यक्ष श्री. गिरिजाबाई केळकर, कार्याध्यक्ष—प्रा. म. ना. अदवन्त, उपाध्यक्ष—श्री. के. नारखेडे, खजिनदार- प्रा. सु. का. जोशी व चिटणीस प्रा. ज. वि. महाजन व श्री. वा. रा. सोनार, शाखेने यंदा महाराष्ट्रकवि यशवन्त यांचा सत्कार केला. प्रा. अनंत काणेकर व शाहीर अण्णाभाऊ साठे यांचीं व्याख्यानें झालीं.

धुळें शाखेने यंदा ८० नवीन सभासद केले. शाखेचे पदाधिकारी पुढीलप्रमाणे आहेत : अध्यक्ष—श्री. द. रा. भट, उपाध्यक्ष—श्री. शांतिलाल गुजराती, कार्याध्यक्ष—प्रा. ह. श्री. शेणोली-कर, खजिनदार—प्रा. पी. डी. दलाल व चिटणीस—प्रा. पुरुषोत्तम पाटील आणि श्री. हिंमत पाटील.

सांगली शाखेने प्रतिवर्षीप्रमाणे यंदा परीक्षांचे वर्ग चालविले. जिल्ह्यांतील साहित्यिक व साहित्यप्रेमी मंडळींचें बुधगांव येथे एक संमेलन घडवून आणलें. २३ जुलैला शाखेतर्फे श्री. एम्. एम्. चौगुलेकृत 'आमचे शिक्षणमंत्री ना. बाळासाहेब देसाई' या चरित्राचें श्री. माधवराव बागल यांच्या हस्तें प्रकाशन झालें. डॉ. सरोजिनी बाबर यांचें 'लोकसाहित्य'वर व्याख्यान करण्यांत आलें. सांगली जिल्ह्यांत यंदा प्राज्ञ परीक्षेंत कु. शुभा बर्वे या पहिल्या आल्याने त्यांना शाखासभेचें कै. गंगूनाना कानेटकर पारितोषिक ( रु. १५ ) देण्यांत आलें.

सातारा शाखेतर्फे यंदा प्रा. मालबा केळकर व शंकरराव ठकार यांचीं व्याख्यानें झालीं. डॉ. द. न. गोखले ( साहित्य अकादमीच्या पारितोषिकाचे मानकरी ) व प्रा. ह. कि. तोडमल ( पी. एच्. डी. झाल्याबद्दल ) यांचें अभिनंदन करण्यांत आलें. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी शुद्धलेखननियमावलीसंबंधी कार्यकर्त्यांशीं चर्चा केली. सातारला भरत असणाऱ्या म. सा. संमेलनाशीं शाखासभा पूर्ण सहकार्य करीत आहे. परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर व चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे संमेलन-कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी १७ डिसेंबर १९६१ ला सातारला गेले होते.

सोलापूर शाखेने 'भरली चंद्रभागा' हा लोकगीतांचा संग्रह गतवर्षी प्रसिद्ध केल्यानंतर यंदा कै. गणेशशास्त्री लेले यांच्या रघुवंशाच्या मराठींतील पद्यभाषांतराचें पुनर्मुद्रण करावयाचें ठरविलें आहे. यासाठी महाराष्ट्र सरकारकडून रु. ५०० चें अनुदानहि मिळविलें आहे. शाखेस

यंदा प्रा. क्षीरसागर व कवि गिरीश यांनी भेटी दिल्या. मराठी वृत्तपत्रांचे इतिहासकार श्री. वि. कृ. जोशी यांचें 'इतिहास' या विषयावर व्याख्यान झालें. डॉ. वि. म. कुलकर्णी यांनी ग्वाल्हेर संमेलनाचा वृत्तान्त कथन केला. जिल्हासंमेलनाची गेलीं ११ वर्षे चालू असलेली प्रथा शाखा यंदा पुन्हा सुरू करीत आहे.

कुलाबा (पनवेल) शाखेने निरनिराळ्या साहित्यिकांच्या स्मृतिदिनांच्या निमित्ताने व्याख्यानें घडवून आणलीं. संस्थेच्या सहकार्याने साने गुरुजी कथामाला काढण्याचा उपक्रम करण्यांत आला. जिल्ह्याचें साहित्यसंमेलन घेण्याचे यत्न चालू आहेत.

नागपूर शाखासभेने यंदा रेव्हरंड टिळकांच्या जन्मशताब्दीनिमित्त एक सभा घऊन त्यांना आदरांजलि वाहिली.

करवीर शाखेचे कार्याध्यक्ष डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांच्या निधनामुळे शाखा सभेतर्फे यंदा विशेष कार्यक्रम होऊं शकले नाहीत.

अहमदनगर शाखेचे कार्यकर्ते श्री. द. बा. डावरे यांचा आदर्श शिक्षक म्हणून या वर्षी भारत सरकारने गौरव केल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें.

वाङ्मयेतिहास योजना—परिषदेने हातीं घेतलेली वाङ्मयेतिहासाची योजना सात खंडांची आहे. यापैकी चौथ्या खंडाचें (१८०० ते १८७४) कार्य ऑगस्ट १९६० पासून प्रा. रा. श्री. जोग यांच्या मार्गदर्शनाखाली चालू आहे. या खंडासाठी प्रा. गो. म. कुलकर्णी (राजकीय स्थित्यंतर व त्याचे वाङ्मयदृष्ट्या झालेले परिणाम), डॉ. कृ. भि. कुलकर्णी (पाठ्य पुस्तकें) आणि मिशनरी किंवा साहेब लोकांचें कार्य), प्रा. द. भि. कुलकर्णी (निबंधवाङ्मय), प्रा. भ. श्री. पंडित (काव्य), डॉ. वि. वि. पटवर्धन (नाट्यवाङ्मय) व डॉ. ल. म. भिंगारे (कथा-कादंबरी) यांची लेखक म्हणून नियुक्ति झाली असून सर्वांकडून आपापल्या विभागाचें लेखन पूर्ण झालें आहे. लेखनाच्या कामाला चालना देण्याच्या व झालेल्या लेखनाविषयी विचारविनिमय करण्याच्या दृष्टीने यंदा लेखकांच्या चार बैठकी घेण्यांत आल्या होत्या. श्री. चंद्रशेखर बर्वे, एम्. ए. व श्री. प्र. ना. अवसरीकर, एम्. ए. यांनी प्रस्तुत खंडासाठी इतर उपयुक्त माहिती गोळा करून दिली. खंडाची पक्की मुद्रण प्रत तयार होऊन मुद्रणाच्या कार्यास लवकरच आरंभ होईल. वाङ्मयेतिहास योजनेच्या कामीं प्रा. जोग यांना साहाय्य करण्यासाठी प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. गं. बा. सरदार व प्रा. दि. के. बेडेकर यांची सल्लागार समिति नेमण्यांत आली आहे. चौथा खंड मार्गस्थ झाल्यानंतर तिसरा खंड हातीं घेण्यांत येणार आहे.

देणग्या—पुणें महानगरपालिकेकडून प्रतिवर्षाप्रमाणे यंदा परिषदेला १०० रु.ची देणगी मिळाली. पुणें विद्यापीठाकडून संशोधनकार्यासाठी पुढील दोन देणग्या मिळाल्या. रु. ५०० (द्रौपदी स्वयंवराच्या प्रकाशनासाठी) व रु. ३७५ (अनुभवामृताच्या संशोधनकार्यासाठी) या देणग्यांबद्दल परिषद दोन्ही संस्थांची ऋणी आहे.

कार्यालयीन सभा—चालू वर्षी कार्यकारी मंडळाच्या चार सभा झाल्या. (१६ एप्रिल, ११ जून, २६ ऑक्टोबर व ४ फेब्रुवारी). ११ जूनला नियामक व वार्षिक साधारण सभा प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली भरल्या होत्या.

पूरग्रस्त संशोधक साहित्यिक यांच्यासंबंधी—१२ जुलैच्या महापुरामुळे पुण्यांतील संशोधक, साहित्यिक, कलाकार, पत्रकार इत्यादि सांस्कृतिक क्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तींची

जी अपरिमित हानि झाली तिचा तपशील संबंधित पूरग्रस्त व्यक्तींना पत्रें पाठवून म. सा. परिषदेने गोळा केला. ( या विषयासंबंधीचा त्रोटक अहवाल 'पत्रिके'च्या १३८ व्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत आला आहे ). मुख्य मंत्री मा. यशवन्तराव चव्हाण, साहित्य व संस्कृति-मंडळ, कॉंग्रेस फॉर कल्चरल फ्रीडम व कमिशनरसाहेब, पुणें विभाग यांच्याशीं परिषदेने वेळोवेळीं पत्रव्यवहार करून व गांठीभेटी घेऊन पूरग्रस्तांना आर्थिक साहाय्य करण्याची विनंती केली. हें साहाय्य देण्याच्या कामीं परिषदेने गोळा केलेल्या माहितीचा सर्वांनाच फार उपयोग झाला. मराठवाडा कवि संमेलन, नांदेड व श्रीमाळी ब्राह्मण समाज, पुणें, या संस्थांनी आपणहून परिषदेकडे कांही निधि आणून दिला होता. सदरील निधीचा विनियोग त्या संस्थांच्या इच्छेनुरूप करण्यांत आला.

गडकरी स्मारक—कै. राम गणेश गडकरी यांच्या पुण्यांतील कसबा पेठेंतील निवास-स्थानाचे मालक श्री. के. र. सिन्नरकर यांनी प्रस्तुत निवासस्थान गडकरी-स्मारकासाठी देण्याची इच्छा आचार्य अत्रे यांच्यापाशीं प्रकट केली होती. ही इच्छा फलद्रूप होण्याच्या दृष्टीने कार्याध्यक्ष प्रा. क्षीरसागर. चिटणीसद्वय श्री. तळवलकर व श्री. शेटे आणि प्रा. दि. के. बेडेकर यांनी श्री. सिन्नरकर यांची भेट घेऊन स्मारकाच्या स्वरूपाची चर्चा केली. कै. गडकरी यांचें निवासस्थान नाट्यविषयासंबंधीचें एखादें अभ्यासकेंद्र व्हावें अशी श्री. सिन्नरकर यांची इच्छा असून पुणें महानगरपालिका अगर महाराष्ट्र सरकार यांच्या सहकार्याने स्मारकाची योजना कार्यवाहींत यावी असा मनोदयहि त्यांनी परिषदेला कळविला आहे.

परीक्षा—डिसेंबर १९६१ मध्ये झालेल्या परिषदेच्या परीक्षांचीं यंदा १५७ केंद्रें होतीं. सर्व केंद्राना मिळून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले होते.

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण |
|---|---|---|
| प्रथमा | ४००१ | २६८६ |
| प्रवेश | १३०५ | ८१३ |
| प्राज्ञ | ५१७ | २५० |
| विशारद | ९८ | २३ |
| आचार्य | ९ | २ |
| | ५९३० | ३७७४ |

या वर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पुढील उमेदवार पहिले आले.

प्रथमा—अरुणा रमाकांत घोलकर, कणकवली केंद्र, पारितोषिक १० रु.
प्रवेश—मधुकर नथू शिंदे, नशिराबाद केंद्र, पारितोषिक १५ रु.
प्राज्ञ—पंढरीनाथ स. जगदाळे, मसूर केंद्र, पारितोषिक २० रु.
विशारद—रामदास ह. शिंदे, ठाणें केंद्र / कुमुद भा. परांजपे. पुणें केंद्र } यांना विभागून पारितोषिक २५ रु.
आचार्य—रायभान रं. जाधव, पुणें केंद्र पारितोषिक ४० रु

ग्रंथालय—कै. वा. गो. आपटे संदर्भग्रंथालयाची शास्त्रोक्त पद्धतीने पुनर्रचना करण्याचे काम गेल्या वर्षींच सुरू केलें होतें, तें या वर्षी पूर्ण करण्यांत आलें. डॉ. रंगनाथन् यांच्या द्विबिंदुवर्गीकरण पद्धतीप्रमाणे सर्व ग्रंथांचें वर्गीकरण करण्यांत आलें असून 'ग्रंथकार' व 'ग्रंथनाम' अशा वेगळ्या सूची न ठेवतां कोशसूचीची एकत्र पद्धत अनुसरण्यांत आली आहे. महाराष्ट्र ग्रंथालय संघाच्या सहकार्याने हें काम पुरें करण्यांत आलें असून त्या संस्थेतर्फे श्री. शां. ग. महाजन व श्री. म. प. पेठे यांनी काम केलें.

म. सा. परिषदेकडे अभिप्रायार्थ येणारे ग्रंथ सोडून यंदा जवळ जवळ ७०० रुपयांचे ग्रंथ विकत घेण्यांत आले. यांत परिषदेच्या संग्रहीं नसलेल्या महत्त्वाच्या ग्रंथांची भर घालण्यांत आली. विविधज्ञानविस्तार, रत्नाकर, साहित्य यांसारख्या मासिकांचे संच शक्यतों पुरे करण्यांत आले असून, आहे या स्थितींत ग्रंथालयाची मांडणी व्यवस्थित व अद्ययावत् झाली आहे. या ग्रंथालयाचा फायदा मराठीचे अभ्यासक, संशोधक व बी. ए., एम्. ए.च्या मराठीच्या विद्यार्थ्यांनी भरपूर प्रमाणांत घ्यावयास हवा. म. सा. परिषदेच्या सभासदांना या ग्रंथालयाचा उपयोग संदर्भ-ग्रंथालय म्हणून मोफत घेतां येतो. ग्रंथखरेदीशिवाय या वर्षी लाकडी व लोखंडी कपाटें, व इतर साहित्यावर जवळ जवळ ६५० रु. खर्चण्यांत आले. हें ग्रंथालय मराठींतील अद्ययावत् व आदर्श संदर्भ ग्रंथालय व्हावें अशी परिषदेची मनीषा आहे. मराठींतील प्रत्येक ग्रंथ हा अभ्यासकांना येथे वाचावयास मिळावा. यासाठी सर्व लेखकांनी, प्रकाशकांनी आपल्या ग्रंथाची एकेक प्रत ग्रंथालयास भेट म्हणून पाठविली व ग्रंथालयप्रेमी धनिकांनी आर्थिक साहाय्य करून व साहित्यिकांनी आपणाकडे असलेले उत्तम ग्रंथ परिषदेच्या स्वाधीन केले व सर्वांनीच मनावर घेतलें, तर ही गोष्ट सहज शक्य होईल. या दृष्टीने श्री. के. त्र्यं. चांफेकर यांचें उदाहरण अनुकरणीय होय. त्यांनी आपल्या वडिलांच्या संग्रहांतील मोल्सवर्थ आणि कँडी यांचे शंभर वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेले इंग्रजी–मराठी व मराठी–इंग्रजी कोष या ग्रंथालयाच्या स्वाधीन केले. कै. वा. गो. आपटे ट्रस्टचे विश्वस्त श्री. सहस्रबुद्धे, श्री. य. गो. जोशी व श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी दि. १०।६।६१ रोजीं ग्रंथालयास भेट देऊन ट्रस्ट-मधून दिलेल्या देणगींतून उभारलेल्या या ग्रंथालयाची पाहणी केली, कांही सूचना केल्या व ग्रंथालयाच्या रचनेबाबत समाधान व्यक्त केलें. ग्रंथालय व ग्रंथखरेदी समितीच्या या वर्षी एकूण चार सभा झाल्या.

महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका—चालू वर्षी श्री. प्रा. दि. के. बेडेकर यांच्या संपादक-त्वाखाली चार अंक प्रसिद्ध झाले. पत्रिकेला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येतात.

दैनिकें :—सकाळ, तरुण भारत (पुणें व नागपूर आवृत्ति) विशाल सह्याद्रि, सोलापूर समाचार.

त्रिसाप्ताहिक :–केसरी.

अर्ध साप्ताहिकः—मराठवाडा.

साप्ताहिकें:—नवयुग, साधना, आलमगीर, महाराष्ट्र (नागपूर), प्रतोद, प्रबोध-चंद्रिका, युगांतर, समाचार, पीपल्सराज, सोवियत देश, संघयुग, गोफण, अर्थ, गांवकरी, ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिस, शिवनेर, The Times Weekly Review, London.

पाक्षिकें—अमेरिकन वार्ताहर, समाजपत्रिका.

मासिकें--किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, सत्यकथा, वसंत, उद्यम, पुरुषार्थ, चित्रमयजगत्, महाराष्ट्र, युगवाणी, प्रतिष्ठान, प्रसाद, नवभारत, धर्मचक्र, भारतमित्र, एकता, अमृत, साहित्यसहकार, व्यापारी महाराष्ट्र, पी. ई. एन्., राष्ट्रवाणी, माणूस, सन्मति, चालना, महात्मा, गोकुळ, बालसन्मित्र, आनंद, शालापत्रक.

त्रैमासिकें--मराठी-संशोधन-पत्रिका, पंचधारा, Bulletin of the Deccan College Research, Institute Journal of the Tanjore Saraswati Mahal Library.

संपादक मंडळाने यंदा विद्यमान मराठी-लेखकांच्या परिचय ग्रंथांचें कार्य नव्यानेच हातीं घेतलें. सुमारें ५०० लेखकांकडे विशिष्ट प्रकारचे छापील तक्ते माहिती भरून पाठविण्यासाठी पाठविण्यांत आले होते. आतापावेतों सुमारें ३०० लेखकांकडून तक्ते भरून आलेले आहेत. आगामी वर्षांत प्रस्तुत परिचय-ग्रंथाचें कार्य पुरें होईल अशी आशा आहे.

'पत्रिके' च्या वाङ्मय समालोचन ( १९६१ ) अंकासाठी गतवर्षीप्रमाणे महाराष्ट्र सरकारच्या 'शिक्षण आणि समाजकल्याण' खात्याकडून यंदा १५०० रु.ची देणगी मिळाली. दिल्लीच्या बृहन्महाराष्ट्र बिल्डिंग ट्रस्टनेहि नेहमींप्रमाणे ३५० रु. देणगी पाठविली. परिषद या दोन्ही संस्थांची ऋणी आहे.

वि. त्र्यं. शेटे
गोपीनाथ तळवलकर
दि. १५-४-६२. म. ना. अदवन्त
चिटणीस.

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्–प्रकाशनें

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
लेे. कै. वा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहीत )

| | | |
|---|---|---|
| २ म. सा. परिषद्-इतिहास | | रु. न.पै. |
| | लेे. म. म. प्रा. द. वा. पोतदार | ३=०० |
| ३ संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति ( नवी आवृत्ति छापत आहे ) | | |
| | लेे. प्रा. गं. बा. सरदार | |
| ४ वाङ्मय-समालोचन ( १९४७ ) | | २=०० |
| ५ वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) | | ३=०० |
| ६ निबंध–विकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) | | २=५० |
| ७ साहित्य–सुगंध ( प्रवेश ,, ,, ) | | २=५० |
| ८ सारस्वत-प्रवेश ( प्रथमा ,, ,, ) | | २=०० |
| ९ शुद्धलेखन-नियम ( १९६१ ची आवृत्ति ) | | ०=१५ |
| १० गुजराती वाङ्मय समालोचन ( १९५९ ) | | १=०० |
| ११ हिंदी वाङ्मय समालोचन ( ,, ) | | १=०० |

( क्र. ५ या पुस्तकाची मागणी प्रसाद-प्रकाशन, सदाशिव, पुणें २ यांच्याकडे करावी. )

इतर चौकशी :– चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

कार्यालयाच्या वेळा

सकाळीं ...... ८॥ ते १०॥
दुपारीं ...... ४ ते ८

दर मंगळवारीं सुटी

# AUDITORS' REPORT

MAHARASHTRA SAHITYA PARISHAD, POONA.

**( Name of the Trust ).**

**( Regd. No. P 90 )**

We, the undersigned Auditors have audited the accounts of the public Trust : MAHARASHTRA SAHITYA PARISHAD, POONA, for the year ended 31st March, 1 '62 and have to state as under :—

(a) The accounts are kept regularly and in accordance with the provisions of the Act & the Rules.

(b) Receipts & disbursements are properly and correctly shown in the accounts.

(c) Cash Balance & Vouchers in the custody of the Trustees on the date of audit were in agreement with the accounts.

(d) All books, deeds, accounts, vouchers and other documents and records required by us were produced before us.

(e) An inventory certified by the Trustees of the movables of the Trust has been maintained.

(f) No property or funds of the Trust were applied for any object or purpose other than the object or purpose of the Trust.

(g) Trustees appeared before us and furnished the necessary information required by us.

(h) There are no outstanding over one year and no amount has been written off as bad debts.

(i) There were no repairs over Rs. 5,000 hence no tenders were called for.

(j) No Money of the Trust has been invested contrary to the provisions of Sec. 35 of the Trusts Act.

(k) There were no alienations of the immovable property contrary to the provisions of Section 36 of the Trusts Act.

180, Budhwar Peth
Laxmi Road, Pona 2.
Dt. 15th April, 1962.

*Sd- G. M. Oka & Co.,*
*Chartered Accountants,*

# महाराष्ट्र साहित्य

शेडयूल IX नियम

दि. १ एप्रिल १९६१ ते दि. ३१ मार्च

| खर्च | | | रु. न. पै. | रु. न. पै. |
|---|---|---|---|---|
| जिंदगी ( प्रॉपर्टी ) | | | | |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर | .... | ... | ५८-३६ | |
| पंप दुरुस्ती | ... | ... | १००-०० | |
| वीज | ... | ... | १७१-८४ | ३३०-२० |
| संस्था | | | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | ... | ... | ४,८३९-३५ | |
| कार्यालय छपाई | ... | ... | ४१५-७५ | |
| कार्यालय टपाल | ... | ... | २९९-५१ | |
| सादील ... | ... | ... | १४७-९९ | |
| आतिथ्य .. | ... | ... | ३६३-४५ | |
| प्रवास व प्रचार | ... | ... | ७३९-०० | ६,८०५-०५ |
| विश्वस्तांना संभावना द्रव्य | ... | ... | | ००-०० |
| वकील फी | ... | ... | | ००-०० |
| हिशेब तपासनीस ( १९६०-६१ ) | ... | ... | | १००-०० |
| देणग्या वगैरे | ... | ... | ... | ००-०० |
| कार्यकारी नियामक | ... | ... | १,५५२-५५ | |
| उपसमिति | ... | ... | ११-०० | |
| शाखा सभा | ... | ... | १६५-०० | १,७२८-५५ |
| बुडित रक्कम (कै.केतकर स्मारक कुंप ) | ... | ... | | ३५३-८८ |
| फिरकोळ | ... | ... | | २१९-६६ |
| कै. टेंबे स्मारक व्याख्यानमाला | ... | ... | | ३१६-५० |
| बसारा | ... | ... | | ९९६-९८ |
| परीक्षा | ... | ... | १०,३५२-७१ | |
| पत्रिका अंक | ... | ... | ५,८१४-५१ | १६,१६७-२२ |
| | | | एकूण रु. | २७,०१८-०४ |

| | | | |
|---|---|---|---|
| पुणे, दि १५-४-१९६२ | ध. रा. गाडगीळ<br>वि. द. घाटे<br>विश्वस्त | श्री. के. क्षीरसागर<br>कार्याध्यक्ष<br>न. का. घारपुरे<br>खजिनदार | वि. त्र्यं. शेटे<br>गोपीनाथ तळवलकर<br>म. ना. अदवन्त<br>चिटणीस |

# परिषद, पुणें २.

१७ ( १ ) प्रमाणें

## १९६२ अखेर मुदतीचें जमा–खर्च पत्रक.

| जमा | रु. न. पै. | रु. न. पै. | रु. न. पै. |
|---|---|---|---|
| दणग्या ( मा.प.सभागृहामुद्दां) | | ३,२६३–०० | |
| वजा–ताळेबंदांत ज्या त्या खात्यांत | | | |
| वाङ्मयसमालोचनें | १,८५०–०० | | |
| संशोधन | ८७५–०० | २,७२५–०० | ५३८–०० |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशनकडून | | ... | १००–०० |
| व्याज | | | |
| बँक खातें | १७८–७६ | | |
| ठेवीवरील | ८९२–०० | | |
| | १,०७०–७६ | | |
| वजा–जांभेकर पारि-तोषिकाकडे | ४०–०० | १,०३०–७६ | |
| विश्वस्तांकडील व्याजांतून | | १,५००–०० | २,५३०–७६ |
| उत्पन्नें | | | |
| सामान्य सभासद वर्गणी | २,३१५–६२ | | |
| संलग्न संस्थांकडून | ५९–०० | | |
| " पत्रिका " ... | २५९–५० | २,६३४–१२ | |
| परीक्षा शुल्क | | १६,०४७–९७ | |
| " पत्रिका " ( अंकविक्री व जाहिरात ) | | २०६–७५ | |
| ग्वाल्हेर संमेलनाकडून | | ४२५–०० | |
| कै. टेंबे स्मारक व्याख्यानमाला | | ३००–०० | |
| किरकोळ ... | | ७६–५० | १९,६९०–३४ |
| प्रकाशनें | | | |
| ग्रंथ विक्री (६१–६२) | ५,५४९–०३ | | |
| ६२ अखेरचा सांठा | १,३६४–४५ | ... | |
| | ६,९१३–४८ | | |
| वजा–वर्षारंभींचा सांठा रु. २,४९२–७५ ६१–६२ मधील खर्च रु. १,५६४–७५ | ४,०५७–०६ | | |
| | २,८५६–४२ | | |
| वजा–नफा प्रकाशन निधीकडे | २,८५६–४२ | | |
| जमेपेक्षां अधिक खर्च सामान्य निधीकडून | | ... | ४,१५८–९४ |
| | | एकूण रु. | २७,०१८–०४ |

आज तारखेस अलाहिदा दाखला दिल्याप्रमाणें.

( स्वाक्षरी ) जी. एम्. ओक आणि कंपनी, चार्टर्ड अकौंटंटस्, पुणें.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल VIII नियम

## दि. ३१ मार्च १९६२

| निधि व देणीं | | रु. न. पै. | रु. न. पै. |
|---|---|---|---|
| **सामान्य निधि** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ४६,२८०–७२ | |
| वजा – ६१–६२ मधील जमेपेक्षां | | | |
| अधिक खर्च | | ४,१५८–९४ | ४२,१२१–७८ |
| **इतर राखीव निधि** | | | |
| (१) इमारत | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ४६,४२८–२४ | |
| (२) ग्रंथालय | रु. न. पै. | | |
| मागील ताळेबंदावरून | १८,६५१-८७ | | |
| परीक्षणाला आलेलीं पुस्तकें | २२०-०० | १८,८७१–८७ | |
| (३) कै. डॉ. केतकर स्मारक | | | |
| मागील ताळेबंदावरून | | १००–०० | |
| (४) कै. टेंबे स्मारक व्याख्यानमाला | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ३००–०० | |
| (५) प्रकाशन ( पारितोषिक ) | | | |
| मागील ताळेबंदावरून | | २०४–०० | |
| (६) वाङ्मयेतिहास योजना | | | |
| मागील ताळेबंदावरून | १०,९१९-२८ | | |
| वजा–६१-६२ चा खर्च | १,३८८-१० | ९,५३१–१८ | |
| (७) प्रकाशनें | | | |
| मागील ताळेबंदावरून | २०,६७३-५२ | | |
| ६१–६२ मधील नफा | २,८५६-४२ | २३,५२९–९४ | |
| (८) जांभेकर पारितोषिक | | १,०००–०० | |
| अधिक व्याज | | ४०–०० | |
| (९) वाङ्मयसमालोचनें | | | |
| मागील ताळेबंदावरून | ८०८-५७ | | |
| सरकारी व इतर देणगी | १,८५०-०० | | |
| | २,६५८-५७ | | |
| वजा–६१–६२ मधील खर्च | ८२८-९० | १,८२९–६७ | |
| (१०) परिभाषाकोश | | | |
| मागील ताळेबंदावरून | | १,२५०–०० | |

# परिषद्, पुणें २.

१७ (१) प्रमाणें)

## रोजींचा ताळेबंद

| जिंदगी व येणीं | रु. | न. पै. | रु. | न. पै. |
|---|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | | | |
| इमारत लीज–होल्ड जागेवर : | | | | |
| मागील ताळेबंदावरून. | ५७,९५६ | ७१ | | |
| १९६१–६२ चा खर्च | ५८० | ५३ | ५८,५३७ | २४ |
| कै. डॉ. केतकर स्मारक (कुंपण) | | | | |
| मागील ताळेबंदावरून. | ३५३ | ८८ | | |
| वजा–बुडीत खातीं वर्ग. | ३५३ | ८८ | ०० | ०० |
| ठेव (दर्शनी किंमत) | | | | |
| रोखे– | | | | |
| ४ टक्के बॉम्बे म्यु. डिबेन्चर्स. | ५०० | ०० | | |
| ३ टक्के १९७०–७५ डेव्ह. लोन. | १०,८०० | ०० | | |
| ३ टक्के १९४६ कन्व्हर्शन लोन. | २,७०० | ०० | | |
| ३॥ टक्के १० वर्षे ट्रे. से. डिपॉ. | १३,००० | ०० | | |
| ४ टक्के १० वर्षे ट्रे. से. डिपॉ. | ४०० | ०० | | |
| | २७,४०० | ०० | | |
| शेअर्स–२५ बॉम्बे स्टेट को-ऑप. बँक लि. चे प्रत्येकीं रु. ५० चे. | १,२५० | ०० | | |
| २३ सेन्ट्रल प्रॉ. रेल्वेचे प्रत्येकीं रु. १०० चे. | २,३०० | ०० | ३०,५५० | ०० |
| फर्निचर व डेडस्टॉक | | | | |
| मागील ताळेबंदावरून. | ६,९५७ | ०० | | |
| १९६१–६२ मधील खर्च. | ४६७ | ५३ | ७,४२४ | ५३ |
| ग्रंथसंग्रहालय | | | | |
| मागील ताळेबंदावरून. | १७,०१४ | १८ | | |
| १९६१–६२ मधील खरेदी. | १,३२६ | १० | | |
| परीक्षणाला आलेलीं पुस्तकें. | २२० | ०० | १८,५६० | २८ |
| कर्ज | | | ०० | ०० |
| ॲडव्हान्सेस–“फलश्रुति” प्रकाशन. | ५०१ | ०६ | | |
| संशोधन– रुपये न.पै. | | | | |
| मागील ताळेबंदावरून. १,२८१–५३ | | | | |
| ६१–६२ मधील देणगी. ८७५–०० | | | | |
| २,१५६–५३ | | | | |









| | | | |
|---|---|---|---|
| **निधि व देणीं** | | | |
| **मागील पानावरून चालू** | | | |
| (११) प्रॉव्हिडंट फंड ( सेवक ) | | | |
| मागील ताळेबंदावरून | २,९८५-७१ | | |
| ६१–६२ ची जमा | २८८-७० | | |
| ६१–६२ मधील व्याज | ६२-२५ | ३,३३६–६६ | |
| (१२) घ सा रा | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | ५,१००-०० | | |
| ६१–६२ ची जमा | ९९६-९८ | ६,०९६–९८ | १,१२,४७९–५४ |
| कर्ज | ... | ... | ००–०० |
| देणीं | | | |
| सांगली शाखा पारितोषिक | | ४००–०० | |
| विश्वस्तांना देणें | | १,७२५–२७ | २,१२५–२७ |
| | | एकूण रु. | १,५६,७६६–५९ |

पुणें
दि. १५–४–१९६२

| | | |
|---|---|---|
| ध. रा. गाडगीळ | श्री. के. क्षीरसागर | वि. त्र्यं. शेटे |
| वि. द. घाटे | **कार्याध्यक्ष** | गोपीनाथ तळवलकर |
| **विश्वस्त** | न. का. धारपुरे | म. ना. अदवन्त |
| | **खजिनदार** | **चिटणीस** |

| जिंदगी व येणीं | रु. | न.पै. | रु. | न.पै. |
|---|---|---|---|---|
| मागील पानावरून चालूं | | | | |
| वजा—६१-६२ मधील खर्च. ३,४१३—७५ | १,२५७ | २२ | १,७५८ | २८ |
| चालूं असेटस् | | | | |
| शिल्लक पुस्तकांची किंमत. | | | | |
| (चिटणीसांनीं दाखला दिल्याप्रमाणें) | १,३६४ | ४५ | | |
| पुणें इले. स. कं. कडे डिपॉझिट. | २६० | ०० | १,६२४ | ४५ |
| येणीं | | | ०० | ०० |
| अखेर शिल्लक— | | | | |
| रोख व टपालरूपानें. | १११ | ०६ | | |
| पुणें सेन्ट्रल को-ऑप. बँक लि., पुणें. | ६० | ८४ | | |
| पुणें सेन्ट्रल को-ऑप. बँक लि. (प्रॉ. फंड.) | ३,३३६ | ६६ | | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, (ट्रस्टी). | १,१७० | ३७ | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणें. | ७,२३२ | ८८ | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., अल्प मुदत ठेवी. | २६,००० | ०० | ३७,९११ | ८१ |
| एकूण...रु.... | | | १,५६,७६६ | ५९ |

आज तारखेस अलाहिदा दाखला दिल्याप्रमाणें.
(स्वाक्षरी) जी. एम्. ओक आणि कं.
चार्टर्ड अकौंटंटस्, पुणें.

अनुक्रमणिका

